मित्राची आठवी भेट.

चितोडनृपनंदिनी,

# जयदेवी.

(एक ऐत्याहासिक कादंबरी.)

---

लेखक

भास्कर रघुनाथ दातीर-मुंबई.

खानापूर धनंजय छा० छा०

सन १८९८ इसवी.

लोकमित्राच्या वर्गणीदारांस फुकट.

इतरांस

मत ०१२ आणे.

# ...वना.

दुःखपर्यवसायी कथानकें लिहिण्याचा प्रघात अद्याप आपल्यांत असावा तसा नाहीं, आणि असें असण्याचें कारण वाचणारांची अभिरुची अनुकूल नाहीं हें होय. पाश्चात्यदेशांत दुःखपर्यवसायी कथानकें लिहिण्याचा प्रघात जारी असून वाचकवर्गास तीं फार आवडतात आपल्या इकडे पूर्वापार दुःखपर्यवसायी कथानकें लिहिण्याचा प्रघात तर मुळीं नाहींच, आणि सध्यां देखील जीं नाटकें अथवा कथानकें लिहिलीं जातात त्यांचा कल नेहमीं आनंदपर्यवसायी ठेवण्याची विशेष खबरदारी, लेखकांकडून ठेविली जाते. पाश्चिमात्यांचें अनुकरण करून कांहीं कथानकें तशीं दुःखपर्यवसायी लिहिलीं गेलीं आहेत, पण अशीं थोडीं.

आनंदपर्यवसायी कथानकें लिहिण्याचा हेतु जो, सद्धर्माची आवड, सत्यनिष्ठा, अविचार आणि दुष्ट मनोविकार ह्यांचें आकलन, सद्वर्तनाचें अनुकरण आणि दुर्वर्तनाचा तिरस्कार इत्यादि गोष्टींच्या अवश्यकतेची ओळख वाचकवृंदास करून देणें हा आहे. तोच हेतु दुःखपर्यवसायी कथानकें लिहिण्याचा आहे, परंतु योग्य ज्ञान करून देऊन एकंदर वाईट गोष्टींचा पराकाष्ठेचा तिटकारा वाचकवृंदांत उत्पन्न करण्यास दुःखपर्यवसायीच कथानकें योग्य-चांगली होत असें वाटतें. प्रख्यात **आरिस्टॉटल** ह्याचें दुःखपर्यवसायी कथानकासंबधानें असें मत आहे कीं, " दुःखपर्यवसायी नाटक अथवा कथानक ह्यांचा उद्देश एखाद्या विकाराच्या परिणामाचें हुबेहुब वर्णन करून, त्या विकाराविषयीं मनुष्याचे मनांत तिरस्कार उत्पन्न करणें हाच असला पाहिजे " वास्तविक दोन्हीं प्रकारांचा उद्देश एकच असतो परंतु दुसऱ्या प्रकारांत-अर्थात दुःखपर्यवसायी कथानकांत एखाद्या अगर अनेक विकारांचें आधिक्य आणि त्याचा शेवट परिणामही फारच भयंकर असा दाखवितां येतो. ह्मणून एखाद्या विशिष्ट विकाराचा अथवा अनेक विकारांचा अतोनात तिरस्कार वाचकवृंदांत उत्पन्न करण्यास दुःखपर्यवसायी कथानकें फारच उपयोगी पडतात.

व्यवहारांत अशींही कांहीं उदाहरणें दिसून येतात कीं, सद्धर्मी आणि सद्धर्मरत अशा नीतिमान पुरुषाला आपत्ति भोगावी लागते [illegible], आणि त्याचा शेवटही फार भयंकर तऱ्हेनें होतो. तेव्हां अशीं उदाहरणें दृष्टीस पडत असतां सद्धर्माची आणि नीतीची कास कां धरावी ? असा जर प्रश्न निघाला तर त्याचें उत्तर दुःखपर्यवसायी कथानकांत उत्तम तऱ्हेनें दिलेलें असतें. [illegible] सगळ्यांचा शेवट त्यांचे त्यांचे गुणाप्रमाणें जसा न्याय तसा त्यांत दाखविलेला असतो. आतां नीतिमान मनुष्याला अशी दशा प्राप्त कां होते! ह्याचीं कारणें अनेक आहेत, आणि त्यांपैकींच " बळी तो कान पिळी " हें एक आहे, तथापि कालांतरानें सत्याचा आणि सत्पथाचा जय हा होणारच. मग तो जय [illegible] दिवस पाहण्याचें नशिबीं येवो अगर न येवो, नीतिमान मनुष्याला इतकें समाधान असतें, आणि समाधान हाच जय असें तो समजत असतो. प्रस्तुत कथानक अशाच पैकीं आहे.

ही गोष्ट वास्तविक घडलेली नाहीं. एका इंग्रजी पुस्तकांत ही गोष्ट वाचण्यांत आल्यावरून मराठींत अशी गोष्ट लिहावी असें मनांत आलें. दुसरी गोष्ट अशी कीं, इंग्रज ग्रंथकारानें ही गोष्ट लिहावी तशी सत्पक्ष मनांत बाळगून लिहिलेली नाहीं. पुष्कळ ठिकाणीं त्यानें अशीं कांहीं चमत्कारिक विधानें ( हिंदुस्थानांतील लोकांचे चालीरिती विषयीं ) ठोकून दिलीं आहेत कीं, तीं वाचून लिहिणाराच्या अज्ञानाची-जाणून बुजून अज्ञान घेण्याचे तऱ्हेची कींव येते. हिंदुस्थानांतील लोकांच्या राहण्याची, खाण्यापिण्याची, विवाहाची वगैरे पद्धत अगदीं त्याज्य अशी ठरवून टाकण्याचा त्यानें प्रयत्न केला आहे. इतकेंच नव्हे पण कांहीं कांहीं ठिकाणीं विलक्षण आरोपही त्यानें हिंदुलोकांवर लादले आहेत. ते सर्व खोडसाळ आरोप सुधारून मराठींत त्याचा तर्जुमा करावा असें प्रथम मनांत आलें, परंतु तीच गोष्ट पाया धरून त्यावरून स्वतंत्र कथानक लिहावें असें मागाहून वाटल्या कारणानें तसें केलें नाहीं. तर्जुमा केला नाहीं हेंच बरें केलें, असें कथानक अर्धेअधिक लिहून झाल्यावर पूर्ण प्रत्ययास आलें. मूळ गोष्ट आनंदपर्यवसायी आहे. परंतु पुढील कथानक दुःखपर्यवसायी केलें आहे, ह्याचें कारण ह्या प्रस्तावनेच्या प्रारंभीं नमूद केलेंच आहे.

ही गोष्ट जरी अशीच घडली नाहीं तरी अगदीं अशाच फ-र्म्योच्या गोष्टी राजस्थानांत घडून आल्याचीं उदाहरणें इति-हासांत पुष्कळ मिळतील. अल्लाउद्दीन हा पराकाष्टेचा विषयी असून त्या प्रित्यर्थ त्यानें फारच अनाचार केलेले आहेत. कौलादेवी नामक एक रजपूतस्त्री-विवाहित स्त्री ! ! ! मिळवि-ण्यास्तव त्यानें फारच क्रूर कृत्यें केलीं आणि संग्रामही केले. पुढें तिचीच मुलगी त्यानें आपल्या मुलास करून घेतली ! !! कौलादेवीस त्यानें रखेली ह्या नात्यानें आपणाजवळ ठेविली होती. ह्यानें आपल्या चुलत्यास मारून राज्य बळकाविलें होतें. हा शूर होता. ह्यानें २० वर्षे आणि कांहीं महिने राज्य करून हा १३१६ त मरण पावला. रजपूत मुली फार सुरुप असल्या-बद्दलची ख्याती ऐकून अनेक मुसलमानी राजांनीं त्यांचा अभि-लाष धरून हरप्रयत्नें त्यांना लुबाडिलें, आणि कांहींकांहींनीं तर उघड त्यांच्याशीं विवाहच लाविले. असो.

पुढील कथानकांत राणा रतनसिंग हें पात्र फार चमत्का-रिक आहे, ह्मणजे त्याच्या अस्थिर मनाचा आणि कमकुवत-पणाचा मासला कांहीं विलक्षण आहे. त्याचप्रमाणें जयपाळ ह्याची स्वतःचे सामर्थ्या विषयींची सांशंकितता विचार करण्या-सारखी आहे. जयदेवी हें पात्र तर सर्वप्रकारें अनुकरणीयच आहे. असो.

शेवटीं सुज्ञ वाचकवृंदास माझी एवढीच विनंति आहे कीं, त्यांनीं दोषापेक्षां गुणाकडेच-जर कांहीं असतील तर-नजर देऊन ही कृति गोड मानून घ्यावी

भास्कर रघुनाथ दातीर.

---



# आभार.

मित्राचे पूर्ण अभिमानी लेखनपटु मित्र भास्करराव दातीर, यांनी निरपेक्ष बुद्धीनें जयदेवी, देवीकुमुदिनी, नीतिप्रसाद, पहिलेपशवे वगैरे कित्येक नवीन पुस्तकें लिहून नजर पाठविल्या मुळें मित्र त्यांचा अत्यंत ऋणी आहे.

---

# सूचना.

दातीर यानी लिहिलेली देवी कुमुदिनी कादंबरी फारच मनोरंजक आणि चटकदार आहे. अशा बद्दल आह्मीं मागें चार दोन वेळां त्या कादंबरीपैकीं थोडथोडा मजकूर प्रसिद्ध केला होता त्यावरूनच दूर दूरच्या पुष्कळ लोकांनीं शिफारस केली आहे. व आह्मांसही ती गोष्ट कबूल आहे. पण सदर कादंबरी फारच मोठी ह्मणजे लहानसा अरेबियन नाईट्स होणार असल्यामुळें तिला आश्रयही तसा मिळाला पाहिजे तर ती छापून प्रसिद्ध होईल. कोणाची आश्रय देण्याची इच्छा असेल तर त्यांनी आज आपली कबुली कळवावी ह्मणजे छापण्याचा बेत कायम झाल्यावर किंमत कळवूं. किंमत होता होईल तितकी कमी पडेल. त्याविषयीं काळजी नको.

**लोकमित्रकर्ते.**

खानापूर–बेळगांव.

---

चितोड नृपनंदिनी

# जयदेवी.



(एक ऐतिहासिक कादंबरी.)

## भाग १ ला.



इ. स. १३०३ मध्यें चितूर शहरास सहा महिने वेढा घालून दिल्लीचा तख्तनशीनपातशहा अल्लाऊद्दीन यानें तें शहर काबीज करून तेथील राजास कैद केलें आणि तेथें आपल्या वडील मुलास स्थापन करून कैदी राजासह तो दिल्लीस परत आला. ह्या गोष्टीला सुमारें सहासात महिने झाल्यावर ह्मणजे इ. स. १३०४ चे प्रारंभीं कैद केलेल्या राजाची कन्या जयदेवी बरोबर कांहीं दासदासी व बंदोबस्तापुरते लोक घेऊन दिल्लीकडे जाण्यास निघाली. बापावर कोसळलेलें भयंकरसंकट तिला असह्य झालें आणि पितृप्रेमच तिला तिकडे ढकलीत होतें असें ह्मणण्यास कांहीं हरकत नाहीं. रजपूत कन्येला अशारीतीनें बापाचे साह्यार्थ जाणें आणि बायकीप्रयत्नांस तिला यश मिळणें ही गोष्ट अगदीं निराळी तथापि रजपूत स्त्रीयांचे आंगचें धारिष्टच कांहीं विलक्षण असतें. निदान त्यांचें वैभवकाळीं तरी तें तसें होतें आणि आमची नायिका ही त्यापैकींच एक असाधारण कर्तृत्ववान स्त्री होती. असो.

ती एका बैलाचे पडदपोशीन गाडींत आपल्या सख्यांसह बसली असून गाडीभोंवतीं व मागेंपुढें तिचे इतरलोक चालत होते. तिचेंमन अस्वस्थ होतें हें सांगण्याची जरुरी नाहींच तथापि तिचे अंतर्यामी कल्पनातरंगाचें आणि नाना दुष्ट विचारांचें काहूर उसळलें होतें आणि त्यामुळें जरी तिला राहून राहून रडें कोसळत होतें तरी आपले अंतर्यामची स्थिति इतरांस न कळावी अशाबद्दल तिनें विशेष खबरदारी घेतली होती. तरी पण एखादादुसरा अश्रुबिंदु तिचे, ज्यांवर किंचित गुलाबी छटा आहे अशा, गालांवरून उच्च अशा उरोभागीं स्त्रवत असतानां दिसत होता. तिनें भाषण मात्र वर्ज केलें होतें. कारणाशिवाय तोंडांतून शब्दच काढावयाचा नाहीं अशी तिनें प्रतिज्ञाच केली होती असें ह्मणण्यास हरकत नव्हती.

जयदेवीचें वय सुमारें पंधरांपर्यंत असून ती वयांत आली होती. तिची शरीरयष्टी सडपातळ असून तिचे एकंदर अवयव इतके कांहीं मुद्देसूद होते कीं, छिद्रान्वेषी अशांला देखील त्यांत किमपीही न्यून नाहीं असें कबूल करावें लागतेंच. तिचा मुखचंद्र पूर्णेंदुप्रमाणें सौंदर्य आणि तेज याहीं युक्त असून तिचें ललाट भव्य होतें आणि त्यावरून व हरिणनेत्रसादृश तिचे आकर्ण नेत्र, लांब आणि कुळकुळीत पण अगदीं बेताच्याच व रेखलेल्या अशा भिवया, त्याचप्रमाणें काळे कुळकुळीत व लांब सडक केंस आणि मुखावरील दिव्य तेज हीं संपूर्ण तिच्या भाग्यत्वाची साक्ष देत होतीं. इतक्या

परिपूर्ण स्त्रीचा वर्ण " नें अंतरंग पिवळें सरसीरुहाचें " असा असलाच पाहिजे इतकें ज्ञान विधात्यास नसेल असें कधींतरी संभवेल काय? मृदुत्व तरी तिचे ठायीं कां कमी असावें? कारण आपल्या कर्तबगारीची, चातुर्याची आणि कल्पनाविशेष्याची सीमा ह्मणूनच ती प्रतिमा बनवून त्यानें मूस पालथी घातली. न जाणों तिला प्रतिस्पर्धी उत्पन्न करण्याची कुकल्पना मनांत आल्यासही ती सिद्धीस जाऊंनये ह्मणून त्या मूसीचा चुराडाच त्यानें केला असेल. अशी शंका येण्यास सबळ कारण एवढेंच कीं, जयदेवीचे अप्रतिमत्वाबद्दल चोंहीकडून वहावा होत असलेली कर्णीं येऊन कीर्तीच्या भुकेल्या ब्रह्मदेवाला महत्वाकांक्षा उत्पन्न झालीच असेल—आणि ती होणारच—परंतु हातची मूस गेल्याकारणानें त्याला तेवढ्यावरच आनंद मानणें भाग पडलें आणि त्याचे हातून दुसरी पुतळी उत्पन्न झाली नाहीं. होणार नाहीं आणि मागेंही झाली नसेल. फारकरून रजपूतनंदिनी सुस्वरुप असल्याबद्दलची त्यांची ख्याती आहे आणि पृथूराजाची संयोगता अप्रतिम लावण्यवती ह्मणून सर्वत्र बोलवा होती आणि आहे तथापि जयदेवीपुढें तिचा तोरा कधींही चालला नसता. एकंदर कल्पनासृष्टींतील लक्ष्मी, उमा अगर रती ह्यांचेपेक्षांही ती खात्रीनें वरील पायरीवर असून कल्पनासृष्टींची वाढ किंचीत पुढें होऊन सौंदर्यकल्पना प्रत्यक्ष प्रमाणावर बांधता यावी ह्मणून जयदेवी एक कित्ताच होती. रजपूत स्त्रीयांचें अंगचें शूरत्व, धार्ष्ट्य आणि सद्गुणाभिमान इत्यादि गुण तिचेठायीं पूर्ण वसत

होते आणि ह्मणूनच ती अलौकिक बारिष्टूर्यांनें दिल्लीस जाण्यास निघाली होती.

ती जितकी मृदु दिसत होती तितकीच ती कष्ट सोसण्यास कंटक असून विलक्षण साहसी व निश्चयी होती आणि ह्मणूनच तिला प्रवासाचे श्रम वाटत नव्हते. शिवाय पितृप्रेम तिला ओढीत होतें हें मागें सांगितलें. च आहे. ज्याला ज्याला ह्मणून तिचा दर्शनलाभ होई, तिचा मधूर कंठरवाचा मृदू आवाज कर्णरंध्रांत विहार करी, आणि तिच्या दृष्टीशीं ज्यांचें ज्यांचें दृष्टीचें संमेलन होई त्यांची गाळण उडत असे आणि बहुतेकांचे मुखांतून तिजबद्दल आणि तिच्या मातापितरांबद्दल धन्यवाद निघत असे. असो.

अशा रीतीनें जयदेवीची स्वारी चालली असतां अकस्मात चंद्ररश्मि भगवान सूर्यनारायण ह्यास अभ्रांनीं अच्छादूनटाकून अंधकाराची झुळूक दाखविली. प्रचंड मेघ नभमंडळांत कडेकोट तयारीनें इतस्ततःभ्रमणकरूं लागले. जणू काय कोणत्या बाजूनें पृथ्वीतलावर हल्ला करावा ह्याची टेहाळणीच ते करीत होते. झंजावातानें त्यावेळीं उचल खाल्ली. धूळीकामय दशादिशा व्याप्त दिसूं लागल्या. मेघांचा विलक्षण गडगडाट होऊन जलवृष्टी होऊं लागली. वारा, पाऊस आणि मेघांचा तोफेप्रमाणें गडगडाट ह्यायोगें निसर्ग देवतेचें शांत आणि उज्वल स्वरूप बदलून तिचे ठायीं भयंकर उग्रता दिसूं लागली. जवळपास गांव नाहीं. ऐनरानांत ती मंडळी महाप्रलयांत सांपडली. गाडीवरील तट्ट प्रचंड वाऱ्याचे योगानें कोणीकडे उडून गेले त्यांचा पत्ता नाहीं. तोंडचा पाऊस

असल्याकारणानें बैलांचे तोंडावर सपासप मार बसल्या प्रमाणें होऊन त्यांनीं तोंडें फिरविलीं. अनुयायी मंडळींच्या घोंड्यांची तरी तीच दशा. प्रत्येकाचें पाऊल मागें फिरलें. मागें जाऊन तरी उपयोग थोडाच होता. जवळपास गांव खेडें कांहीं असतें तर गोष्ट निराळी होती. पाऊसाची मुसळधार सुरू होती. हनुमानपित्याचे भरारीनें अनेक वृक्ष उन्मळून पडत होते. गाडीचा प्रतिक्षणीं चुराडा होतो कीं काय अशी भीति वाटूं लागली. वरील तट्टे उडून गेल्याकारणानें आंत पाणी येऊं लागलें. जयदेवीच्या सख्यांनीं वरून थोडेंबहुत अच्छादन ह्मणून मोठ्या मुष्किलीनें एक दोन चादरी घातल्या. परंतु त्यांतूनही पाणी आंत गळूं लागलेंच. नशीबानें त्या चादरी मात्र उडाल्या नाहींत. गाडींतील चिरगुटें भिजून चिंब होऊन जड झाल्याकारणानें बैलानां स्वस्थ उभें राहणेंही कठीण वाटूं लागलें. एकंदरींत त्यावेळीं प्रलयकालचा पूर्वरंगच झाला ह्मणण्यास हरकत नाहीं.

तशा पावसांत वाऱ्याशीं झुंजतच ती मंडळी उभी होती. एखाद्या वृक्षाचा आश्रय धरून उभें रहावें तर न जाणो तो उन्मळून पडल्यास सर्वांचीच आहुती घेणार. होतां होतां संध्याकाळ झाली. जास्त जास्त काळोख पडूं लागून पंचमहाभूतांना अधिक चेव येऊं लागला. वारा पाऊस मुळींच पडतें पाऊल न घेतां उलट वाढतेच प्रमाणांवर असलेला पाहून जयदेवीस वाटलें कीं, ही पाहुणीमंडळी आतां रात्रभर कांहीं बिऱ्हाड हलवीत नाहींत, आणि ह्मणून तिनें आपल्या

सेवकांस जवळपास एखादी गुहा अथवा निदान रात्री-ला आसरा तरी आढळल्यास पाहून यावयास सांगितलें. तिच्या सख्या घाबरून जाऊन आपणासहि अपशकून होत असून परमेश्वराचे मनांत आपण दिल्लीस जावें असें नाहीं, असें ह्मणून तिला तें अरिष्ट दूर झाल्यावर परतण्यास विनवूं लागल्या परंतु तिकडे तिनें मुळींच लक्ष दिलें नाहीं. तिचा निश्चय ठरला होता त्यांत कदापिही बदल होणार नव्हता.

इतक्यांत एकाएकीं भयंकर गर्जना होऊन त्यांच्या समोरच असलेल्या एका वटवृक्षावर विद्युत्पात होऊन तो जळून खाक झाला. ती गर्जना आणि विजेचा लोळ पाहून जयदेवीच्या सख्यांनीं तर आपलीं भीतिग्रस्त-वदनें कोमलकरांनीं झांकून घेतलीं. परंतु जयदेवीही थोडीशी घाबरली. आपल्या सख्यांस थोडासा धीर द्यावा ह्या हेतूनें तिनें त्यांस आपल्या कोमल करांनीं हलविलें पण त्यांनीं ह्मणून वर मान केली नाहीं. जयदेवीनें आपल्याकडून जरी बराच धीर धरण्याचा प्रयत्न केला होता तरी तसले प्रसंग आणि भयंकर देखावे तिला अगदींच अपरिचीत असल्यामुळें तिला भीती वाटली. तिचें आंग भीतिमुळें आणि थंडीमुळें कांपूं लागलें. त्या वेळच्या भयंकर प्रलयास मोठमोठाले वृक्षही भेदरून गेले आणि त्यांनीं प्रलयकालास साष्टांग नमन केलें तेथें सकुमार केळींची काय कथा! तथापि आश्चर्य हें कीं, जयदेवीनें तत्काळ मनाला धीर दिला आणि रक्षा झालेल्या वटवृक्षाकडे नजर लावून मनांत परमेश्वराचा धांवा करीत ती स्वस्थ बसली.

यक्षचावत गोष्टींनां आदि,मध्य आणि अंत हे प्रकार लागू आहेत त्या नियमाप्रमाणें महाभूतांचा कोप किंचिन्मात्र शांत झाला. वारा ही पडला परंतु पावसाची झिमझिम सुरू होतीच. ऐन दोनप्रहरीं जेथें प्रत्यक्ष सहस्त्रनयनीं सूर्यनारायणाला अच्छादून प्रचंड मेघांनीं त्याचें कांहीं चालूं दिलें नाहीं तेथें बिच्याऱ्या संधिप्रकाशाची काय मातब्बरी? काळाकुट्ट अंधार पडला. इतक्यांत पाठविलेला मनुष्य येऊन त्यानें पूर्वेस एक लहानशी गुहा असून रात्रभर राहाण्यास तें स्थळ योग्य आणि निर्भय असल्याचें सांगूं लागला. त्या प्रसंगीं अशाप्रकारची बातमी ऐकल्यावर जो आनंद मंडळींनां झाला असेल त्याला कांहीं पारावार सांगतां येईल काय? मुक्या जनावरांना देखील ती गोष्ट कळली. इतकेंच नव्हे पण त्यांनीं आपलीं आंगें झाडून त्या गुहेकडे जाण्याची उतावळी प्रगट केली. पावसांतून, चिखलांतून आणि अंधारांतून ती मंडळी चाचपडत अड-खळत आणि ठेंचा खात खात गुहेपाशीं येऊन पोहंचलीं. थंडीनें बहुतेक मंडळी कांकडून गेली होती. तरी गुहेपाशीं येतांच सर्वांनी खालीं उड्या टाकून भराभर आपलीं वहानें मोकळीं केलीं. आणि एकदोन मंडळी बोज्या बैलांस गुहेचे दाराशींच वृक्षांस बांधून त्यांज पुढें ओलें गवत—भिजलेलें—टाकून गुहेंत शिरली.

बाहेर जर सर्वत्र तिमिराचें साम्राज्य पसरलें होतें. तर ती तर बोलून चालून गुहाच. तथापि परमेश्वराचें नांव घेऊन तीं माणसें आंत शिरलीं. सुदैवानें आंत भरपूर पाचोळा सांपडला. तो चकमकीनें पेटवून त्यांनीं

एकंदर गुहेची पाहणी केली. ती विस्तृत असून स्वच्छ असल्याचें पाहून त्यांस व जयदेवीप्रभृति इतर मंडळींस अत्यानंद वाटला. त्यांतले त्यांत ती क्रूरश्वापदांची विश्रांतिमठी नाहीं हें पाहून त्यांस परमेश्वराचे अगणित उपकार वाटले आणि सद्धर्मशील जयदेवीनें ते उघड बोलूनही दाखविले.

पुष्कळसा पाचोळा जमवून मोठा जाळ केला. त्याचे उजेडानें सर्वांनी चहूंकडे पाहिलें तों गुहेचा विस्तार फारच मोठा असून मुक्या जनावरांचीही आंत सोय होण्यासारखी दिसली. तावडतोब जनावरांना आंत आणून बांधलें. ती गुहा म्हणजे पांडवकृत्यांपैकींच एक असल्याचें त्यांस भासलें. तिचा प्रचंड विस्तार, डोंगरांत पोखरलेलें तें छत आणि ठिकठिकाणी कोरलेलीं कामें व दगडांत बसविलेले मोठमोठाले साखळदंड पाहून त्यांस फार अचंबा वाटला. तथापि त्यावेळीं इतर परिस्थिती अवलोकन करण्याकडे कोणाचेंच लक्ष गेलें नाहीं. दगडी छताला चिकटून बसलेल्या पाकोळ्या आणि पाल, सरड वगैरे प्राणी धूर लागून धडपडत खालीं पडत आणि कांहीं अग्नीचे भक्षस्थानीं पडत तथापि तिकडेहि कोणी फारसें लक्ष दिलें नाहीं. निवाऱ्याची जागा मिळालेली पाहून ज्याचा त्याचा जीव थंड झाला.

भिजलेलीं वस्त्रें पिळून शेकानें तीं वाळविलीं आणि जयदेवीच्या सख्यांनीं तिला कोरडें वस्त्र नेसावयास देऊन अंथरूण घालून दिलें. अर्थात अंथरूण कोणत्याप्रकारचें असेल तें सांगण्याची गरज नाहीं. प्रसंग

म्हणून जयदेवीनें खाट्यावर अंग टाकलें आणि इतर मंडळीही शेकोटी भोंवतीं पसरली. निद्रादेवीचे परम प्रीय कंठमणि शिवाय करून त्या जागीं कोणाला झोंप येणार ? एकमेकांशीं गोष्टी बोलत ती मंडळी पडली होती. जयदेवीचें मन स्वस्थ नव्हतेंच आणि तिला त्रास होईल म्हणून तिच्या सख्यांनींही तिजजवळ बोलण्याचा विचार केला नाहीं. तरी ती जागी होतीच. बापाला कैद करून नेल्यादिवसांपासूनच झोंपेची आणि तिची गडी फूः झाली होती.

इतक्यांत एक नवखा मनुष्य आंत सरळ शेकोटी पर्यंत आला. जयदेवीकडे एकवार त्यानें अवलोकन केलें आणि त्याच पावलीं तो परत निघून गेला. जयदेवीचें तिकडे लक्ष नव्हतें तथापि इतर मंडळीनीं तो मनुष्य मुसलमान असल्याचें ताडलें आणि त्यांस भीतिवाटूं लागली. काय कारण असेल तें असो पण एकानें देखील त्या महंमदी गृहस्थास प्रतिकार करण्याचा प्रयत्न केला नाहीं. तो निघून गेल्यावर एकानें बातमी सांगितली कीं, येथून जवळच मुसलमान लोकांची एक टोळी फिरत असल्याचें मला कळलें होतें- दिल्लीच्या पातशहाचीच मंडळी ती असल्याबद्दलचें मला मागील मुक्कामावर लोक सांगत होते तथापि मी तिकडे दुर्लक्ष केलें. परंतु आतां मला वाटतें कीं, कदाचित् आपण निजलों आहों हेंच तर त्या टोळीचें ठिकाण नसेल ना ?

इतकें तो गृहस्थ बोलतो आहे तोंच पांचचार मंडळी उठून बसली आणि त्यापैकीं एकजण बाहेर

निघून गेला बाकीची मंडळी आपसांतच कुजबुजत होती परंतु प्रत्येकजण घाबरून गेला होता. आणखी पांचचार उठले, त्यांनीं घोड्यावर सामान चढविलें आणि आपलीं हत्यारें सांवरूं लागले. इतक्यांत बाहेर गेलेला मनुष्य आरडाओरड करीतच आंत शिरला. भीतीनें त्याची गाळण उडून गेली होती आणि कंपवायूची लहर आल्याकारणानें त्याची जीभ जागच्याजागीं चिकटून बसली. इतर मंडळीनीं त्याला प्रथम काय झालें ह्मणून विचारिलें, त्याला गदगदां हालविला, शेवटीं त्याची मानगुटी धरून त्यास बडवलाही परंतु " दगा दगा " ह्यापलीकडे त्याची जिव्हा वळेचना. जयदेवीचें तिकडे लक्ष जातांच ती उठून बसली आणि इतर मंडळीस दूर होण्यास सांगून ती स्वतः त्या भेदरलेल्यास विचारूं लागली परंतु तो उत्तर देणार इतक्यांत शेंपांचशें हत्यारबंद व हातीं पेटविलेले तोडे असलेले एकजात पठाण" पकडो पकडो " करीत गुहेंत शिरले आणि सर्वांची त्यांनीं दाणादाण उडविली. कडवे रजपूत तर प्राणजाईपर्यंत लढलेच परंतु चोंहींकडून कोंडमारा झाल्यासारखी त्यांची स्थिति असल्याकारणानें त्यांच्याच्यानें पठाणाचें कांहीइतकेंही नुकसान झालें नाहीं. असें होण्याचें कारण आंत शिरण्याबरोबर त्यांनीं मशाली विझविल्या आणि मोठ्या धूर्ततेनें त्यांनीं एक दोन जणांस यमद्वारीं पाठवून त्यांनीं क्षणभर पाय मागें घेतला. दरम्यान रजपूत मंडळी जी एकदम उठली ती केवळ गैरसमजुतीनें आपसांतच लढूं लागली. एकंदर आरड्यांत कोणाची कोणास दाद

लागेना. रिकामे आणि गैरसावध मंडळीस आंत शिरल्याबरोबरच त्यांनीं लंबे केलें आणि बाकीच्या कडव्यांस तशाच गफलतीनें, मागचेमागें, आपसांत लढतानांच जखडून ठेविलें. ती जागा पठाणाचे पूर्ण-ओळखीची असल्यामुळें त्यांनां कोणतीच गोष्ट जड गेली नाहीं.

जयदेवी आश्चर्य चकित व भयभीत होऊन परमेश्वराचा धांवा करीत एका बाजूस उभी होती. तिचें सर्वांग लटलटां कांपत होतें आणि प्रसंग खडतर आला असल्याचें तिला स्पष्ट दिसत होतें. तरी परमेश्वर आपला वाली आहे असा मनाला धीर देण्याचा प्रयत्न तिचा चालू होता. ओरड, दंगल, आणि सर्वांजनांच्या हृदयभेदक आरोळ्या तिच्या कानीं येत होत्या परंतु ती काय करणारी. शूर अबला असली तथापि तशा प्रसंगीं तिचें काय चालणार! तिला आधीं चाललें आहे हें काय, हेंच पुर्तेपणीं समजलें नाहीं असें म्हटल्यास हरकत नाहीं. कारण अचानकआलेली मुसलमानांची टोळी ही कोण? दरवडेखोर, लुटारू किंवा एखाद्या पातशहाची सेना हें तिला कळलें नाहीं. तरी प्रसंगीं आपण सावध असावें म्हणून तिनें आपला जंबिया हातांत धरिला होता.

ती मनांतले मनांत एकंदर वस्तु स्थितिचा विचार करीत आहे तोंच तिचा कोणी हात धरला आणि "हेंच तें गुलाबाचें फूल" असें म्हटलेलें तिच्या कानीं आलें. त्यावेळीं ती आपली कर्तबगारी दाखविती. परंतु हातांतील जंबिया केव्हांच त्या हात धरणाऱ्या

मनुष्यानें काढून घेतला होता. अंधारांत तो मनुष्य आला केव्हां आणि कोण हें तिला कळलेंच नाहीं. " ऐ, गुलनार " म्हणून पुढें तो तिच्या हनुवटीस हात घालणार तोंच त्यास मागून कोणी ओढलें, परंतु तितक्यांत त्यानें असा कांहीं शिताफीनें हात चालविला कीं, झटक्यासरशीं. मागून धरणारा इसम, खालीं पडला आणि मोठी किंकाळी फोडून त्यानें प्राण सोडला.

त्या झटपटींत किंचित धैर्य धरून जयदेवीनें खालीं पडलेला जंबिया उचलला आणि तिला स्पर्श करणाऱ्यावर तो तिनें चालविला परंतु तिच्या कमनशीबामुळें अगर तसें होणार म्हणून म्हणा तो तिचा नेम चुकून शिरस्त्राणावरच बसला आणि त्या दुष्टमनुष्यानें तिचे दोन्हीं हात धरून तिला दरडावून सांगितलें " औरत असून जर गमजा करशील तर हातपाय बांधूनच तुला न्यावें लागेल. नाहींपेक्षां– "

त्याचें भाषण पुरें होऊं न देतांच ती रागानें म्हणाली " कमअस्सल तुझें नशीब जोरावर, नाहींपेक्षां तुला अल्लाचीच भेट करविली असती. चितोडच्या पराक्रमी राणा रतनसिंगाची नंदिनी तुझ्यासारख्या माकडाचे दरडावणीस कधींच मीठ घालणार नाहीं परंतु सर्वस्वी ती निराधार झाली.

---

# भाग २ रा.



प्रभातकाल झाला. अहाहा चितोडराजनंदिनी **जयदेवी** जर अद्याप पित्याचे वैभवसुखाचा स्वाद घेत असती तर तोच प्रभात समय तिला किती अल्हादजनक झाला असता? तिमीरांतक बालरवीचें आगमन सुचविणाऱ्या चंडोलाचे मधुर गायनाकडे तिचें लक्ष वेधून गेलें असतें. तिच्या आरामस्थानीं टांगून ठेविलेल्या आणि शयनमंदीराचे सभोंवारचे वृक्षांवर स्वच्छंदानें क्रीडा करणाऱ्या पक्षादिकांनीं तिला प्रभात समयाची सूचना दिली असती, **चारण, भाट, बंदीजन** इत्यादिकांचे स्तुतिपर आल्हाहनानें तिला प्रभातकालची स्मृति झाली असती, शयनमंदीरासमोरच्या एकलिंगजीच्या देवालयांतील प्रभातसूचक मंगल वाद्यांनीं तिचें मन प्रफुल्लित करून एकलिंगजीची तिला आठवण करून दिली असती, तिच्या आवडत्या मयूरानें गवाक्षद्वारें तिच्या पर्यंकावर उड्डाण करून निजसमोर आपला चित्र विचित्र पुच्छसमूह पसरून दाखवून तिचे मनांत प्रेमा उत्पन्न करविला असतां, सखी जनांनीं मर्यादशील शद्बानीं तिला नित्य नैमित्यीक करण्यास सुचविलें असतें आणि पूज्य व पवित्र अशा विप्रवरांनीं तिचें प्रभातकालीं मंगल चिंतीलें असतें परंतु मागील भागांत सांगीतलेली दंगल आटोपल्यानंतरचा प्रभातकाल तिला किती विलक्षण वाटला असेल

बरें! तोच बालरवि आणि तीच जयदेवी परंतु खडतर भवितव्यतेमुळें तिची कशी दुर्दशा झाली!! हाय, हाय, दैवगति किती विचित्र आहे!!! असो.

गुहेचे द्वारांतून बालार्करवीचे किरण आंत येऊं लागले. रात्रीच्या घोटाळ्यांचें यथास्थित ज्ञान जयदेवीस झालें आणि आपणांस धरणारा इसम त्या टोळीचा नायक असल्याचेंही तिला दिसून आलें.

मुसलमान लोकांचे मोठे मोठे हुक्के पेटले. रजपूतमंडळींनेंही गुडाखू ओढण्यांत आळस केला नाही. कारण ते निशस्त्र पण मोकळेच होते. त्यांना सुटका मिळेल असें अश्वासन मिळालें होतें आणि दंगा फिसाद करणें म्हणचे निव्वळ मरून जाणें अतएव व्यर्थ असें त्यानां पक्कें कळून चुकलें होतें. मुसलमान लोकांच्या लांब लांब थापांचा व आत्मश्लाघेचा सुकाळ चालला होता. इतर मंडळी हळू हळू आपले नित्य क्रमास लागली. रात्रीचे दंगलीत सांपडून इजा पावलेली मंडळी मात्र जागचे जागीं वेदनांनीं तळमळून, इतर मंडळीस दुवा देत, पटापट प्राण सोडीत होती.

जयदेवीची स्थिती तर फारच चमत्कारिक झाली होती. तिचें अंतःकरण नानाप्रकारच्या भयंकर कल्पनांनीं इतकें कांहीं गढूळ होऊन गेलें होतें कीं, तिचें तिलाच देहमाननाहीसें झालें होतें. ती अंथरुणावरच पडली होती. तिच्या मनांतील व्यापारामुळें परिस्थितीकडे तिचें बिल्कूल लक्ष नव्हतें. प्रातर्विधी, वेणीफणी आणि खाणें पिणें ही देखील तिनें नको ह्मणून सोडून दिलीं. नेमाप्रमाणें तिच्या सख्यांनीं, तिला, तिनतिनदां वेणी

फणी करण्या बद्दल, विचारिलें परंतु सगळ्या गोष्टींस तिजकडून नकारच मिळाला. वास्तविकच आहे. तिच्या अंतःस्थितीचें सार्थ ज्ञान तिच्या सख्या कितीही चतुर असल्या तरी त्यांस कसें व्हावें?

साधारण उन्ह पडल्यावर मुसलमानी टोळीचे अंमलदारानें सर्वांस आपापलीं कर्में आटोपून तयार होण्याबद्दल फर्माविलें आणि जयदेवीपाशीं येऊन तो ह्मणाला "परस्तानच्या सुवासिक पुष्पा, तूं व्यर्थ दुराग्रह धरून शरीराचे हाल करून घेऊं नकोस. पूज्य पैगंबराची ज्यावर प्रीति आहे अशा आमच्या हुजुरांनीं तुजबद्दल आपली इच्छा दर्शविली असून तिकडे दिल्लीस नेण्या बद्दल, तुला सुरेश्वरी बनविण्याबद्दल, मला जरूर त्वरा केली पाहिजे. अस्मानच्या देदिप्यमान ताऱ्यापेक्षांही सतेज असें तुझें तेज पाहून जगत्पति तुजवर खुष होतील. तुला आपली पट्टराणी करितील आणि अर्थातच तूं मग राज्ञी होऊन तुजपुढें अमर्याद प्रजाजन नमन करीत राहील."

त्याच्या बोलण्याकडे तिचें लक्षच नव्हतें. तो पुढें ह्मणाला "परस्थानचे परी, तुजसारख्या अमोल रत्नास कंठाशीं आंवळून बांधणारा, तुझे पायीं अक्षयी गुंग होऊन रहाणारा असा पृथ्वी पालक अल्लाऊद्दीन तुझी वाट पहात आहे. त्याचेच हुकुमावरून मी तुझे शोधार्थ हिंडत होतों. अल्लानें खैर केली आणि तुझें तकदीरही जोरावर आहे ह्मणूनच आज तुझा मला शोध लागला. असो. आतां लवकरच आपण दिल्लीस जाऊन पोंचूं. थोड्याच वेळांत पैगंबरापेक्षां दुसरा कोणी

ज्याचेवर चढ नाहीं अशा समुद्रवलयांकित राज्य करणाऱ्या गुलहौशी अल्लाऊदीनाच्या आलिंगन सुखास तूं पात्र होशील ऊठ ''

तिरस्कारभावयुक्त जयदेवी ह्मणाली " काय, तुह्मी काय बडबडतां आहां. जो काफर, हिंदुधर्म आणि हिंदुलोक ह्यांचा कट्टा दुष्मन त्यास भलभलतीं मानाचीं विशेषणें देऊन त्याचा मजपुढें गौरव करीत आहां! तुमचे तोंडांत माती पडो. जो परस्त्रीचा अभिलाष धरितो तो परमेश्वरकृपेस पात्र आहे असें तुमचा धर्म तुह्मांस सांगतो काय? निरापराधी स्त्रीस गांजून पातिव्रत्य भ्रष्ट करण्याचा जो नीच प्रयत्न करतो तो न्यायी आणि सर्ववंद्य काय? धिःकार. मेहरबान धर्मशील आणि हिंदुत्वाचा पूर्ण अभिमानी अशा शूर चितोडच्या अधिपतीची मी कन्या आहे. दैवदुर्विलासानें सिंहास सांपळ्यांत अडकून राहण्याची पाळी आली आहे तेव्हां त्याचे प्रित्यर्थ दिल्लीस जाऊन कांहीं प्रयत्न करण्याकरितां मी जात असतां तुह्मी मध्येंच माझा घात करावा ह्यांत खरोखर भूषण नाहीं. "

तो अंमलदार ह्मणाला " जगताचे प्रकाशा! तुझ्या एका शब्दानेंच तें काम होणार आहे. पृथ्वीपतीजवळ नुसती गोष्ट काढण्याचीच खोटी कीं, ताबडतोब तुझ्या प्रिय पित्याची सुटका होईल, इतकेंच नाहीं तर त्याला परत चितोडपदावर अधिस्थापन केला जाईल. श्वशुराचा मान योग्यप्रकारें राखला जाईल. तुझ्या फक्त वचनावर सर्व अवलंबून आहे. हे परी, तुझ्या वचनाचा मान पातशाहाकडून फारच उत्तम राखिला जाईल. तु-

इच्या फक्त वचनाचाच तो भुकेला राहील. अस्मानचें परस्तान, आणि त्यांतील परी हीं देखील तो तुजकरतां ह्या लोकीं आणील. तुझ्या वचनावर हजारों दासदासी, बंदीजन आणि संपूर्ण प्रजाजन, फार तर काय पण प्रत्यक्ष तरुनाधिपतीही, झुलत राहील. सर्वांगसुंदरे रजपूत नंदिनी अनेक सेवकजन तुझी सर्वकाळ आज्ञा शिरसामान्य करितील, आणि तुजपासून मेहेरबानीचा प्रसाद इच्छितील. पूज्य अल्लाची मजवर मेहेरनजर झाली आणि ह्मणूनच माझा उदयकाळ आला आहे. तुला खाविंदाचे चरणीं अर्पण—नव्हे त्याचे स्वाधीन केल्यावर अर्थात माझी सेवा ते कधींही विसरणार नाहींत आणि स्वामिणी आपलीही मेहेर नजर मजवर राहिली पाहिजे.

कटु वाक्शरांनीं जयदेवीचे हृदयास घरें पडलीं असतील हें कशास सांगितलें पाहिजे. तथापि ती धैर्य धरून ह्मणाली! " मेहेरबान, पुरे, पुरे. आपलें राजवैभववर्णन पुरें करा. मी त्याची भुकेली नाहीं. धर्म, जात आणि अब्रू, गमावून उच्च वैभवाची इच्छा करणारी स्त्री मी नव्हे. समुद्रवलयांकित जरी तुमच्या परस्त्रीभिलाषी राजयाचें राज्य असलें तथापि त्याचा मला कांहीं उपयोग नाहीं. मी रजपूत बाला असून हा शुद्ध देह रजपूत धुरंधरापैकीं एकास मी अर्पण केला आहे. तेच ह्या देहाचे चालक, मालक आणि अंतकही आहेत. मेहेरबान, मुसलमानी रिवाजाप्रमाणें आह्मांत छिचोर चाली नाहींत, आणि परमेश्वरकृपेनें तशा छिचोर स्त्रिया ही आह्मां रजपूतांत नाहींत.

अशुष्ट मलीनता प्राप्त करून घेऊन जगांत वैभव भो-
गण्यास जिवंत राहूं इच्छिणाऱ्या राक्षसी स्त्रिया आम-
च्यामध्यें नाहींत. शुद्धाचरणाचें बीज आह्मां स्त्रियांत
पूर्ण रुजलें असून आमचें कडकडीत शुद्ध आचरण हेंच
आह्मांस प्रीय आहे. मला तुमच्या वृथा वल्गना न-
कोत. एक तात्पर्य.काय, मी तुमचें स्वाधीन झालें नव्हे
हातांत सांपडलें आहे, तेव्हां मी बंदीवान असेंच सम-
जायेंच काय!

तिच्या प्रश्नास सरळ उत्तर न देतां तो ह्मणाला
" तुह्मीं विचार करून पहा. जगस्वामिणी तुह्मीं उ-
द्यां होणार. सर्व जगास पूज्य अशा तुह्मीं होणार.
सुखाचे अत्युच्च आणि अढळ शिखरावर तुह्मांस जागा
मिळणार. संपूर्ण जगाचा पालनकर्ता आणि नियंता
जो परवरदीगार त्याचे परमप्रिय भक्ताचा जनाना शो-
भायमान करणार. हजारों दासदासीकरवीं सेवा
घेणार, नानाप्रकारचे ऐषआराम भोगून कल्पनाशक्तीचे-
ही पलीकडील अशा स्वर्ग सुखाचा स्वाद घेणार. ज्याचा
दरारा मोठा, कीर्ति मोठी, मान मोठा; सर्वांचा जो
शास्ता, त्राता आणि प्रत्यक्ष जीव, मांडलिक राजांचा
पूज्य पुतळा. असा जगत्पति अल्लाऊद्दीन हा देखील
तुझा दास बनून तुझ्या अर्धवचनांत राहणार. तेव्हां
अशा अप्रतीम सुखाधिक्याचें तुह्मांस कांहींच वाटत
नाहीं काय? सुखाकरितां सर्व प्राण्यांची तळमळ चाल-
ली असून तुह्मीं त्याबद्दल विन्मुख कां होतां? तुमचे
पित्याप्रमाणें हजारों रजपूत मांडलिक, आपआपल्या,
कन्या राजपदीं अर्पण करण्यास तयार असतां एकट्या तु-

ह्मां वांचून त्या महात्माचें मन दुसरीकडे वेधत नाहीं. तु-ह्मींच त्यांची प्राणदात्री देवता, सुखसर्वत्रांची मूस आ-णि सार्थकतेची परमावधि अशी त्यांस भासत आहां हे आपल्या सुदैवाचेच खेळ नव्हत काय?

परंतु जयदेवीनें तोंडाला खीळ घातली. कांहीं वेळानें तो आपल्याशींच ह्मणाला " मौन्य हें मान्यता दर्शकच समजावयाचें. पुढें वाढून आलेल्या सुखावर कोणी उदक सोडील काय? सुख हें कोणाला नको आहे! ऐश्वर्याचा भुकेला नाहीं असा एक तरी प्राणी जगांत आढळणार आहे काय? "

त्यानें सर्व मंडळी तयार झाली असें पाहून निघ-ण्याची इशारत दिली. सर्व तयारी झाली. जय-देवीचे वाहनाची तत्पुरती डागडुजी करून तिला गा-डींत बसण्याची त्यानें इशारत दिली. ती मुकाट्यानें गाडींत बसली आणि सर्व मंडळी मार्गक्रमण करूं ला-गली. जयदेवीच्या सख्या तिजबरोबर गाडींत बस-ल्या होत्या आणि गाडी झांकून घेतली होती. गाडी-मागें मुख्य अंमलदार असून इतर रजपूत मंडळी चों-ही बाजूनें पठाणांचे बंदोबस्तांत होती.

थोडावेळ मार्गक्रमण केल्यावर जयदेवीचे गाडीचे बैल अडूं लागले. कारण नेहमींचा गाडीवान त्या वेळीं गाडीवर नव्हता. एक आडदांड मुसलमान गाडी हांक-त होता. बैलास संवयीप्रमाणें चालीवर धरणें त्यास कसें उमजणार? अर्थात बैलांचे ही हाल होऊं लागले. ते बैल हांकणाऱ्यानें चाबूक फडकावला कीं, मड्यासारखे जागचेजागीं उभे राहात. चुचकारून गोंजारून

थेतल्यावर थोडावेळ चालत परंतु पुनः अडून उभे रहात. अशा त्रासानें तो नूतन गाडीवान कंटाळून गेला आणि स्वभाव व जाति धर्माप्रमाणें त्यानें बैलांस खूप शिव्या हांसडल्या आणि तोंडाच्या पट्ट्या-बरोबर चाबकाचाही सपाटा चालविला. बैल पडले तामसी स्वभावाचे. त्यांनीं मार कांहींवेळ सोसल्यावर जी दौड ठोकली ती हांकणाऱ्याचे प्रयत्नास न जुमा-नतां आडवाटेंत शिरून गाडी एका खड्यांत पाडली. गाडीचें एक चाक खड्यांत जाऊन दुसरें चाक वर झाल्याकारणानें ती एका बाजूस कलंडली आणि आंती-ल मंडळीनें भडाभड बाहेर उड्या टाकल्या. गाडी हांकणाऱ्यानेंही खालीं उडी टाकून बैलांवर यथेच्छ ताव झाडला परंतु बैलांनीं जी बैठक मारली ती कांहीं मोडली नाहीं. त्या बैलांनीं उठावें ह्मणून नवऱ्यामंड-ळींनीं नानाप्रकार केले परंतु व्यर्थ. शेवटीं सगळे जण टेंकीस येऊन त्यानीं गाडी वर काढण्याचा प्रयत्न केला पण चाक जें खड्ड्यांत गेलें होतें तें तर मोडलेंच आणि वरच्या डोलाऱ्यालाही थोडीशी इजा पोंचली.

हा प्रकार पाहून तो अंमलदार जयदेवीस ह्मणा-ला आतां नाईलाज झाला. मेहेरबानीनें आपण घोड्या-वरून प्रवास कराल काय?

नाहीं. कदापि नाहीं. रजपूत स्त्रीनें बुरख्याचे गाडी शिवाय अथवा मेण्या शिवाय कोणत्याही इतर वाहनांत बसणेंअगर घोड्यावर बसणें इष्ट नाहीं आणि ह्मणून मी ही गोष्ट बिलकूल कबूल करणार नाहीं. जयदेवी निक्षून ह्मणाली.

अशा अडचणीचे वेळीं भलताच हट्ट धरून काय उपयोग? महाराज्ञीपदावर जीची योजना लवकर होणार आहे अशा स्त्रीनें भलत्याच वेळीं हट्ट धरून बसणें बरें नव्हे. स्वपदावर आरूढ झाल्यानंतर आणि सर्व यथास्थित असल्यावर हट्ट धरल्यास तो शोभून जातो. ह्या वेळीं आतां घोड्यावर बसून मार्ग क्रमण करण्यापलिकडे दुसरें काय साधन आहे बरें? आपण समंजस आहांत " तो अंमलदार लीनतेनें ह्मणाला." अदले रात्रींच त्यानें जो थोडा आडदांडपणा केला तव-ढाच. पुढें आणि मुख्यत्वें सकाळपासून तो जयदेवी-शीं नम्रपणानेंच वागत होता.

जयदेवी बुरखा घेऊन तशीच उन्हांत बसली. न बोलतां जितकें कांहीं होईल तितकें करण्याचें तिनें योजिलें होतें. सखीजनाशीं देखील तिनें भाषण वर्ज केलें होतें.

ती कांहींच बोलत नाहीं असें पाहून तो अंमलदार पुनः ह्मणाला " पहा अशा प्रसंगीं दुराग्रह धरणें ह्मणजे अगदीं अनिष्ट आहे. सुंदर स्त्रीयानां राग अनि-वार असून त्या पक्क्या दुराग्रही असतात आणि तसा-च त्यानां अपमान बिल्कूल सहन होत नसतो परंतु प्रसंगाला अनुलक्षून त्यांचें वागणें असतें. त्यांचे ठायीं शहाणपणाही पुष्कळ असतो "

तरीही जयदेवी गप्पच होती.

ती जागची हलतही नाहीं आणि उत्तर ही देत नाहीं हें पाहून किंचित रागाविर्भाव आणून तो ह्मणाला " आमचें ह्मणणें पसंत नसल्यास पुढील

मुक्कामापर्यंत चालत चलण्याची इच्छा असल्यास आ-
मच्या कडून कांहीं ना नाहीं."

जयदेवी उठली. तिजबरोबर तिच्या सख्याही उठल्या आणि पायानें ती मंडळी मार्ग क्रमूं लागली. अंमलदारही थोडावेळ घोड्यावरून उतरून चालला, परंतु त्याचें तसें करणें नुसतें तोंडापुरतेंच होतें.

हाय, हाय, ज्या जयदेवीला उन्हाचा स्पर्श देखील कधीं माहीत नव्हता, प्रवास ह्मणजे जिचा नेहमीं बुरख्याचे गाडींतूत अगर मेण्यांतून तिला अनवाणी उन्हांतून प्रवास करावा लागावा! दैवदुर्विलासाचा खडतर तडाखा!!!

ती कितीही सोशीक असली, विवेकी आणि धीट असली तरी प्रवासाचे कामीं अगदींच अपरिचीत. तशांत उन्हांतून अनवाणी चालण्याचा प्रसंग, पोटांत अन्नलेश नाहीं, रात्रीं झोंप नाहीं आणि चित्ताला स्वस्थता नाहीं अशास्थितींत तिच्याच्यानें कितीसें चालवणार? जिचें पदद्वय कधींही भूमीस स्पर्श करणारें नव्हे, जिला बापाचे वैभवप्रसंगीं कोणत्याही प्रकारची दगदग, श्रम, कष्ट आणि त्रास माहीत नव्हतें तिजवर एकाएकीं असा प्रसंग यावा यापेक्षां दुःखद कोणती गोष्ट होय?

जिनें स्वपित्याचे गृहीं आनंदानें, मौजेनें, विनोदानें आणि नेहमीं सुखासमाधानानें दिवस कंठावे, दासीजनांकरवी सर्व प्रकारची सेवा घ्यावी, नानाप्रकारच्या सुखकारक वस्तुंचा उपभोग घ्यावा, आपल्या मधुर कोकिलसम आवाजानें त्यांचे-आईबापांचे-कर्ण तृप्त क-

रावे, सेवक जनांशीं अत्यंत सौम्यपणानें आणि मोकळया मनानें वर्तन ठेऊन त्यांचे करवीं धन्यवाद घ्यावा आणि सर्वां करवीं अभिष्ट चिंतून घ्यावें तीच जयदेवी रानांत क्रूर पशूपेक्षांही भयंकर, विधर्मी, छलक आणि दुर्गुणांचे मूर्तिमंत पुतळे अशा मुसलमानांचे तडाक्यांत सांपडून, त्यांची बंदीवान होऊन, अनवाणी मार्ग क्रमण करूं लागली हें पाहून पंचमहाभूतांनाही तिची दया आली असेल !!!

त्या कोमल गात्री जयदेवीनें अनवाणी कितीशीं पाउलें टाकिलीं असतील? जरी वैतागानें ती चालूं लागली तरी वैतागलेल्या मनाचा हुकूम तिच्या मृदु चरणांवर कितपत चालणार? अर्थात तिला तें दुःख असह्य होऊन घेरी आली आणि ती धाडकन धरणीवर पडली.

सखीजनांनीं तिचे शरीरास त्या मुसलमान अंमलदारास हात लावूं दिला नाहीं. त्यानेंही तितका आग्रह धरिला नाहीं. तिच्या सखीजनांनीं तिच्यावर सांवली धरून, तिला सावध करण्यास्तव प्रयत्न केले आणि त्यांत त्यांना यशही आलें. जयदेवीनें आपले काळेभोर पण निस्तेज झालेले नेत्र उघडून सखीजनांकडे अवलोकन केलें आणि तशीच दृष्टी शेजारीं उभा असलेल्या अंमलदाराकडे फिरविली परंतु त्या दृष्टींत महदंतर होतें. तिचे नेत्रांतील जाज्वल्य तेजावरून ती पूर्ण कोपयुक्त होऊन आपणाकडे पहात आहे हें जाणून तो अंमलदार ह्मणाला " आपण होऊन अंगावर संकट कोसळून घेतल्यावर तेथें दुसऱ्यानें काय करावें? तरी पण

अजूनही जर आपण हा दुराग्रह सोडला तर आपल्या-ला आराम वाटेल. ही जागा आपली मुक्कामाचीही न-व्हे किंवा मुक्काम करण्याचीही नव्हे ह्मणून जर आपण घोड्यावर आरूढ होऊन थोडासा मार्ग कंठाल तर लवकरच आपण सुस्थळीं मुक्कामावर जाऊन पोंचूं आणि तब्बेत बरोबर नसेल तर तेथेंच एक दिवस मुक्काम करूं."

जयदेवीनें त्याजकडील दृष्टी तर फिरविलीच होती परंतु वरील शब्द तिचे कानावर पडतांच तिनें आपल्या कोमल पण आरक्त झालेल्या अशा हस्तांनीं आपली नापसंती दाखविली.

त्या अंमलदारानें दूरवर एखादी निवाऱ्याची जागा आहे कीं काय ह्मणून पहाण्यास आपली नजर फिर-विली तों त्यास पूर्वेकडील बाजूनें कांहीं स्वार दौडत येत असलेले दिसले. तो क्षणभर भयचकित झाला परंतु लगेंच त्यास कांहीं आठवल्यासारखें होऊन तो आप-णाशींच ह्मणाला "अगदीं ऐन वेळीं येऊन पोंचले उत्तम गोष्ट. हिच्या दुराग्रहानें मी तर अगदीं म्मठ्या-ला आलों आहे. तेव्हां त्यांपैकीं कांहींची योजना हि-ला वाहन मिळविण्यास्तव पुढें पाठविण्याचे कामीं क-रावी ह्मणजे ठीक पडेल. मजजवळ आहेत हे लोक अगदींच अपुरे आहेत न जाणो वखत आहे"

याप्रमाणें तो आपणाशींच पुटपुटत आहे इतक्यांत दौडत येत असलेली मंडळी अगदीं नजीक येऊन ठेप-ली. अंमलदारानें ती मंडळी पहातांच त्वरा करून सावध राहण्याविषयीं आपले मंडळीस इशारत केली.

कारण ती मंडळी रजपूतवीर असून त्यांचा रोख आप-
णांवरच आहे हें त्यानें ताडलें.

मुसलमानमंडळी चौफेर उभी राहून त्यांनीं जयदे-वी व तिच्याबरोबरच्या मंडळीस मध्यें घातलें. ते सायुध असून तयार होतेच. दौडत येत असलेल्या मंडळी पैकीं बहुतेक मंडळी लगटली दोन्हीं बाजूकडील मंडळींची चकमक झडली, इतक्यांत आपली बाजू लंगडी पडते असें दिसून येतांच मुसलमान अंमलदारानें जय-देवीस उचलून घेऊन पोबारा करण्याचा विचार केला आणि त्याप्रमाणें तो जयदेवी जवळ जाऊन तिला उ-चलण्यास्तव घोड्यावरून खालीं उतरला. जयदेवीला आधींच शीण आल्यामुळें त्रास झालेला होता. उन्हानें तापानें भोंवळ येत होती आणि दुःखातिरेकानें तिचें मनही अस्वस्थ होतें शिवाय ही दंगल उडत असलेली पाहून, जरी, दुसऱ्या मंडळीच्या " हरहर महादेव " इत्यादि वीरश्रीच्या आरोळ्यावरून ते हिंदुच आहेत असें तिला पक्केपणीं कळून चुकलें होतें जरी तिनें नेत्र झांकून घेतले होते आणि मनांत ती परमेश्वराचा धांवा करीत होती.

तो अंमलदार तिजजवळच उतरला आणि अत्यंत चपलतेनं आणि शिताफीनें त्यानें जयदेवीस उचललें. आतां तो तिला प्रथम घोड्यावर ठेवणार इतक्यांत अशा कांहीं अचुक नेमानें त्याचे दोन्हीं हातांवर वार झाला कीं, त्यासरशीं जयदेवी त्याचे हातून सुटली आणि " या अल्ला, या खुदा, " करीत तो खालीं आदळला. जयदेवी जमिनीवर तशा स्थितींत आदळती

तर तिच्या कोमल शरीराची काय अवस्था झाली असती! शिव, शिव त्याची कल्पनाच नको. परंतु तितक्यांत तिला कोणी फुलासारखें अलग झेलून धरिलें आणि तिच्या कानीं " प्रिये जयदेवी " असे प्रेमयुक्त शब्द पडले. तिनें आपले विशाल नेत्र उघडून त्या इसमाकडे अवलोकन केलें आणि अत्यंत आनंदानें " प्रिया जयपाळ " असें ह्मणून ती झटदिशीं उभी राहिली आणि सप्रेम त्या पुरुषास तिनें मिटी मारली.

---

## भाग ३ रा.

परमेश्वरानें आपणावर आज महदुपकार केले ह्यांत संशय नाही. प्रिये जयदेवी ज्यावेळी तूं चितोड सोडून दिल्लीची वाट धरिलीस ही वार्ता माझे कानीं आली त्यावेळीं माझी काय स्थिती झाली हें मला आतां पुर्तेपणीं सांगतां येत नाहीं. क्षणभरही मला चैन पडेना. मी लगेच तुझ्या शोधार्थ हे माझे शूर पट्टे बरोबर घेऊन निघालों. मार्गांत पाऊस विजा, वारा इत्यादिकांनीं आमची बरीच कुचंबणक केली. शेवटीं आजच सकाळीं तूं शत्रूचे हातीं सांपडल्याची अत्यंत दुःखद वार्ता मला कळली ह्मणून मी मोठ्या दौडीनें ह्याठिकाणीं आलों. वहावा! काय अजब लीला आहे त्या विधात्याची!" असें ह्मणून जयपाळानें जयदे-

वीची हनुवटी धरून तिला विचारिलें " प्राणेश्वरी, नीच मुसंड्यांनीं तुझे हाल तर केले नाहींतना ?

" हाल " सस्मित, जयदेवी ह्मणाली " मी ते हाल, असें कसें ह्मणूं? कारण त्यांचेच योगानें आज मला इकडले चरण दिसले. नाहींपेक्षां आपले भेटीची आशा कोठें होती ?"

" असो, झालें तें ठीकच झालें " जयपाळ ह्मणाला " जगदीश जें जें कांहीं घडवून आणतो तें तें सगळें मनुष्याचें हितासेच असतें. मला वाटतें जर मजकडून निवण्यास यत्किंचित हयगय झालीअसती तर काय प्रसंग गुदरला असता आणि तुझी काय अवस्था झाली असती हें कांहीं वदतां येत नाहीं. कदाचित् तुझी माझी चुका-मुक पडून तूं दिल्लीस जाऊन पोंचली असतीस आणि त्या काफीर पातशहानें तुला—छेः छेः महानीच यवन लोक. "

आंगावर कांटा आल्यासारखें करून जयदेवी ह्म-णाली " सौभाग्यमंदिरा, रजपूतस्त्रीया अब्रूला कलंक लावून घेणाऱ्यापैकीं नव्हत. पातशहाचे नीच हेतुचा उच्चार त्या अल्लाचे भेटीस गेलेल्या मुसंड्यानें मजसमोर केला होता आणि त्याचवेळीं माझा निश्चय ठरला होता कीं, दिल्लीजवळ जातांच ह्या आंगठींतील जहर खाऊन प्राणत्याग करावयाचा पण त्या नीच पातशहाचें मुखा-वलोकनही करावयाचें नाहीं. परमेश्वराची करणी कांहीं विचीत्र आहे आणि ह्मणूनच मला आज आपली भेट झाली."

" असो. आतां तुला जेसलमीरास पोंचवून मग मी दिल्लीस जातों." जयपाळ ह्मणाला.

काय? आपण दिल्लीस जाणार? जयदेवी ह्मणाली. तिचे चेहऱ्यावर भीतीचीं चिन्हें दिसूं लागलीं. " त्या दुष्ट पातशहाचे नगरांत जाण्याचें आपणांस काय प्रयोजन आहे!"

" सुखदात्रे, तुझ्या पूज्य आणि प्रिय पित्याला त्या काफीर पातशहानें पकडून नेऊन बंदींत टाकलें आहे-ना? मग त्यांचे मुक्ततेबद्दल कांहीं खटपट करणें नको काय?" जयपाळानें उत्तर दिलें.

गोरेंमोरें तोंड करून जयदेवीनें जयपाळाचे कंठांत हात घालून विचारिलें " पण आपण एकटे जाऊन काय करणार? आपण बंदीखान्यावरील वीर-महावीर मंडळींशीं झुंजून बाबानां सोडवून आणणार काय? छे."

" काय पाहिजे तें करून मी त्यांना सोडवून तर आणणार. जयदेवी, प्रसंगीं एकाचे मनुष्याचे हातून महत्कार्यें होत असतात. माझा तर असाच निश्चय ठरला आहे कीं, पौर्णिमेच्या आंत बाहेर त्यांना सुखरूप जेसलमीर येथें आणावयाचें. तुझी प्रीतीच मला फार उपयोगी पडेल. जयदेवी आपल्या विवाह प्रसंगीं तुझ्या पित्यानें हजर असणें योग्य नाहीं काय?" जयपाळ ह्मणाला.

किंचित लज्यायुक्त स्मित करून जयदेवी ह्मणाली " हें काय विचारणें? कन्यादान त्यांचे वांचून कोण करणार!" इतकें ह्मणून तिनें लज्जेनें मान खालीं घातली.

" झालें तर मग आपलें कर्तव्य आपणच बजाविलें

पाहिजे आणि प्रिये जयदेवी तुझ्या पित्यास सोडवून आणून मग तुजबरोबर, माझा विवाह झाला तरच त्यांत गोडी आहे, तुझ्या पित्याला सोडवून आणणें हीच स्वयंवराची अट आहे असेंच आपण समजूं. वाङ्‌गनिश्चय अगोदर झाला असला तरी" जयपाळ इतकें ह्मणतो तोंच त्यास थांबवून जयदेवी ह्मणाली 'हं, हं असं कायह्मणून बोलायचं ? माझी कसलीच अट नाहीं बरं. भलतन सलतन बोलून कांहीं-च्या कांहींच करायचं हें बरं नव्हे"

हे शुद्ध प्रेमयुक्त शब्द ऐकून जयपाळ ह्मणाला " छे, छे, तूं भलतीच शंका मनांत धरूं नकोस. तुला जी शंका आली ती मी समजलों पण एवढें लक्षांत ठेव कीं "—

पुनः त्याचें बोलणें थांबवून ती ह्मणाली " पण " तरी कशाला. मुळींच मला तसलं कांहीं ऐकायचं नाहीं प्रतिज्ञा कसली अगर स्वयंवराची अट कसली ? आपल्याला जायला मी कांहीं नको ह्मणत नाहीं. माझा अडथळा खचित येणार नाहीं. खुशाल जावं पण असलं कांहीं चमत्कारिक बोलणन् प्रतिज्ञा हीं मात्र मला नाहीं आवडत. "

" तसंच तर " जयपाळ तिला ह्मणाला " माझें बोलणें खुंटलें. तूं मला.जायला परवानगी देणार आणि तीही खऱ्या वीरतनयेस आणि वीरवनितेस शोभेल अशा तऱ्हेनें मिळून मी दिल्लीस जावयास निरोप घेणार हें ऐकून मात्र मला फार आनंद झाला. रजपूतांचें आंगचें अप्रतिम पाणी त्या काफिरास आपण दाखविणार

पण तें सोई सोईनें. सध्यां अत्यंत महत्वाचें आणि जरूरीचें असें हें काम मात्र, पाहिजे त्या युक्तीचें अवलंबन करून आपण पार पाडणार."

असें ह्मणून त्यानें आपले मंडळीस निघण्याची इशारत दिली आणि सर्व मंडळी जेसलमीरच्या मार्गास लागली.

## भाग ४ था.



जयदेवी हातची गेली ही बातमी जेव्हां दिल्लीस पोंचली तेव्हां अल्लाऊद्दिनास अत्यंत्य वाईट वाटलें आणि क्रोधही आला. ज्या मंडळींनीं ती बातमी आणिली त्यांवर तर त्यानें राग काढलाच परंतु एकजात सर्व रजपूत जातीचा उद्धार करून सर्व रजपूत संस्थानचा धुव्वा उडविण्याबद्दलही त्यानें निश्चय केला. त्यानें दरबारांतील महान महान दाढीवाले योध्धे, शूर मंडळी इत्यादिकांस तयार होण्यास सांगून स्वारी बरोबर सेनाध्यक्ष ह्या नात्यानें आपण येणार असेंही सर्वांस फर्माविलें. जयदेवी प्रित्यर्थ चालविलेला शोध कांहीं अंशीं सफळ झाला, निदान ती जेसलमीरकडे निघून गेली इतकी तरी बातमी समजली परंतु ती आयती हातांत सांपडली असतां रजपूत टोळीनें सोडवून नेली ही गोष्ट त्यास असह्य झाली.

काय चमत्कार आहे पहा! कीं, महत्वाकांक्षा जरी अल्लाउद्दीनचे हृदयांत वास करीत होती तरी जयदेवीमुळें विषयांध झालेल्या त्या अल्लाऊद्दीनानें केवळ

**जयदेवी** करितांच संपूर्ण राजपुताना ओसाड करून टाकण्याचा निश्चय करावा! अनेक देश पादाक्रांत करण्याची ज्यानें हांव धरावी आणि अटोकाट मेहेनत करून ती सफळ करून घ्यावी, अनेक योद्धयांचा रणांत चुराडा करावा आणि सर्वांवर ज्यानें आपला दरारा बसवून त्यांस मांडलिक बनवून ठेवावें त्या **अल्लाउद्दीनास** यत्किंचित मनोविकारांवर दाब ठेवतां येऊं नये काय? विषयवासनेची तृप्ती करण्याकरतांच त्यानें अहोरात्र झटत असावें हें नवल नव्हे काय? दुष्ट मनोविकारांचा पगडा मोठा विलक्षण आहे. तरी **जयदेवीची** प्रत्यक्ष मूर्ति त्यानें अवलोकन केली नव्हतीच. इतर मंडळींनीं तिच्या सौंदर्याची जी वाखाणणी केली होती तिजवरूनच तो इतका वेडा झाला होता. सद्दीचा जोर असे पर्यंत सत्ताधिश ह्मणेल तें होणार, चाहील तें त्यास मिळणार आणि हरएक गोष्टींत त्यास यशच येणार परंतु सद्दीचा जोर कमी झाला ह्मणजे मग? दुर्गुणांकडे मन वहाणें ह्मणजे अपयशाचाच पूर्वरंग नजीक आल्याचीं चिन्हें होत. असो.

ज्या त्वरेनें **अल्लाउद्दीनास** क्रोधावेश चढला त्याच त्वरेनें तो शांत होत चालला. त्यास इतर विचा सुचूं लागले. **जयदेवीच्या** प्राप्त्यर्थ रणसंग्राम करण्याची बिलकूल अवश्यकता नाहीं, कारण, तिचा पित आपलेपाशीं कैदेंत आहे तेव्हां त्याला मुक्त करून राज्य परत देण्याची लालूच दाखविली असतां तो **जयदेवी**, आपणांस, मोठ्या खुशीनें अर्पण करील अस विचार त्याचे मनांत येऊन त्यानें आपला निश्च

बद्दल आणि बंदींत असलेल्या जयदेवीचे पित्यास आपणांसमोर आणण्यास, सेवकांस आज्ञा केली.

थोड्याच वेळांत सेवकांनीं त्या दैवहत बंदीवानास अल्लाउद्दीनासमोर आणून उभें केलें. हतभागी रतनसिंग दिल्लीपतीपुढें मान खालीं घालून उभा राहिला. त्याच्या उदास आणि दीन मुद्रेकडे पहाणें ह्मणजे काम फार दुर्घट होतें. ज्यास वैभवकालीं हजारों सेवकजन, प्रजाजन आणि मांडलीक संस्थानाधिपति नमून असत, ज्याच्यापुढें नम्रता दाखवून हात जोडून आज्ञेची वाट पहात उभे असत आणि ज्याचा अनुग्रह नेहमी इच्छित असत तोच चितोडाधिपती अल्लाउद्दीनापुढें मान खालीं घालून उभा राहीला! केवढा दुर्दैवाचा सपाटा हा!!!

रतनसिंगास अल्लाऊद्दीनानें प्रश्न केला "राजा, दुर्धर बंदीखान्यांतून मुक्त होण्याची तुला इच्छा आहे काय?"

रतनसिंगानें मान वर न करतां उत्तर दिलें "दिल्लीपती, प्रत्येक मनुष्य जन्मास येतो तो स्वतंत्रच येतो आणि जन्मभर स्वतंत्र असावें असें प्रत्येकजण इच्छित असतो. स्वतंत्रता हा प्रत्येकाचा हक्क आहे आणि परतंत्रतेंत रहाणें ह्मणजे मृत्युपेक्षांही वाईट असें प्रत्येकास वाटत असतें. दैवाचे अघटित परिणामावरून मला युद्धांत अपयश प्राप्त झालें आणि ह्मणून मी स्वतंत्रतेस मुकलों नाइलाजाची गोष्ट, जर आपणांस मला मुक्त करावें असें वाटत असेल तर माझें भाग्यच उदयास आलें असें मी समजतों. ज्याचे हातीं सत्ता

आहे त्याचे हृदयांत दया असणें अवश्य आहे, आणि थोर जे आपण त्या आपणांतही तिचें वास्तव्य असलें च पाहिजे."

"अलबत" अल्लाउद्दीन ह्मणाला "दयेचा पाझर ज्यांचे हृदयांत-मुळींच नाहीं असा मनुष्यच विरळा परंतु दया, कोणावरही करणें असेल तर ती, फार विचार पूर्वकच केली पाहीजे. शिवाय सत्पात्रींच उदारता प्रगट करावी अशी राजनीति आहे. सत्ताधीशाकडून उदारतेची इच्छा करणें ती त्यांस तसा प्रसंग आणून देऊनच करावी लागते. ह्मणजे योग्य मोबदला मिळाल्या शिवाय उदारता प्रगट केली जात नाहीं आणि सत्ताधीशाकडून ती तशी मिळणेही नाहीं. कुपात्रीं दान कधींही करूं नये."

राज्यानें उत्तर दिलें "मला असें संदिग्ध कांहींच कळत नाहीं. गुण जे आहेत ते कधींही दुर्गुण होत नाहींत. उदारता कोणत्याही वेळीं जरी प्रगट केली तरी तिजपासून मनुष्यास कधींही अपाय होणार नाहीं उत्तम तें उत्तमच."

स्मित हास्य करून अल्लाऊद्दीन ह्मणाला "राजा तूं खात्रीनें चुकत आहेस कृष्णसर्पाचें उदाहरण घे आणि विचार कर. पण तें राहूंदे. तूं मुक्त व्हावेंस अशी तुझी इच्छा आहेना?"

राज्यानें उत्तर दिलें "होय."

अल्लाऊद्दीनानें प्रश्न "ठीक पण त्याबद्दल मला मोबदला काय मिळेल?"

राज्यानें उत्तर दिलें "दिल्लीपतीस कोणती गोष्ट

अशक्य आहे! जगांत अप्राप्य असें कांहीं असेल असें मला वाटत नाहीं तथापि ऱ्या रजपूताचे शीलास साजेल अशा प्रकारची काहीं आज्ञा असेल तर मजकडून–"

त्याचें बोलणें पुरें होण्याचे अगोदरच अल्लाऊद्दीनानें त्याला विचारिलें "तुला एक मुलगी आहे काय?"

"होय" राजपानें उत्तर दिलें.

अल्लाऊद्दीन ह्मणाला "माझ्या राज्याची, वैभवाची आणि प्रत्यक्ष माझी ती सहचरी होऊन अर्धांगी व्हावी अशी माझी इच्छा आहे" राजा ह्यावर काय बोलता तिकडे त्याचें लक्ष लागलें. राजा स्तब्ध होता.

अल्लाऊद्दीन ह्मणाला "तूं तिला दिल्लीस बोलाव. ती दिल्लीस आल्या घटकेपासून तूं मुक्त झालास समज."

"असलें मर्मछेदी भाषण दिल्लीपतीसच शोभतें. कृष्णसर्पाचें उदाहरण बरोबर लागूं पडतें. बापानें आपल्या सुखासाठीं प्रत्यक्ष मुलीला भ्रष्ट करणें ह्यापेक्षां बंदीवास काय वाईट? मुलीची विटंबना पाहून बापानें सुखांत रहावें ह्याचा अर्थ काय? दिल्लीपति मी बधिर झालों. मला परत माझे दुर्दैवाकडे जाऊंद्या. परतंत्रच मेलों तरी बेहेत्तर."

अल्लाऊद्दीनानें विचारिलें "अरे हतभागी राजा, तर मग परतंत्रताच तुला आवडते."

"बेहेत्तर" इतकेंच उत्तर देऊन राण्यानें अल्लाऊद्दीनाकडे एकवार तिरस्कारयुक्त दृष्टिनें पाहीलें आणि त्याजकडे पाठ केली.

अपमान झालेला पाहून अल्लाऊद्दीनानें त्यास

नेण्यास सांगितलें आणि दिवसभर त्यास उभा ठेवा, रात्रीं झोंप येऊं देउं नका आणि अन्न निम्में देत चला असा कैदखान्यावरील अंमलदारास हुकूम केला.

दुर्दैवी राण्यानें तें ऐकून घेतलें आणि मुकाट्यानें तो कैदखान्याकडे निघून गेला.

**राणा रतनसिंग** हा लहानपणापासून सुखांत वाढलेला. राजपुत्रांस जीं जीं सुखें इष्ट तीं तीं त्यास यथास्थित अनुभवण्यास सांपडलीं होतीं. बाळपणापासून तों तहत राज्यारूढ होईपर्यंत त्यास काळजी; श्रम, कष्ट किंवा कोणत्याही प्रकारचें न्यून माहीत नव्हतें. राज्यावर बसल्यावर तरी त्यास दरबारीमंडळीनीं फारशी यातायात पडूं दिली नाहीं. चैनबाजी, ख्यालीखुशाली आणि विलास ह्यामध्यें तो बहुशः नेहमीं रंगलेला असावयाचा. सर्वत्र शांतता असल्यामुळें त्यास नानाप्रकारचे ढंग करण्यास मुबलक वेळ सांपडत असे. चैनी राजपुत्राप्रमाणें तो नेहमीं व्यसनमग्न असे आणि त्यास बरींच व्यसनें असत. पैसा मुबलक असल्यामुळें त्यास कशाचीही पर्वा नसे. अशा तऱ्हेनें त्याचें निम्मे अधिक आयुष्य गेल्यामुळें जरी तो हाडाचा रजपूत होता तरी अभ्यास आणि व्यासंग नसल्यामुळें रजपूतांचे आंगचे नैसर्गीकगुण जे काटकपणा, शूरत्व, धैर्य आणि मनाचें काठिण्य इत्यादि गुण जरी त्याजमध्यें वास करीत होते तथापि ते कमकुवत असून कुचकामाचे ह्मणजे नाहींच असे ठरले होते. प्रसंगीं त्यास त्वेष आला असतां तेवढ्यावेळपुरतें त्याचें शूरत्व प्रगट होई, परंतु तें लवकरच लय पावे. तसाच काटकपणा आणि इतर गुण

ह्याचा मामला. ह्मणजे एकंदरीत जरी तो खरा रजपूत होता तरी रजपुतांचे आंगचे गुण त्याच्यामध्यें असावे तसे दिसून येत नव्हते. असो.

दिवसेंदिवस त्याचे फार हाल होऊं लागले. त्यास धरून कैदेंत घातल्या दिवसापासूनच जरी त्याचे हालांस प्रारंभ झाला होता तरी आतां त्याची परमावधी झाली. त्यास व्यसनोपयोगी सामान मिळेनासें झाल्यामुळें त्याचें मस्तक भडकून गेलें. मनुष्यास फार दिवसांचें व्यसन असलें ह्मणजे एकाएकीं तें सोडणें किती कठीण जातें आणि व्यसनी मनुष्याची एकदां ती वेळ आली आणि कैफी पदार्थ त्यास त्या वेळेला मिळाला नाहीं ह्मणजे त्याची काय स्थिती होते ह्याचा अनुभव व्यसनभक्तांस असेलच. असो, कैफी पदार्थ त्यास मिळेनातसे झाले अर्थात तो वेडावला, अन्न पोटभर नाहीं ह्मणून हलक झाला आणि झोंप नाहीं शिवाय दिवसभर ताठ एका जागीं उभें राहावयाचें ह्यामुळें तो रंजीस आला. तो क्षीण तर झालाच. त्याची वृत्तीही चळली आणि कोणत्या तरी साधनांनीं ह्या कैदखान्यांतून सुटका करून घ्यावी असें त्यास वाटूं लागलें. तेथून मुक्त होण्यास उपाय म्हटला ह्मणजे एकच आणि तो हा कीं जयदेवी अल्लाउद्दीनास अर्पण करणें! अन्य उपाय नाहींत. हळू हळू तो ह्या गोष्टींचा विचार करूं लागला. जों जों हाल वाढत चालले तों तों त्याचे मनांत जयदेवी देण्याचें कबूल करावें असे विचार येऊं लागले.

मुसलमानाशीं—सत्ताविशा—शरीरसंबंध करणें ही गोष्ट नवीन नसून चालूच आहे, असे शरीरसंबंध पुष्क-

ळ झाले आहेत. तेव्हां जयदेवी अर्पण करण्यांत आपण कांहीं विपरीत करणार आहों अशांतला भाग नसून उलट फायदेशीरच गोष्ट आहे असें त्यांस वाटूं लागलें. दिल्लीतख्ताधिशाचे मनांत जयदेवीची लालसा उत्पन्न होणें हें आपलें सुदैवाचेंच चिन्ह आहे असें जेव्हां त्याचे लक्षांत आलें तेव्हां त्यास आपणाला वाटतें आहे तसेंच करणें रास्त आहे आणि त्यांत जयदेवीचेंही कांहीं नुकसान नाहीं. राज्ञीपदारूढ होण्याचा प्रसंग तिला आला आणि ती देखील प्रबलसत्ताधीशाची अर्धांगी—हें तिचें महद्भाग्य आहे असा विचार आला आणि जयदेवी अल्लाउद्दीनास अर्पण करून आपली सुटका करून घ्यावी असा त्याचा निश्चय ठरला.

जयदेवी पित्याची आज्ञा उल्लंघन कधींही करणार नाहीं. तिचे ठायीं पितृप्रेम अमर्याद असून पित्याचे ठायीं तिची अत्यंत पूज्यबुद्धी आहे अर्थात आपले वचनाबाहेर ती जाणार नाहीं. शिवाय पित्याची कैदेंतून सुटका होण्याचें जर इष्ट वाटत आहे, सोडविण्याकरितां जर ती खटपट करीत आहे तर, जर सुखाचें सुख प्राप्त होऊन पित्याची मुक्तता होत आहे तर अल्लाउद्दीनासारख्या बलाढ्य सत्ताधीशाची अर्धांगी होण्यास ती माझ्या एका शब्दानें तयार होईल अशी त्याची खात्री झाली. ( साधकबाधकप्रमाणें आपणांशींच लढवून त्यानें हें विधान काढलें होतें आणि त्याचे सत्यत्वाबद्दल त्यास खात्री होती.)

# भाग ५ वा.



जयदेवीला अल्लाऊद्दीनास अर्पण करून ह्मणजे तिला जात धर्म आणि शीलभ्रष्ट करून परजाती यांस केवळ आपल्या—पित्याच्या—सुटकेचें मोल ह्मणून देण्याचा आणि कुळास कलंक लावून घेण्याचा अतिनीच बेत राण्यानें केला ही गोष्ट खरीच. त्याच्या मनाची अशी चलबिचल स्थिति होईल हें अल्लाऊद्दीनास पक्कें ठाऊक होतें आणि ह्मणूनच त्यानें त्यास कबूल करविण्यास खडतर उपायांची योजना केली होती. एरव्हीं इतर एखादा रजपूतकुलवतंस प्राणाला बिलकूल न जुमानतां यातना निमूटपणें सोसण्यास तयार झाला असता. आणि तेथें आपली ही मात्रा अगदीं कुचकामाची ठरली असती हें अल्लाऊद्दीन जाणतच होता. तसा प्रसंग असता तर त्यानें अन्य उपयांची योजना केली असती परंत. रतनसिंग हा कितपत निधड्या छातीचा मनुष्य आहे हा अनुभव त्याला आला होता ह्मणूनच सहजगत्या आणि तेंही खुशीनें काम होण्यासारखें असल्यामुळें त्यानें अशा उपायांची योजना केली होती. असो.

रतनसिंगाचे मनाची चलबिचल झाली. त्याला दुर्धर कैदखान्याचा पराकाष्टेचा कंटाळा आला असून यमयातना त्यास दुःसह होऊं लागल्यामुळें त्याच्या वृत्तींत कांहीं पालट होत चालला आहे हें कैदखान्यांवरील अंमलदाराचे लक्षांत आलें आणि त्यानें ही गोष्ट

दिल्लीपतीचे कर्णींही घातली होती. रतनसिंगाची खरोखरीच तशी स्थिती झाली होती इतकेंच नव्हे पण त्याचा जयदेवी देऊन सुटका करून घेण्याचा निश्चय ठरलेलाच होता. परंतु त्या अशुभ वाणीचा उच्चार करण्याचें त्यास एकाएकीं धाडस होईना. प्रतिक्षणीं तो मनाचें धाडस करून अगदीं दरवाज्यापर्यंत जाई, कैदखान्यावरील रक्षकांस “ मला अंमलदारास भेटावयाचें आहे ” असें ह्मणे पण लगेच जीभ चावून येई आणि मागें फिरे. त्यास तितकें धारिष्ट होईना. धर्म, रूढीबाह्य आचरण करण्याचा संकल्प जरी झाला तरी त्याप्रमाणें आचरण करण्याला आरंभ करण्यास बराच अवधी लागत असतो. कारण एकाएकीं, जनलज्जास्तव अगर कोणत्याही इतर कारणांनीं ह्मणा अथवा धाष्ट्यांचे अभावामुळें ह्मणा, तसें आचरण करतां येत नाहीं आणि अशीच स्थिती रतनसिंगाची होत असे. तो जीभ चावी, परत फिरे आणि क्षणिक उत्पन्न झालेल्या क्रोधावेशांत केलेला संकल्प हाणून पाडण्यास्तव मोठमोठ्या प्रतिज्ञा करी परंतु एकदां ती लहर निघून गेली—शुध्धीवर येऊन परिस्थितीचें परिक्षण करी अथवा यातनानीं हळहळे, तेव्हां पहिला संकल्प ठाम होई. असें कांहीं त्याचें चाललें होतें. जों जों त्याची अशी स्थिती कैदखान्यावरील मंडळीच्या अनुभवास येऊं लागली तों तों त्यांस यशप्राप्तीची आशा अधिकाधिक वाटे आणि ह्मणून ते त्याचे जास्तच हाल करीत.

एके दिवशीं रतनसिंगानें मनाचा पक्का धडा करून तो जागेवरून उठला आणि दरवाज्याकडे गेला.

तेथें पाहारेकरी दुसऱ्या एकाशीं कांहीं गोष्टी करीत उभा होता तरी तिकडे लक्ष न देतां अत्यंत संवेदनेने व्याकूळ होऊत तो मनांतील विचार–संकल्प–वाणीवाटे ओकूं लागला. तो ह्मणाला ' कबूल, जा जाऊन तुमच्या हुजूरांस कळवा कीं कबूल '–

तो पुढें बोलणार इतक्यांत त्याचे तोंडावर हात ठेवून कोणी एकानें त्यास गप्प केलें आणि हातास धरून एका बाजूस नेऊन त्यानें, राण्यास विचारिलें ' काय कबूल? आपण कशाची कबूली देतां आहां?'

रतनसिंग भानावर आला–बोलण्यास सुरवात करण्यापूर्वी त्याचे अंतर्यामी जी उकळी फुटली होती ती शांत झाली. तिचा मुळींच त्यावेळेपुरता, लोपच झाला असें ह्मणावयास हरकत नाहीं. आणि त्यानें आंत आलेल्या मनुष्याकडे पाहीलें. क्षणभर त्याच्याकडे अवलोकन करून ' कोण जयपाळ ' असें ह्मणाला आणि त्यानें लज्जेनें मान खालीं घातली.

' महाराज, होय हा आपला नम्र जयपाळच आपणांपुढें उभा आहे ' जयपाळानें उत्तर दिलें.

राण्यास तोंड वर करून त्याच्याकडे क्षणमात्र पहावेना. तो अधोवदन होता त्याच स्थितींत एक सुस्कारा टाकून ह्मणाला ' बाळ, जयपाळ येथें तुझा कसा प्रवेश झाला '?

' महाराज, पैसा काय करीत नाहीं ' जयपाळानें उत्तर दिलें ' परंतु जुलूमी अल्लाऊद्दीनानें हें काय मांडलें आहे. त्यास तारतम्य आणि सारासार हीं मुळींच नाहींत कीं काय? महाराज आपली काय दशा झाली

ही! इतक्या कडक जाचणींत आपणांस त्यानें ठेवण्याचें कारण काय? अथवा थोर ह्मणून नांवाजलेला तो अल्लाऊद्दीन इतका नीच हृदयी आहे काय! '

"माझ्या जाचणीला कारणें अनेक आहेत. एक कालचक्राचा फेरा हें तर खरेंच, परंतु जयपाळा ज्या हेतूस मी मान्य होत नाहीं असें पाहून त्यानें माझी अशी दुर्दशा आरंभिली आहे तो नीच हेतूच माझ्या तापत्रयास कारणीभूत जास्त आहे." असें ह्मणून राण्यानें दीर्घश्वास सोडिला.

"स्वतंत्रता, वित्त आणि सर्वस्व हरण करूनही क्रूर अल्लाउद्दीनाची आशा तृप्त होत नाहीं काय? आणखी त्याचें काय मागणें आहे. जयपाळानें विचारिलें.

राणा गप्प राहिला. जयपाळानें अत्यंत उत्सुकतेनें पुनः एकवार विचारिलें "महाराज असें काय मागणें आहे त्याचें."

'बाळ, तूं मला कांहीं विचारूं नयेस आणि खरोखरी मला तर उत्तरच देतां येत नाहीं. त्याचे शब्द-- मागणें—काय होतें हें जर मी तुला सांगूं लागलों तर—' इतकेच शब्द त्याचे मुखावाटे निघाले आणि राण्याचे नेत्रद्वयांतून अश्रुपात होऊं लागला.

'अरेरे, दुर्दैवा, तुझा सपाटा फारच विलक्षण! खरोखरी तुजपुढें सर्वांनीं नम्रताच दाखविली पाहिजे' ज्या चितोडाधिपतीचे नेत्रांतून आनंदाश्रु स्रवत असावे आणि ज्यानें नेहमीं सुखमग्न असावें त्या राजास कैदखान्यांत, तापत्रयास आश्रय देऊन, दुःखाश्रु ढाळण्याचे दिवस यावे!!! फारच खडतर तुझा सपाटा, असो.

महाराज सांगा' अत्यंत उतावळा होऊन तो ह्मणाला 'महाराज सांगा. एकदां पुनरुच्चार कराच. त्या जुलूमी राजाचे शब्दांचा, आपण मनांत बिलकूल किल्मीष आणूं नका अगर माझे संबंधानें भीति बाळगूं नका. मी आपलें हृदय घट्ट दगडासारखें करून आलों आहे. प्रत्यक्ष प्रत्येक मनुष्याचे काळजास घरें पडण्यासारखे जरी त्याचे शब्द असले तरी ते मी खुशाल ऐकेन. फक्त तुमच्या हृदयांत मात्र त्या पुनरुच्चारणानें क्रोधाग्नी भडकेल तेथें इलाज नाहीं. परंतु मी खात्रीनें सांगतों कीं, ती ज्वाळा मी अल्लाऊद्दीनाचे रक्तानेंच विझवीन. आपले हृदयावरील व्रण त्याचे रक्तानें धुवून काढीन. परंतु महाराज सांगा. एकवार मला ते शब्द ऐकूं द्या ह्मणजे माझ्या मनांत त्वेष उत्पन्न होईल आणि त्यायोगानें तरी आपली त्वरित सुटका होईल.'

'बाळ तूं एकटा माझी मुक्तता कशी करणार' दुःखानें राणा ह्मणाला.

'महाराज, केव्हढाही समुदाय असो. माझा बाण नेमका अल्लाऊद्दीनास भेटेल. पण महाराज एकदां काय तें सांगाच' जयपाळानें विनंती केली.

'त्यांत काय सांगावयाचें आहे? जयदेवी तुजपासून—' राणा मटकर खाली बसला.

'मला ही तसेंच वाटलें, नीचा' पुढें तो कांहीं बोलणार इतक्यांत राजानें त्याचे तोंडावर हात ठेऊन त्यास गप्प केलें आणि कदाचित पहाऱ्यावरील मंडळीस संशय येईल ह्मणून हळूं बोलण्यास सुचविलें.

जयपाळ मुळींच गप्प राहीला. त्वेषानें त्यानें

ओंठ चावून धरले होते आणि त्याचा चेहरा, क्रोधव-न्हीच्या प्रचंड ज्वाळा हृदयांत पेटल्या आहेत, असें सुचवीत होता.

राण्याचे मनांतून कांहीं बोलावयाचें होतें. परंतु त्याची जिव्हा लुली पडली. तरी जयपाळाकडे पाहून तो ह्मणाला ' बाळ' दिवस फार कठीण आले आहेत. सत्याचा क्षय झाला आहे आणि ' बळी तो कान पि-ळी ' असें जगतांत चाललें आहे. तेव्हां व्यर्थ त्रागा करण्यांत काय मतलब आहे? मला तर माझे हाल काडींइतकेही कमी होतील असें वाटत नाहीं आणि मी तर या अपेष्टांस आणि जाचांस इतका कंटाळलों आहे कीं, माझा जीवच मला नकोसा झाला आहे. जयपा-ळा जीवाची आशा कोणाला सुटली आहे काय? ह्मणू-न मला असें वाटतें कीं, ह्या यमयातना सोसण्यापेक्षां—,

जयपाळ मध्येंच ह्मणाला ' तर काय आपण आ-त्मघात करून घेऊन रजपूत कुलाला अगदीं अयोग्य असें कर्म करणार?'

' छे. छे ' राणा ह्मणाला ' आत्मघात करून घेऊन अलभ्य अशा मानवयोनीचा त्याग करून घे-ण्यास मी खात्रीनें तयार नाहीं. माझे हाल चुकण्यास नव्हे, माझी येथून सुटका होण्यास आणि मला पूर्ववै-भव प्राप्त होण्यास जर कांहीं एखादें आंग साधनीभूत असेल तर मी पहाणार. '

अत्यंत दुःखानें पण गुप्त त्वेशानें जयपाळ ह्मणाला ' तर काय आपण अल्लाऊद्दीनाचे व्याही होणार? सुकुमार पुष्पाचा चुराडा—पण महाराज मी सांगतों तें

ऐका. तुम्ही वीरकुलोत्पन्न आहां. वीराचे आंगची कंटकता आपणामध्यें असलीच पाहिजे तेव्हां आणखी थोडे दिवस मजवर विश्वासून असेच हाल भोगा. आ. म्हांला आपणांस सोसावी लागत असलेली विपत्ती पाहून आनंद वाटत असेल असें मात्र समजूं नका. आपले हाल. दुर्दशा आणि स्थिति ह्यांही करून आमचें हृदय कसें विदीर्ण होत आहे तें जर हृदय वेगळें काढून दाखवितां येण्यासारखें असतें तर तें काढुन दाखवून त्याचे स्थितीची आपणांस प्रत्यक्ष साक्ष पटविली असती. तुम्हांला हा जयपाळ, महाराज आपला भावी जामात, खात्रीनें मुक्त करून संस्थानारूढ करील. उतावळीनें आपण कोणत्याही गोष्टिविषयीं वचन देऊन वचनपरीबद्ध होऊं नका. जयदेवी माझी आहे, आपण सर्वांसमक्ष ती माझी आहे असें कबूल केलें आहे आणि महाराज, प्रत्यक्ष जयदेवीनें ही मलाच हृदयांत स्थान दिलें आहे. त्या माझ्या जयदेवीबद्दल आपण भलतेच विचार मनांत आणूं नका. मुसल्मानाचे घरीं राज्ञीपदारूढ जरी ती झाली तरी तिला नोकऱ्यांचा सहवास किती घातकी वाटेल.... छः छेः तुम्ही कांहीं जरी केलें आणि जुलूमी पातशहाला कसलेंही वचन देऊन आपली सुटका करून घेतली तरी जयदेवीसंबंधानें अल्लाउद्दीनाचें जें मागणें आहे तें मात्र माझ्या जीवांत जीव आहे तोंपर्यंत पुरें होऊं देणार नाहीं. ती माझी आहे अर्थात मीच तिला त्राता आणि म्हणून मीच तिला पित्याची अत्यंत नीच आज्ञा मान्य करूं देणार नाहीं. महाराज आपला विश्वास अ-

सेल तर, आपले आंगांत खऱ्या रजपूताचें रक्त खेळत असेल तर आणि जन, मन, कुल इत्यादिकांच्या विरूद्ध आपणांस जाणें शक्य वाटत नसेल—आपल्या विवेकशक्तीनें आपणांस तसें न करूं दिलें तर माझ्या वचनावर विश्वासून असा, नाहींपेक्षां अजरामर अपकीर्ती, अपयश आणि जनदूषण ह्यांचे वांटेकरी व्हा.'

रतनसिंग जयपाळाचें भाषण निमूटपणें ऐकत उभा होता. जयपाळाचे भाषणाचा त्याचे मनावर फारच थोडा परीणाम झाला. जयपाळ जातां जातां असूयापूर्ण दृष्टीनें, त्याकडे पहात होता. त्याच्याकडे पाहून उभा असलेल्या जाग्यावरूनच तो ह्मणाला 'जयपाळा, ज्याचें त्याला दुःख कसें असतें तें कळतें इतरांस त्याचा कसा अनुभव यावा? तथापि तुझ्या बोलण्यावर माझा विश्वास आहे आणि मी खात्रीनें तुजवरच भरंवसा ठेऊन दिवस कंठीन. तथापि शक्तीबाहेरचीच गोष्ट वाटल्यास मला निरुपायास्तव जयदेवी देण्याचें कबूल करावें लागेल'

जयपाळ लक्षपूर्वक हें बोलणें ऐकत उभा होताच. प्रथम त्याला जरा आशा वाटली आणि त्याचे मनाला किंचीत आराम वाटला परंतु शेवटचीं अक्षरें मात्र त्याचे काळजास घरें पाडण्यासारखीं होतींच आणि त्याचेवर त्यांचा परिणामही तसाच झाला. जातां जातां धिकाःरयुक्त असे कांही शब्द त्यानें मुखावाटे उच्चारिले परंतु ते राण्याचे कानीं पडले नाहींत.

जयपाळ बाहेर पडला खरा पण त्यास कोठें जावें हें सुचेना. राण्यानें त्यास धीर तर दिला नाहींच

परंतु नुसता तो जयपाळाचें ह्मणण्यास रुकार जरी देता तरी तेव्हढ्यानें जयपाळास सुख वाटून उद्दिष्ट कार्यास त्यानें प्रारंभ केला असता. परंतु तो सर्वथैव निराश झाला. राजा स्वतःचे सुखाकरितां मुलीचा सत्यानाश आणि कुलास कलंक लागेल असें कृत्य करण्यास तयार झाला, निदान दुःख असह्य झाल्यास होईल, हें त्यास फार लागलें. ज्या जयदेवीला जयपाळच वर ठरविला आणि सर्वांसमक्ष वाग्निश्चयविधी समारंभानें करण्यांत आला त्याच जयदेवीला राणा केवळ स्वतःचे सुखाप्रित्यर्थ यवनाधीशाची गुलाम बनविणार हें वृत्त त्यास कळल्यावर आणि तेंही प्रत्यक्ष राण्याचे मुखानें त्याचें काळीज फाटून जाणार नाहीं तर काय होईल? त्यास जिकडे तिकडे सर्व उदास आणि शून्य दिसूं लागलें. राण्याचा तर त्याला पुरता रागच आला होता. तरी जयदेवी जेसलमीरास सुरक्षित आहे आणि ती मनानें फारच निश्चयी असून अत्यंत निर्मळ आहे, तिचें आपणांवर अतोनात प्रेम आहे आणि केवळ तिच्याच सांगण्यावरून आपण राजाची मुक्तता करण्यास्तव येथें आलों आहों हें लक्षांत येतांच मात्र त्याची निराशा आणि क्षणापूर्वीच जिनें त्याचे हृदयीं वास्तव्य केलें होतें अशी उदासीनता, हीं चटसारीं जागच्या जागींच निमालीं. आणि त्याला पुनः उमेद आली. जयदेवीप्रीत्यर्थ तरी राजाला बंदिमुक्त केलेंच पाहिजे. हा विचार कायम ठरून तो त्या प्रयत्नास लागला.

प्रथमच त्यास असा विचार सुचला कीं, अतिशय

विषयी आणि जुल्मी जो अल्लाऊद्दीन त्यासच जगांतून नाहींसा करावा. हें काम अगदीं प्रारंभाचें. कारण तसें झालें ह्मणजे राण्याला जाग्न आपेष्टा सोसण्याची जरूरी रहाणार नाहीं आणि जयदेवीची अभिलाषा धरणारा जो अल्लाऊद्दीन, त्याचीही खोड मोडल. त्यास देहांत प्रायश्चितच मिळल. परंतु राणा सध्यापुरता तरी अधिकाधिक अपदाचे भीतीतून मोकळा होईल. सुटकेची सजवीज पुढची. असा विचार करून जयपाळ त्या उद्योगास लागला.

प्रत्यक्ष राजधानींत जयपाळाला एकांत कसा मिळावा आणि अल्लाऊद्दीन त्याचे तडाख्यांत कसा सांपडावा ? चोहोंबाजूंनं आधीं तो रक्षक वेष्टित आणि संपूर्ण प्रजाजनांचें लक्ष प्रभूकडे ह्मणजे सर्व दिल्लीशहर त्याचें रक्षण करणार तेथें जयपाळाचा डाव कसा साधावा ? तितकेंही करून त्यास तो साधतां आला असता परंतु मग त्यास प्राणाची आशा सोडण्यास हवी होती. अल्लाऊद्दीन आणि जयपाळ दोघांचाही मृत्यु एकदमच झाल्यावर मग पुढील कार्य कोण आटोपणार ? आणि जिच्यासाठीं एवढी खटपट ती जयदेवी, जयपाळास मृत्युलोकीं कशी मिळणार ? अर्थात त्यास कांहीं दिवस नुसता प्रसंग शोधण्यासच लागले.

एके दिवशीं प्रातःकाळींच त्यास बातमी लागली कीं, अल्लाऊद्दीन हा कांहीं शेलकी मंडळी बरोबर घेऊन शिकारीस जाणार आहे तेव्हां ती संधि उत्तम जाणून जास्त पुसतपास करून त्यानें इत्थंभूत माहिती

वेळ, ठिकाण वगैरे सर्व मिळविली आणि त्यानें ती इं-द्रप्रस्थ नगरी सोडिली.

---

## भाग ६ वा.

दिल्लीपासून सुमारें २० मैलांवर असलेल्या अरण्यात अल्लाउद्दीन आणि त्याची शिकारी मंडळी यांचा तळ होता. इतमाम सर्व बरोबरच होता तथापि तो अगदीं कारणापुरता होता. जबरदस्त महत्वाकांक्षी आणि अभिमानी अल्लउद्दीन तो. त्याचे बरोबर सहज शिकारीला निघाला होता तरी हत्ती आणि घोडे वगैरे इतर लवाजमा वाजवीपेक्षां फाजील होताच परंतु त्याचे दृष्टीनें तो अगदीं कारणापुरताच होता. फक्त तीनच दिवस शिकारींत घालवावयाचे असा त्याचा बेत ठरलेला असल्यामुळें थोड्याच सामुग्रीनिशीं त्याचे समजूतीप्रमाणें—तो निघाला होता.

त्याचे बरोबरची मंडळीही मिजासखोरच होती. प्रत्यक्ष युध्द प्रसंगींही ज्यांची मिजास तिळभरही कमी होत नाहीं त्यानीं केवळ चैनीखातर आरंभिलेल्या शिकारीच खेळाचे वेळीं स्वस्थ कसें रहावें! सांगावयाचें इतकेंच की, मौजेचे तीन दिवस काढण्यासाठींच ती मंडळी तेथें जमली होती. प्रत्येकाची चर्या आनंदित, सुप्रसन्न दिसत होती. अल्लाऊदीनाकडील मंडळींत आनंद मूर्तिमंत कौतूकक्रीडा करीत होता. परंतु बिचारा

जयपाळ मात्र आनंद शून्य होता. त्यास ध्यानी, मनी स्वप्नीं जयदेवी आणि दुसऱ्या बाजूस तिचा पिता व त्याचे अमंगल शब्द हीं दिसत होतीं. त्याचें मन अस्वस्थ होतें हें तर सांगणें नकोच. एक जयदेवी करितांच त्यानें दोन दिवस रानांत, थंडी वाऱ्याला न जुमानतां आणि चोरून लपून कसे बसे काढले. अल्लाऊद्दीनाचे हालचालीवर त्याचें पूर्ण लक्ष होतें. त्याचे मनांतील त्वेषाग्नीस अल्लाऊद्दीनाचीच आहुती पाहिजे होती आणि त्याचेकडेच त्याचा रोख होता. असो.

बिचाऱ्या जयपाळानें दोन दिवस लपून छपून काढिले. त्यास खाण्यापिण्याचे जे हाल काढावे लागले ते त्याचे त्यासच माहिती. मनांतील हेतू तडीस गेल्याविना सुख आणि सुग्रास ह्यांचें सेवन करावयाचें नाहीं, असाच त्याचा निश्चय ठरला होता आणि ह्मणूनच तो प्रतिज्ञाये प्रमाणें अल्लाऊद्दीनाचे मागें गुप्तपणें संधि पहात हिंडत होता. दुर्दैवानेंच खरें, त्याला प्रसंगच मिळेना. ऐन संधि यावी पण क्षणांत बिघडावी. कांहीं तरी अडथळा यावा असें चाललें होतें. दिवसरात्र दिल्लीनृप अनुयायी मंडळींनीं चोहींबाजूनें वेष्टिलेला असल्यामुळें इलाज थकला आणि मनांत निश्चय ठरवितानां अल्लाऊद्दीनास चित करण्याचें काम जितकें सुलभ वाटलें तितकेंच किंबहुनां तें अवघड आणि दुःसाध्य झालें असल्याचें त्यास कळून चुकलें. तरी राण्याप्रमाणें निराशेनें त्यानें उद्विग्न होऊन आपला निश्चय ढळूं दिला नाहीं. तो कुलाप्रमाणें मनाचा मोठा बळकट होता. आणि त्याची प्रतिज्ञाही विलक्षण होती.

योग जुळून यावयाचा असला ह्मणजे अशा कांहीं चमत्कारिक तऱ्हेनें आणि अकस्मित जुळून येतो कीं, तो पाहून मनुष्यास आश्चर्य वाटतेंच. परंतु दैवावर विश्वास बसण्यासही तो योग कारण होतो. तशीच स्थिती जयपाळाची झाली. दोन दिवस अहोरात्र प्रतिछायेप्रमाणें तो अल्लाउद्दीनाचे मागें फिरत असतांही त्यास जी संधी दोन दिवसांत मिळाली नाहीं ती अकस्मात तिसरे दिवशीं दोनप्रहर दिवसास त्यास सांपडली. जयपाळ नित्यविधी आटोपून नुकताच शिकारी छावणींत येण्याकरितां निघाला होता. इतक्यांत एक जलाशयाचे बाजूस कोणी स्वार दौडत दौडत जात असलेला त्याचे दृष्टीस पडला. त्या दिवशींही दोघांचीं चुकामुक होणार होती परंतु दैवाचा सुयोग त्याच दिवशीं जुळून आला हें त्याचें भाग्यंच. असो.

अल्लाउद्दीनच एका वाघाचे मागें लागून आपल्या छावणीपासून किंचित दूर चालला होता. त्याच्या तेजस्वी घोड्याची दौड फार विलक्षण होती तरी व्याघ्रमहाराजांनीं त्याला चकविलेंच. हातची शिकार नजरेआड झाल्याबद्दलचें वाईट कोणाला वाटणारनाहीं! अल्लाउद्दीनानें, थोडावेळ इकडे तिकडे शोध करून, वाघ निघून—निसटून—गेला असल्याची मनाची पूर्ण खात्री करून घेऊन, जलाशयाकडे दौड ठोकिली. हेतू इतकाच कीं, शीतोदकानें घोड्याला आराम वाटेल आणि स्वतःलाही थोडावेळ विश्रांति घेण्यास तें ठिकाण हवें तसें दिसत आहे ह्मणून क्षणभर विसावा मिळून

हुशारी यावी. दैवाची नजर किंचित वक्र झाली असल्याचें त्यास कसें कळावें!

अल्लाउद्दीनानें घोड्यास पाणी पाजलें. बखत पडल्यावर मनुष्य कितीही मानाचा असला तरी काय करतो? घोड्याची सेवा अल्लाउद्दीनासच करावी लागली. शूरपुरुषांनां स्वतःचे घोड्याची किंमत फारच मोठी वाटत असते आणि ह्मणून प्रसंगविशेषीं त्या जनावराची सेवा करण्याचा प्रसंग आला तर त्याबद्दल त्यांचे मनास किमपीही विषाद वाटत नाहीं. अल्लाउद्दीनानें घोड्यास बांधून ठेऊन तोही एका झाडास टेंकून बसला. जमीनीला त्याचें आंग लागतें न लागतें तोंच एकामागून एक असे दोन—तीन, तीर सूं सूं करीत त्याचे रोंखावर आले आणि त्या तीरानीं अल्लाउद्दीनाचे शरीरांत स्वतःकरितां तीन स्थानें तयार केलीं. शरीरापार जाण्याची त्यांची इच्छाच झाली नाहीं. अल्लाउद्दीनानें भूमीस साष्टांग प्रणिपात घातला. बिचाऱ्या मुक्या जनावरास धन्याचे स्थितीचें काय ज्ञान होणार! त्याचें पायानें जमीन उकरणें, खिंकाळणें आणि आंग झाडणें चाललें होतें.

अल्लाउद्दीन सावध झाल्यावर त्यास, आपण एका रानवट खेडगळाचे झोंपडींत असून एका रकट्यावर पडलेला आहे आणि जखमा बांधलेल्या आहेत असें आढळून आलें. त्याच्या आवडत्या अरबाचें काय झालें हें त्यास कळलेंच नाहीं आणि त्याची माहिती देणारा कोणीच इसम पुढें आला नाहीं. जो खेडवळ त्याचेपाशीं बसला होता

त्यास अरबा संबंधानें बिलकूल वार्ता नाहीं असें चौकशी अंतीं अल्लाऊद्दीनास दिसून आलें. त्या खेडगळ मनुष्यापाशीं जास्त चौकशी करण्यांत कांहीं फायदा नाहीं, कदाचित् अरब सुटून कोठें उधळला असेल असें समजून तो गप्प राहिला. त्याला वेदना होत होत्या तरी त्यानें त्या खेडगळ मनुष्यास आपल्या मंडळीचा शोध करून त्यांस इकडे आणण्याबद्दल सांगण्याचा बराच प्रयत्न केला परंतु त्याचे अस्फूट शब्दावरून त्या खेडवळास कांहींच तर्क काढतां येईना आणि बोलणें ही नीट समजेना. अशा स्थितींत अल्लाऊद्दीनास श्रमामुळें मूर्च्छा आली.

बरेच वेळानें त्यानें डोळे उघाडिले आणि कांहीं बोलण्याचा प्रयत्न केला परंतु तोही निर्फळ झाला. त्याला स्पष्ट उच्चार करतां येईना. त्या खेपेलाही पूर्ववतच स्थिती झाली. अल्लाऊद्दीनास स्पष्टपणें " मी तुमचा सुलतान, दिल्लीपती " असें सांगतां यईना. न जाणो अशा दुर्बलावस्थेंत, जर खेडवळाचे मनांत दिल्लीपतीबद्दल वैर असेल तर, भयंकर संकट गुदरून प्राणांतापर्यंत वेळ यावयाची! जुलमी राजांचें मनच त्यांचें त्यांस कसें खात असतें हें अल्लाऊद्दीनाचे स्थितीवरून नीट लक्षांत येईल.

बादशहा असल्याबद्दलची स्वतःविषयीं बातमी कोणांस ओळखीच्या मनुष्यांशिवाय इतरांस—सांगावयाची नाहीं, धडपणें बोलतां येत नाहीं, चिठी लिहीण्याबद्दल तर नांवच नको आणि पदरचे लोकांपैकीं कोणीही तलास काढण्यास हिंडत असलेले दिसून

येत नाहींत अशी एकंदर परिस्थिती आणि स्वतःचें दुर्बळ अवसान पाहून अल्लाऊद्दीन अत्यंत दुःखी झाला आणि त्यांतच असह्य वेदना, हाल इत्यादिकांचे योगानें तो बराच बेजार झाला. शेवटीं नाईलाज जाणून परमेश्वर व दैव ह्यांवर विश्वास ठेऊन त्यास खेडवळाचे झोंपडींत कष्टानें दिवस काढण्यास राजी व्हावें लागलें.

असा प्रकार जगांत हमेष आढळण्यांत येतो कीं, अधिकारी, संपत्तीमान किंवा ज्यास आपण "ज्ञान" अशी सद्रूचां संज्ञा देतों तें असणारा ज्ञानवान ह्यांपेक्षां "दया" या गुणाचा अंश, ज्यांस आपण अडाणी, हिरवट, ज्ञानशून्य आणि रानवट असें समजतों अशाच माणसांचे आंगीं ज्यास्त दिसून येतो. त्या खेडवळ माणसानें अल्लाऊद्दीनाची तरतूद उत्तम प्रकारें ठेऊन निष्कामपणानें त्याची सेवा केली. अल्लाऊद्दीनास त्या माणसाबद्दल पूज्यबुद्धी वाटली. तथापि आपले दर्जाची स्फुटता करणें त्यास इष्ट न वाटल्यामुळें त्यानें त्या माणसास नुसती कृतज्ञता प्रदर्शित करण्यापलीकडे कांहींच केलें नाहीं. आणि तशा स्थितींत वाचाळतेशिवाय कांहींही करणें त्यास साध्य आणि सुगम नव्हतें "आलीया भोगासी असावें सादर" ह्या प्रमाणें तो दिल्लीपती तशा कंगाल स्थितींत दिवस काढित होता.

दरम्यान जेव्हां अल्लाऊद्दीनाच्या टोळीनें पाहिलें कीं, बादशहाचा बराच वेळ पत्ता नाहीं तेव्हां त्याच्या पैकीं पुष्कळांचा असा समज झाला कीं, वाघाचे पाठीं लागून स्वारी गेली होती तिकडेच वाघोबानीं, धष्टपुष्ट

आणि वैभवामुळें शोभणाऱ्या अशा अल्लाउद्दीनाचे मांसावर, यथेष्ट मेजवानी झोडपिली. हा त्यांचा समज होण्यास निराळें कारण असें झालें कीं, शोधार्थ धाडले-ल्या स्वारांनीं अशी बातमी आणली कीं, बादशहा-चा तर पत्ता नाहीं तथापि सरोवरासमीप कांहीं रक्त सांखळलेलें त्यांचे दृष्टीस पडलें आणि पलिकडे झाडींत छिन्नविछिन्न झालेलें एक धड आढळण्यांत आलें. वास्तविक पहिली गोष्ट खरी होती परंतु निखट मात्र लावूनच कोणतीही गोष्ट नेहमीं सांगणारे ते महंमदीस्वार, थोडक्यासाठीं कशाला संधी गमावतील! त्यांनीं सव्वाहात झोंकून दिली, तरी त्यांचे ह्मणण्यावर इतरांचा विश्वास बराच बसला. मग धडासंबंधानें, आणि तेंही कीर्तिसें शिस्तवार, त्यांनीं जें सांगितलें तें ताबड-तोब सर्वांनीं खरें मानिलें ह्यांत नवल नाहीं. कारण सगळी मंडळी आधीं अस्तेवाईक पडली आणि वर भर अल्लाऊद्दीनाचे पुतण्यानें दिली. मग कोण नाहीं त्यां-च्यावर विश्वास ठेवणार? अल्लाऊद्दीनाचा पुतण्या राज्यवधूशीं संलग्न होण्याकरितां झटत होता इतकेंच सांगितलें ह्मणजे त्यानें भर कां दिली हें ताबडतोब लक्षांत येईल. *

---

* वास्तविक हा प्रसंग वेगळ्याच तऱ्हेनें घडला असून तो इ. स. १२९९ त घडून आला. ह्मणजे आमच्या गोष्टीच्या पूर्वी सुमारें पांच वर्षें हा प्रसंग घडून आला. तथापि गोष्टीस हृदयंगमता आणविण्याबद्दल आणि जुळणीकरितां अशी ओढाताण केली आ-हे. तो प्रसंग असा आहे कीं, अल्लाऊद्दीन ह्याचा पुतण्या

सर्व मंडळी दिल्लीस परत आली. अल्लाउद्दीनाचा पुतण्या रुखनखान ह्यानें बाह्यात्कारी चुलत्याचे मृत्युबद्दल पराकाष्टेचा शोक व्यक्त केला. प्रजाजनांची

---

आणि एकीकडून मेव्हणा **रूकनखान** त्यास दिल्लीपदवैभवाची लालसा उत्पन्न होऊन त्यानें कांहीं दरबारीमंडळीस वश करून घेतलें आणि **अल्लाऊद्दीनाच्या** खून करण्याचा बेत केला. संधी शोधतां शोधतां त्यास **अल्लाऊद्दीन** शिकारीस गेला त्यावेळची उत्तम संधी सापडली आणि पातशहा एकटाच वाघामागें लागला आहे असें पाहून त्यानें त्यावर नेमानें दोन बाण सोडले. ते पातशहास लागतांच तो जमिनीवर निचेष्ट पडला. तें पाहून **रूकनखान** हा पातशहास सपशेल छाटून काढण्याकरितां हातांत नग्न तरवार घेऊन धांवला. परंतु जवळच्या मंडळीनें मेलेल्या मनुष्यास छाटण्यांत पुरुषार्थ नाहीं, **अल्लाऊद्दीन** मृत होऊन पडला आहे असें सांगितल्यावरून स्वारी परत छावणींत फिरली. तेथें आल्यावर मंडळीसमवेत मोठ्या समारंभानें दिल्लीत येऊन रत्नमय दिवाणखान्यांत आपणांस राज्याभिषेक करून घेऊन आपल्या नांवाची द्वाही फिरविली. इकडे **अल्लाऊद्दीन** कांहीं वेळानें सावध झाला आणि आसपासच्या खडबळ मंडळीचे सहायानें कांहींसा सुस्थितींत आल्यावर दिल्लीस गेला. तिकडे तत्पक्षीय लोकांनीं त्याचा गौरव करून, **रूकनखानास** पदच्युत केलें. पुढें **अल्लाऊद्दीनानें** त्याला यथास्थित देहांत प्रायश्चित्त दिलें. " ईश्वर तारी त्याला कोण मारी " या म्हणीचा सत्यार्थ वरील गोष्ट वाचून ध्यानांत येतो. अल्लाऊद्दीनास मृत्युलोक सोडण्याची पाळी आलीच होती. प्रत्यक्ष मृत्यु त्याजवर धांवला होता आणि त्याचे–अल्लाऊद्दीनाचे–एक घाव दोन तुकडे होण्यास कांहीं वेळ लागला असता असें नाहीं. तथापि वेळ आली नव्हती ! ! ! अशीं उदाहरणें इतिहासांत अनेक आहेत. राज्यतृष्णा अतिशय अनावर आहे आणि तिचे पायीं प्रत्यक्ष आईनें आपल्या पोटच्या गोळ्याचा खून केलेल्याचींही अनेक उदाहरणें आहेत. मग चुलत्या पुतण्यांचें नातें कोणीकडे ? प्रत्यक्ष **अल्लाऊद्दीनानेंही** आपल्या चुलत्यास ठार मारूनच राज्य मिळविलें होतें.

हृदयें कांहीं दिवस—अगदीं थोडे दिवस—दुःखव्यग्र झालीं. त्या संधीत दरबारी मंडळींनीं **रुकनखान** ह्यास पट्टाभिषेक करून त्याचे नांवानें द्वाही फिरविली. ठिकाठिकाणीं खुतबा पढविला, अनेक फकीरांनां मिष्टान्न चारलें आणि दिल्लीनृपतीचे श्रेष्ठ आसनावर **रुकनखान** चमकूं लागले. सर्वत्रांनीं त्याचा अंमल कबूल करून त्याजपुढें शिरें नम्र केलीं.

परंतु जेव्हां **रुकनखान** महंमदी रिवाजा प्रमाणें जनान्यांत जाण्यास उद्युक्त झाला तेव्हां तेथील—जनान्यावरील—मुख्य अर्धनारी रक्षकानें त्यास अडथळा आणिला आणि त्यास निक्षून सांगितलें कीं, " ज्या वेळीं महंत **अल्लाउद्दीनाचें** शिरकमल मजपुढें सादर कराल त्याच वेळीं त्याच्या अत्यंत प्रितीतल्या आणि सशास्त्र विवाहबद्ध स्त्रिया ह्यांची योग्य व्यवस्था करून, बाकीचा, जनाना स्वाधीन केला जाईल. तोंपर्यंत गोषांत—**अल्लाउद्दीनाचे**—पाऊल ठेवण्यास तुह्मांस बिलकूल हक्क पोंचणार नाहीं आणि कदाचित् दंगाधोपा करून तुह्मी तसें करण्याचें मनांत आणाल तर आमचे सर्वांचे प्राण धरणीला अर्पण होतील इतकेंच नाहीं पण सगळा जनाना जळून खाक होऊन हातीं मट्टी लागेल. शिवाय तुमचा नाश होईल तो वेगळाच."

हें चरचरीत आवेशाचें भाषण ऐकून **रुकनखान** मनांत किंचित चरकला आणि व्यर्थ नाश आणि लोकांत अप्रीति उत्पन्न होईल हा पुढचा परिणाम लक्षांत आणून त्यानें तो बेत लांबणीवर टाकला. तो **अल्लाउद्दीनाचें** शिरकमळ मिळविण्याच्या प्रयत्नांत होताच.

परंतु तें त्यास सुसाध्य दिसून येईना. कारण उघडच आहे कीं, अल्लाउद्दीन मुळीं मेलाच नव्हता हें एक आणि जरी जिवंतपणीं देखील तशा स्थितींत अल्लाउद्दीनाचें शिरकमल मिळविण्यास रुकनखानास फारशी पंचाईत पडली नसती तरी त्याचा तलास लागणें अशक्य होतें. अल्लाउद्दीन त्या मरणाला भीतच होता आणि तेंच, त्याचे दर्जाची आणि नांवाची परिस्फुटता न करण्याचें कारण होतें.

दरबारी मंडळीशीं प्रथम प्रथम तो मिळून असे. परंतु वैभवाबरोबर अहंभाव आणि इतर दुर्गूण त्याचे आंगीं शिरले. त्यांचे दर्पानें उन्मत्त होऊन त्यानें दरबारी मंडळीस अधिकाराचा अरेरावीपणा दाखविण्याची सुरवात लवकरच केली. बहुतेक दरबारी मित्रांखानांबद्दल त्याचे मनांत अविश्वास उत्पन्न झाला आणि स्वतः सुरक्षित असावें ह्या हेतूनें त्यानें पूर्वीचे सल्लामसलतगार मंडळीवर पहारा ठेविला. अर्थात रुकनखानाबद्दल दरबारी मंडळींत अप्रीति आणि असंतोष उत्पन्न झाला. प्रजेची स्थिती तर विलक्षणच झाली होती. कारण रुकनखानाचे विलक्षण विषय लोलुपतेस अनेक सभ्य मंडळीच्या जनान्याची आहुती पडत होती. मिळून लोकांवर जुलूम—ह्मणून ते लवकरच त्याचे अमदानीस कंटाळले आणि त्याचे पूर्वीचे स्नेही—उपकारकर्ते—त्यांजवर विनाकारण दोषारोप येऊं लागल्यामुळें खवळले. अशा रितीनें आंतून बाहेरून आग लागल्याकारणानें त्याचा लवकरच बोजवारा उडण्या-

चीं चिन्हें त्याला राज्याभिषेक झाल्यापासून थोड्याच दिवसांत दिसूं लागलीं.

इकडे अल्लाऊद्दीनाची प्रकृति दिवसेंदिवस सुधारत जाऊन दिल्लीकरमंडळींत असंतोष—पुरता असंतोष जागृत होण्याचे सुमारास, तो चांगला बरा झाला. प्रकृति नीट झाल्यावर त्यास खेडवळाचे झोंपड्यांत रहाणें कसें गोड वाटेल? शिवाय पुतण्याचे कृतघ्नतेबद्दलचा त्वेष त्यास स्वस्थ कोठचा बसूं देणार? अल्लाऊद्दीनानें एके दिवशीं आपल्या उपकारकर्त्यांची साश्रुलोचनांनीं रजा घेतली. सहवास मोठा कठिण आहे. जरी अल्लाऊद्दीनास जाण्याची अतिशय उत्कंठा होती, झोपड्यांत एक क्षणभर जास्त राहण्याची इच्छा नव्हती तरी सहवासाचे योगानें जो प्रेमांकूर हृदयांत उत्पन्न झाला होता तोच त्याचे नेत्रांतून पाणी आणवीत होता. असो. त्यानें, उपकारकर्त्यांचे असंख्य आभार मानले. प्रसंग पडला असतां आपण खात्रीनें ओळख ठेवून किंचिन्मात्र उपकाराची फेड करूं वगैरे कृतज्ञतापूर्वक आश्वासनें देऊन, रजा घेतली आणि थोड्याच दिवसांनीं तो दिल्लीस पोचला. खेडवळ मंडळीच्या तैनातींतील खेडवळ शामकर्णावर आरूढ होऊन त्याला प्रवास करावा लागल्याकारणानें जी वाट त्याचे प्रिय अरबानें एका दिवसांत जवळ केली असती तीच वाट चालून जाण्यास, त्यास कांहीं दिवस लागले.

अल्लाऊद्दीन आपल्या जिवलगाकडे गुप्तपणें जाऊन राहिला. तेथें त्यानें अमीर उमराव लोकांच्या भेटी घेऊन त्यांची, प्रजेची व एकंदर स्थितीची पूर्णपणें

ओळख करून घेतली. लोकांत ही बातमी पसरतांच, त्यांचा ओढा अल्लाऊद्दीनाकडे असल्यामुळें, संपूर्ण प्रजाजनास आनंद झाला. तो ह्मणजे प्रजेला आंगचे सद्गुणांनीं प्रिय झाला होता असें नाहीं. त्याचे ठायीं वात्सल्य बेताचेंच होतें. तथापि कसा झाला तरी तो खरा शास्ता होता.

कांहीं दिवस अशीं गुप्त खलबतें चालवून एके दिवशीं तयारीनिशी अल्लाउद्दीनानें रुकनखानावर हल्ला केला. हल्ला ह्मणण्याचें कारण इतकेंच कीं, जी कांहीं हाताचे बोटा इतकीच मंडळी रूकनखानास पूज्य मानीत होती ती-सह रुकनखानानें अल्लाउद्दीनास अडथळा केला. शेवट ठरलेलाच होता. आयतेंच अल्लाउद्दीनाचे हातीं सांपडण्यापेक्षां थोडीशी हालचाल करून मग सांपडावें इतकीच इच्छा मनांत धरून रूकनखानानें थोडीशी चळवळ केली. बाकी सगळी प्रजा, लष्कर आणि तमाम दरबारस्तंभ-मंडळी उलटल्यावर त्याला जयाची आशा कितपत वाटली असेल ती उघड दिसतच आहे. तथापि उघडचा डोळयांनीं प्राण जात नाहीं ह्मणून त्यानें कांहीं तरी हात हालविले. अल्लाउद्दीनानें त्यास धरून कैदेंत टेविलें आणि जिकडे तिकडे स्थिरस्थावर होऊन पूर्ववत व्यवहार सुरू झाल्यावर एके दिवशीं त्यानें कृतघ्न पुतण्याचा उघडपणें शिरच्छेद केला.

आलेलीं वावटळें पार नाहींशीं होऊन पूर्ववत स्वस्थता झाल्यावर अल्लाउद्दीनास विश्रांति मिळाली आणि त्याला जयदेवीचें स्मरण झालें. तिची काल्पनि-

क मूर्ति त्याच्या हृदयांत शिरल्याबरोबर त्यास चितोडाधिपति रतनसिंगाची आठवण झाली आणि " त्यास पुन्हा एकवार मजसमोर घेऊन या " अशी कैदखान्यावरील अंमलदारास त्यानें आज्ञा केली. थोडयाच वेळांत त्याचे समोर हतभागी, गलित-तेज, अशक्त आणि ज्याचे डोळे खोल गेले असून तरूणस्थिति असतांही ज्यावर वृद्धापकळा आली होती असा रतनसिंग अधोवदन करून उभा राहिला.

स्मित-हास्य करून अल्लाउद्दीनानें त्यास प्रश्न केला " अरे हतभागी रतनसिंगा, अद्याप तुला माझ्या मागण्यांस मान द्यावा असें वाटत नाहीं काय?

" खात्रीनें नाहीं. " इतकेंच उत्तर त्यास मिळालें.

" म्हणजे तुझे होत असलेले हाल तुला प्रिय आहेत!" अल्लाउद्दीनानें प्रश्न केला.

" कोणालाही दुःखाची आवड नसते आणि दुःखाला कोणीही आमंत्रण देत नसतो. परंतु दैवगति वक्र झाल्यावर प्रत्येकास दुःख सोसावें लागतेंच " असें उत्तर देऊन दुर्दैवी राण्यानें एक दीर्घ सुस्कारा टाकिला.

" दैवहत झालेला पुनः दैवी होऊं शकत नाहीं काय!"

" दुर्दैवानें पाठ सोडली की, दैवी होऊं लागतोच " राण्यानें उत्तर केलें.

" पण सुदैव शोधण्यास प्रयत्न करण्याची अवश्यकता नाहीं काय!"

" नाहीं. वेळ आली म्हणजे आपोआप सगळें कांहीं यथास्थित होत असतें. रात्रीमागून दिवस आ-

हेच. यद्यपि पुरा दुर्दैवी जरी असेल तरी त्यास मृत्यूंत सुख मिळेल" निराश आणि दैववादी **रतनसिंग** ह्मणाला.

" तेव्हां तूं मृत्यूला कंवटाळण्यास तयार आहेस?" **अल्लाउद्दीनानें** जरा दरडावून ह्मटलें "ठीक आहे. माझी इच्छा मी पाहीजे त्या तऱ्हेनें आणि उपायानें पुरवून घेईनच परंतु मला तुझा अंत पहावयाचा आहे. लक्षांत धर आज पासून बरोबर ६६ दिवसांची तुला मुदत देतों. मला पक्के ठाऊक आहे कीं, तुमच्या मुली तुमच्या पूर्ण ताब्यांत असून अत्यंत पितृभक्त असतात. तूं **जयदेवीला** आज्ञा केल्यास ती खात्रीनें तुझें वचन पाळील. तर जर आजपासून बरोबर सहासष्टावे दिवशीं **जयदेवी** मला प्राप्त करून देणार नाहींस, छे, छे, मला अर्पण करणार नाहास तर आजपर्यंत कोणाही दुर्दैव्यास कधींही भोगण्यास न सांपडलेली अशी क्रूरशिक्षा तुला मिळेल; इतकेंच नाहीं परंतु **जयदेवीला** जबरदस्तीनें आणून तुझ्या देखत मी आपली इच्छा पुरवून घेईन, आणि तुला अथवा तुह्मां दोघांना अत्यंत हालहाल करून जगांतून नाहींसें करीन." **अल्लाउद्दीनाचे** नेत्र आरक्त होऊन क्रोधाची विलक्षण जाज्वल्यता त्याचे चर्येवर दिसून आली.

भव्य, क्रूर आणि सत्ताधीश **अल्लाउद्दीनाची** ती चर्या पाहतांच राजास पराकाष्टेची भीति वाटली. रागानें **अल्लाउद्दीनाचे** ओंठ कांपत होते परंतु राण्याचें सर्वांग भीतीनें थरारूं लागलें. त्याचें क्रोधावेशानें रक्त गरम झालें, इकडे राण्याचें, भीतीनें, थंड झालें. दि-

लीपतीचे नेत्र आरक्त झाले परंतु आधींच खोल गेलेले राण्याचे नेत्र तेजशून्य तर झालेच परंतु क्षणभर दृष्टी अंधही झाली ह्मटल्यास शोभेल. **अल्लाउद्दीनाची** चर्या क्रौर्य आणि निश्चय दर्शवीत होती. इकडे राण्याचें आधींच कोमेजलेलें मुखकमल म्याड दिसूं लागून त्यावर अवकळा आली आणि मनांतील निश्चयाची हळमळ झाली असल्याचें दर्शवूं लागलें. **अल्लाउद्दीनास** पुढील परिणामासंबंधानें कांहींच दिसत नव्हतें. नुसत्या सुराबद्दल--खुनाबद्दल--कदाचित त्याचे मनांत विचार आले असतील परंतु **राण्याला** मूर्तिमंत यमपाश हातीं धरून जणूं काय आपल्यावर टाकीत आहे असें भासलें आणि जगाचा वियोग जो संभवे तिजबद्दलच्या कुकल्पनांनीं त्याचे हृदयांत काहुर उसळून सोडिलें. **जयदेवी** अर्पण करावी तर कुलास कलंक लागून जगभर हंसें आणि न द्यावी तर मृत्यूपंथीं जावें हे दोन्ही विचार दळदळीत त्याचे पुढें उभे राहिले. क्षणांत त्यास वाटे कीं, **जयदेवीला** अर्पण करून आपण **अल्लाऊद्दीनास** नामोहरम केला असून लोक आपली कीर्ती करीत आहेत, क्षणांत वाटे मुदत संपली ह्मणून क्रूरस्वरूपी अल्लाउद्दीन हातीं खड्ग घेऊन आपणापुढें उभा आहे. दोन्हीं देखावे त्याचेपुढें एकामागून एक मूर्तिमंत उभे राहूं लागले आणि दोहींपक्षीं त्यास दुःखच दिसूं लागलें. **अल्लाऊद्दीनाचे** चर्येवरील क्रूरता आणि त्याचे नेत्र ह्यांचेकडे अवलोकन केलें ह्मणजे त्यास वाटे कीं, **जयदेवी** देऊन मोकळें व्हावें, परंतु त्यांजवरून दृष्टी फिरविली कीं, दुसरा

विचार त्याचे मनांत येई आणि मरण आलें तरी बेहेत्तर असें वाटे. इतकें सगळें विद्युत्गतीनें चाललें होतें.

**अल्लाउद्दीन** असूयापूर्ण नेत्रांनीं राजाकडे सारखी टक लावून पहात होता. जणूं काय तो राण्याचा निश्चयदुर्ग भेदण्यास्तव नेत्रशरांचाच वर्षाव करीत होता. दृष्टिपातानें दुर्गाला खिंडार पडून तो कोसळण्याचे बेतांत आलाच होता. शिवाय मौन्य तसें दर्शवीत होतें म्हणून **अल्लाउद्दीन** मुखांतून एक शब्दही न उच्चारतां सारखे दृष्टिशर सोडीत होता.

राण्याचे सर्वांगास दरदरून घाम आला होता आणि तें थरथर कांपत होतें. निःशक्त बनलेल्या पायांनीं त्याला कसें तरी सांवरून धरिलें होतें. क्षणोंक्षणीं त्यास भोंवळ येऊन तो बसण्याचे बेतांत येई परंतु रक्षक त्यास रज्जूनें हिसका देऊन उभा करीत. अशा स्थितींत थोडाच वेळ लोटल्यावर त्याचा टाम एक बेत ठरल्यासा दिसलें. तो म्हणाला " सत्ताधीश काय करण्यास समर्थ नाहीं ? तथापि मला पेंचांत घालण्यापूर्वी मेहेरबानांनीं जर किंचित विचार केला असता तर खचित आपला असा निश्चय झाला नसता " खऱ्या रजपुता प्रमाणें त्याचें हृदय नसल्या कारणानें त्याचे डोळ्यांतून अश्रुपूर वाहूं लागून त्यास पुढें बोलवेना.

" होय, सत्ताधीश काय पाहिजे तें करण्यास समर्थ आहे म्हणूनच त्याचें वचन इतरांनीं पाळून मर्जी सुप्रसन्न करून घ्यावी हें योग्य. रजपूत कुलास कलंक लागेल म्हणून तूं भितोस परंतु आग्रहानें आपल्या सुंदर मुली पातशहास अर्पण केलेल्या रजपूत

पित्यांचे दाखले तुला माहीत नाहींत काय ? वेळेप्रमाणें वागणूक ठेवावी लागते आणि जसा वारा असेल तशी पाठ द्यावी लागते हें तूं जाणत नाहींस ? परंतु शक्तिवान, दिल्लीनृप आणि परमेश्वराचा परमप्रिय भक्त आणि बलाढ्य व शूर मी जामात जोडून, व राज्यभोग सुखानें घेऊन सर्वत्र मान्यता मिळत असतां एकट्या एका जातीकरितां रडत बसून नृपकोपास बळी पडावें हें चांगलें असें तुझें मन तुला सांगतें ? अरे दुर्दैव्या तुला धर्माची, जातीची आणि स्वकीयांची लज्जा वाटत असेल तर महंमदी धर्म स्वीकार ह्मणजे स्वजातीयांत तुझी मान्यता होईल. सुखासमाधानानें कामधेनूवत सुख घरीं चालून येत असतां तें लाथेनें झुगारून देण्यास तूं तयार होतोस ! शरमेची गोष्ट आहे. हतभागी राजा, तुझी मुलगी सार्वभौमाची अर्धांगी अर्थात राज्ञी व्हावी त्या पेक्षां अन्य सुस्थळ तुझ्या मनांत कोणतें येतें तें तरी मला एकदां कळीव. बाकी हें तूं पक्कें समज कीं, **जयदेवी** माझी आहे आणि मी तिला सशास्त्र अर्धांगी बनविणार. हा माझा निश्चय कधींही ढळणार नाहीं आणि माझ्या आड येण्यास या मृत्युलोकीं तर कोणी समर्थ नाहीं. फक्त तुझ्याच सुखाकरितां आणि मजवर वृथारोप येऊं नये ह्मणून मी तुझी पुनः पुनः विनंती करीत आहे. पहा तुझ्या सारख्या बंदीवानाची एक सार्वभौमनृप विनवणी करीत आहे. विचार कर " अल्लाऊद्दीन ह्मणाला त्याचे चेहऱ्यावरील क्रौर्य बरेंच कमी झालें होतें.

**रतनसिंगास** किंचित धीर येऊन तो ह्मणाला

" पण स्वजातीयांस सोडून, केवळ राज्य प्राप्तीस्तव, जयदेवी पातशहास अर्पण केली अथवा आमच्या समजुती प्रमाणें तिचा सत्यानाश केला, असलें अपयश आणि जननिंदा सोसून मी जयदेवी आपणास अर्पण कशी करावी आणि जननिंदेचे प्रखर भाले हृदयास जखमी करीत असतां मला राज्य प्राप्तीचें सुख कसें वाटेल !

पूर्ववत चर्या बदलून अल्लाऊद्दीन दरडावून ह्मणाला " अलबत, तुला तसें अपयश सोसलेंच पाहिजे. मला मनरा ठ्याद्री नको आहेत " पुढें तो कांहीं बोलणार होता परंतु एव्हढ्यानेंच काय परिणाम होतो तो पहाण्यास्तव त्यानें बोलणें थांबविलें.

रतनसिंगास पुनः मृत्यू दिसूं लागला. तो ह्मणाला " दिल्लीपते, माझ्या तिजवर आतां वारसा नाहीं कारण कीं, तिचा वाङ्निश्चय होऊन चुकला आहे. जेसलमीरचे जयपाळास तिला देण्याचें निश्चीत झालें आहे. तो रजपूत वीर आहे ह्मणून त्याचे कोपास आपण पात्र होऊं नये असें मला वाटतें " राणा कांहीं तरी बोलला.

अल्लाउद्दीनाचे त्वेषाची पूर्तता होण्यास तेव्हढें भाषण पुरे होतें. तो अतिशय क्रोधावेशानें ह्मणाला " मला त्या भिकारड्या जयपाळाची भीति! सैतानची अवलाद! बस्स उडवा ह्याचें डोकें. एकदम धडापासून ह्याचें शिर मोकळें करा " असा सेवकांस हुकूम होतांच पांचचार जणांनीं आपल्या तरवारी बाहेर काढून म्यानावर पडनाळल्या.

तो देखावा पहातांच रतनसिंगाचें हृदय फुटून गेलें

आणि जरी त्यास रज्जूनीं बध्द केलेला असून सांवरून धरला होता तरी तो मटकन खालीं बसला. एक निमी-षार्धे देखील तो स्वस्थ नव्हता. प्रणिपात करून तो ह्मणाला " बादशहांचे चरणीं जयदेवी आज्ञे प्रमाणें अर्पण करण्यास मी तयार आहे "

" बस्स हात आटपा " असा सेवकांस हुकूम करून अल्लाऊद्दीन हंसला आणि ह्मणाला " इतकी बाल्यता आणि असा कळस करण्यां पर्यंत मजल आणविण्याची काय जरुरी होती " आपल्या वचनास जागा " आणि त्यानें सेवकांस त्याची बडदास्त मध्यम-प्रतीची ठेवण्यास सांगून वेशीबाहेरील बंगल्यांत नजर-कैदेंत त्यास घेऊन जाण्याची आज्ञा केली. अल्लाऊद्दी-नाचें मुख सुप्रसन्न झालें परंतु रतनसिंगाचें काळवं-डलें जाऊन त्यावर मृत्युकळा आली.

---

## भाग ७ वा.

———:o✣c:———

मनुष्य जें जें इच्छितो, ज्याची ज्याची ह्मणून त्यास हांव असते आणि ज्याच्याबद्दल तो अटोकाट. प्रयत्न करतो तें तें सगळें जर साध्य झालें तर मनुष्या-चा विश्वास अदृष्य आणि अजिंक्य अशा दैवावर, कधींही बसावयाचा नाहीं. कोणी कांहीं ह्मणो, उद्योग हा तर नशिबाचा कारागीर आहेच पण उद्योगाला साह्य दैवाचें असावें लागतें हा अनुभव पुष्कळ वेळां येतो.

नानाप्रकारचीं साहस कर्मे करणारे, गांडिवाप्रमाणें प्रचंड अस्त्रांचा उपयोग करणारे, रणयज्ञांत नेहमीं विजयश्रीस साध्य करून घेणारे असे वीर महावीर ह्यांचा असा अनुभव आहे कीं, स्वतःच्या बलाचें आणि सेनेचें कितीही जरी सामर्थ्य असलें तरी एखादे प्रसंगीं रणपटावरील डाव हातचा जातो आणि एखादे प्रसंगीं सहजगत्या असा डाव साधतो कीं, विरुद्धपक्षाकडील जय्यत तयारीचा लवलेशही उपयोग होत नाहीं प्रत्येक व्यक्तीमात्रास दैव हें चळन देणारें आहे. इष्टानिष्ट प्रसंग मनुष्यावर येतात ते दैवाचे अनकूल प्रतिकूलतेवरच अवलंबून असतात. असाच प्रसंग संसारीक मनुष्यावर येतो. एकंदरीत दैव हें बलवत्तर आहे. त्याच्या अनकूलतेखेरीज मनुष्याचे उद्योग व्यर्थ आहेत असा पूर्वापार समज आहे आणि तो खरा दिसतो. आतां प्रत्येक गोष्टीला दोन बाजू आहेतच. प्रत्यक्ष परमेश्वराचे अस्तित्वासंबंधानेंही वाद आहेच तेव्हां ज्याला जो भाग वाटेल तो घ्यावा आणि जयपाळाचा प्रयत्न सिध्धीस न जाण्याचीं जीं कारणें असतील याचा मताप्रमाणें हिशेब करावा. एवढें मात्र खरें कीं, त्याचा बेत फसला आणि अलाऊद्दीन पुनः जयदेवीबद्दल चळवळ करूं लागला. दुखांत सुख मानायचे तें इतकेंच कीं, ही गोष्ट त्यास कळली नव्हती. आपली प्रतिज्ञा शेवटास जाण्याचा रंग दिसूं लागला इतकेंच नव्हे पण प्रतिज्ञेचें पुर्वांग तर आपण पुरें केलेंच तेव्हां ही बातमी जेसलमीरला परत जाऊन प्रिया जयदेवीला कधीं सांगेन अशा उत्कंठेनें जयपाळानें

जेसलमीरचा रस्ता धरिला होता. शिवाय त्यास अधिक द्रव्य पाहिजे होतें आणि तें जेसलमीरास आल्याशिवाय मिळणें शक्य नव्हतें.

पातशहाचे मृत्यूची खुनाची वार्ता हं हं ह्मणतां सर्वत्र पसरेल आणि तर्ककुतर्क निघून कदाचित आपल्यावर येतेल अशा समजुतीनें सरळ मार्ग सोडून तो आडमार्गानें लपत छपत जेसलमीरला जाण्याकरितां निघाला "खाई त्याला खवखवे" असें जें ह्मणतात त्याप्रमाणें जयपाळाचे मनाची स्थिती होती. वास्तविक त्याला कोणी पाहिलें नव्हतें आणि त्याजबद्दलचा संशय घेण्यास कोणास जागा नव्हती. शिवाय त्याठिकाणी तर कोणीच नव्हतें. परंतु "कदाचित पातशहाचे शोधार्थ असलेल्या स्वारांची नजर आपणाकडे गेली असती तर" हा रिकामा संशय त्यास डाचत होता आणि एवढ्याचसाठीं त्यानें सरळ मार्ग सोडून दिला. त्यावेळीं काहीं लोखंडी सडका नव्हत्या किंवा योग्य माप घेऊन सोईस्कर असे बांधलेले राजमार्गही नव्हते तथापि नेहमींचा रहदारीचा धोपट मार्ग तो त्यानें अजिबात सोडून दिला आणि तो शेतें, माळ वगैरे तुडविण्याच्या रिकाम्या त्रासांत पडला. रस्ता अनोळखी आणि अवघड असल्यानें बरेच प्रसंगीं त्याची कुचंबणी झाली. त्यास अनेक त्रास आणि संकटें सोसावीं लागलीं परंतु मनाचा जो ओढा होता त्यामुळें प्रवासाचे त्रास त्यास यःकिंचित वाटले. जयदेवीनें स्मितहास्य करून कमलदेठाप्रमाणें आपले कोमल कर गळ्यांत घालून चंद्राप्रमाणें पूर्णशोभायमान असें मुखकमल प्रफुल्ल

करून मंजूळ स्वरानें आपली तारीफ करावी अशी उत्कंठा होती आणि ह्मणूनच त्यास त्या उद्देशापुढें इतर अडचणी किंवा त्रास कांहींच वाटत नसत. असो;

जयदेवीचा निरोप घेऊन जेसलमीर सोडल्यास जयपाळाला बरेच दिवस झाले. पौर्णिमेच्या आंत बाहेर तो परत येणार या आशेवर जयदेवीनें पौर्णिमेपर्यंत कसेबसे दिवस काढले. पौर्णिमा उजाडली तेव्हां तर ती अति उत्कंठ झाली. आज जयपाळ खास येणार असा तिचा ग्रह होता. दिवसभर ती आंतबाहेर करीत होती. तिचें सगळें लक्ष वाटेकडे लागून राहिलें होतें. दुरवर नजर फेंकून जरा कोणी तिला दिसलेंसें वाटलें कीं, तो जयपाळच असावा अशा समजुतीनें ती त्याकडे टक लावून बसे. परंतु तिची निराशा होई. जयपाळाला किती तरी गोष्टी सांगण्याच्या ह्मणून तिनें आठवणींत ठेविल्या होत्या परंतु व्यर्थ सायंकाळ झाली. सूर्य अस्तास गेला. चांदणें पडलें. प्रहररात्र झाली, दोनप्रहर झाली. गांवातील घडामोड बंद झाली. संपूर्ण जेसलमीर निद्रिस्थ झालें तरी तिला आशा वाटत होती. अंथरुणावर पडून कांहीं वेळ मनोराज्य करावें, बोलल्या प्रमाणें जयपाळ आला नाहीं ह्मणून मनांत किंचित विषाद मानावा. कधीं त्याची स्थिति काय झाली असेल या चिंतेत असावें, पुनः बाहेर कांहीं खडबड झाली कीं, उत्सुकतेनें उठून बाहेर जावें, बाहेर शुभ्र चांदणें आणि मूर्तिमंत शांतता पाहून निराश होऊन पुनः अंथरुणावर आंग टाकावें असें सारी रात्र चाललें होतें. प्रभातसमयींचा शीत

वायु तिला स्पर्श करूं लागला. पक्षांची किलबिल फारच कमी प्रमाणानें सुरूं झाली. परिमलयुक्त प्रभातीच्या शीतवायुचे योगानें रात्रभर अस्वस्थ अशा मनाला किंचित हुशारी वाटूं लागली आणि डोळे जड होऊन मिटूं लागले. तरी तिला आशा होती. ती उठली. गवाक्षद्वारें तिनें कांहींवेळ बाहेर अवलोकन केलें. परंतु व्यर्थ. अद्याप पदार्थ स्पष्ट दृष्टीस पडण्यासारखें उजाडलें नव्हतें आणि त्यांत धुकेंही अतिशय पडलें होतें. तिची पराकाष्ठा झाली. शीत वायुचे योगानें तिला किंचित थंडी वाजूं लागली आणि निराशेनें ती अंथरुणावर पडली. विचारांतच तिजवर निद्रेनें झडप घातली, ती निद्रा नव्हतीच कारण निद्रेमुळें तिला जें सुख वाटावयाचें तें जर स्वस्थ झोंप येईल तर? स्वस्थ आणि गाढ निद्रा, मन जर स्वस्थ असेल तरच येईल. जयदेवी अर्धीमुर्धी झोंपेंत होती असें ह्मणावयाला कांहीं हरकत नाहीं.

डोळा लागतांच तिला स्वप्नें पडूं लागलीं. " मनीं वसे तें स्वप्नीं दिसे " त्याप्रमाणें जयपाळ विजयी होऊन बाबानां बरोबर घेऊन परत आला आहे. बाबानीं लग्नाचा विचार ठरविला आहे. जयपाळाची मुद्रा आनंदित दिसत असून त्यास कृतकृत्य झालों असें वाटत आहे. दोघांनां एकांत मिळावा ह्मणून बाबा निघून गेल्याबरोबर जयपाळानें धांवत येऊन आपणांस आलिंगन दिलें आहे आणि आपण किंचित सरोषदृष्टीनें त्याच्याकडे पहात आहों तो रागाविर्भाव त्यास असह्य होऊनच की काय त्यानें नेत्र मिटीले आहेत. आपण

आपल्या प्रेमकोपाचा विलक्षण परिणाम झालेला पाहून मोठ्या सद्गदित रवानें त्याची विनवणी करीत आहों-त तथापि त्याचें तिकडे दुर्लक्ष आहे. इतक्यांत एका-एकीं रागानें त्यानें आपणास दूर ढकलून देऊन पळ काढला आहे आणि आपण शोकार्तस्वरानें त्यास हा-का मारीत आहों असें पाहतांच ती शोकानें ओरडतच उठून बसे आणि पूर्ण जागी झाल्यावर स्वप्नांतलेच सर्व प्रकार म्हणून पुनः पडे. असा क्रम सकाळीं प्रहर दि-वसपर्यंत चालू होता. पुढें ती उठली. नित्य व्यवहारि-क कृत्यांकडे तिचें लक्षच लागेना. तिचें वदन निस्तेज झालें. दिवसभर अस्वस्थता तिला जाचूं लागली. तो दिवस गेला, दोन दिवस गेले. आठवडा, पंधरवडा गेला, तीन वार झाले; दुसरी पौर्णिमा उजाडली तरी जयपाळाचा पत्ता नाहीं. त्याच्यासंबंधानें विपरीत असे विचार तिच्या मनांत येऊं लागले. दुःखाची सीमा झा-ली. अस्वस्थतेनें तिला बेजार केलें. क्षीणत्व आलें आ-णि तिची स्थिति चमत्कारिक झाली.

दुसरी पौर्णिमा उजाडली. पौर्णिमेपर्यंत ती दिवस मोजीतच होती. कारण ही नाहीं पुढली तरी अशी तिची आशा अद्याप तिला धीर देत होती. दिवसभर तिचे वाटेकडे डोळे लागले होते पण व्यर्थ. निराशा तिला सोडील तेव्हां मात्र सगळ्या गोष्टी. दोनप्रहर उलटून गेली तेव्हां मात्र तिची पक्की खात्री झाली कीं, जयपाळावर काहीं तरी भयंकर संकट ओढवलें अस-लें पाहिजे. एरव्हीं तो वचनास ढळणार नाहीं "वैरी न चिंती तें मन चिंती." नानाप्रकारच्या कल्पनांनीं

तिला वेढावून सोडिलें. तरी अद्याप आशातंतु किंचित सजीव होता. अजून सायंकाळ आणि मध्यरात्र उलटावयाची आहे असें तो सुचवीत होता. सायंकाळ झाली. संधिप्रकाश पडला. प्रतिचीला चंद्रबिंब दिसूं लागलें दिनक्रमाची समाप्ति होण्याचा वेळ अगदीं नजीक आला तरी जयपालाचा पत्ता नाहीं. रस्त्यावर दूरवर नजर देऊन पाहिलें तरी शेतांतून गुरें घेऊन परत येत असलेल्या शेतकऱ्या शिवाय दुसरें मनुष्य दिसत नाहीं निराशा पुनः पुनः बजावून तिला आपलें आस्तित्व कबूल करण्यास लावून स्थान मागूं लागली तरी अजून रात्र उलटावयाची आहे, असें आशा सुचवीत होती.

नित्य नेमाप्रमाणें ती सायंकाळीं कैलाससरोवराचे कांठीं असलेल्या एकलिंगजींचे देवालयाकडे देवदर्शनार्थ जाण्यास निघाली. बरोबर तिचा आवडता मयूर होताच. देवालयाकडे जातां जातां देखील कितीकदां तरी ती उभी राही मागें वळून पाही परंतु व्यर्थ. देवालयांत शिरून तिनें एकलिंगजींचें दर्शन घेतलें त्या महेश्वरास तिनें जयपालाबद्दल कितीतरी नवस केले होते! तिनें त्या नवसांचा पुनरुच्चार करून आणखीही कांहीं त्यांत मिळविले. अनन्यभावें मृडानीनाथाची स्तुति करून तिनें त्यास विनविलें आणि ती बाहेर पडली.

संध्यासमय उलटण्याची अखेरवेळा असल्याकारणानें रजनिनाथ पूर्ण कलायुक्त असा नभमार्गी झळकूं लागला. कर्पूराप्रमाणें शुभ्र आणि शीत अशीं त्याची किरणें भूभाग आणि विशेषतः कैलाससरो-

कलासस-

उदकांत पूर्ण

न दोन कलानिधी

विकासीनीकमलांस तें

त्यांनीं आपलीं वदनें

कासीनींना जो आनंद

च. त्यांनीं आपल्या प्रफुल्ल-

सरोवरास शोभा आणिली. हिमनग-

जाधवाचे देवालयांतील सुगंधीद्रव्याचे परिमळानें आसमंतांत परिमल सुटून तो जनमनें प्रफुल्लित करूं लागला. शिखरावरील दीपोत्साह मनाला आनंदवूं लागला, आणि संध्यारागावर सुस्वर अलाप काढणाऱ्या सनईचा मधुररव कर्णांस तोषवूं लागला. उमावराचे नांवाचा जयघोष मनांत भक्ती उत्पन्न करून जनमनें आपणांकडे ओढूं लागला. स्त्रीपुरुषांची देवालयांत गर्दी झाली.

परंतु जयदेवीचें लक्ष तिकडे लागेना. ती कैलाससरोवरावरील घांटावर येऊन बसली. तिचें लक्ष पूर्ण बिंबाकडे, कमलिनीकडे किंवा त्यावेळच्या सुंदर देवाल्याकडे नव्हतें. तिनें दृष्टि जरी चंद्राकडे लाविली होती तरी तिचे अंतर्दृष्टीपुढें मूर्ति होती ती निराळीच. एक पाय खालीं सोडून दुसऱ्या पायाची तिनें मांडी घातली होती. हातांतील स्फटिकाची स्मरणीमाळ एका बाजूस ठेविली होती. आणि डाव्या हातावर आधार ठेऊन दुसरा हात उभा धरिला होता आणि त्यावर हनुवटी टेंकून तिनें वर नजर लाविली होती. ती इतकी

कांहीं
स हीं पुत्र
कन्या आहे किं
असता. परिस्थिती
मयूर आपणा पाठीं
कोठें मुकला हें तिला
मुळींच आम्हांस त्याजकडे
परंतु अनिसहवासानें ज्याला अगदा वळ
होतें, असा तो मयूर तिला सोडून कोठें जाईल! तो तर्थेच इकडून तिकडे अशा खेपा घालीत होता. तो आनंदी प्राणी मात्र सायंकाळची मौज अनुभवीत होता. त्या बिचाऱ्याला भगिनीच्या दुःखाची काय कल्पना असणार! तितकें जर त्यास ज्ञान असतें तर त्याला भगिनीची स्थिती पाहून खात्रीनें वाईट वाटलें असतें. प्रसाद म्हणून जी कमलपुष्पें जयदेवीनें देवालयांतून आणली होतीं त्यांच्याशींच त्याचे खेळ चालले होते. अथवा त्या कमळांचा तो नाश करून मनाला करमणूक करून घेत होता असें म्हटलें तरी चालेल.

अहाहा त्या स्थितींत देखील जयदेवी किती मोहक दिसत होती! जरी ती किंचित क्षीण झाली होती, निराशेनें अस्वस्थ होती आणि कांहीं निस्तेज दिसत होती तरी कमलदेंठाप्रमाणें मृदु अशा हस्तावर टेंकलेलें तें शशीवदन, मुद्दमूद शरीराची ठेवण, बसण्याची ढब, अभिसारिके प्रमाणें पोशाख इत्यादिकें करून ती फारच शोभत होती. त्यांतून जर पूर्वीप्रमाणें प्रफुल्लवदन, शांतवृत्ति, तेजस्विता, अलंकारभूषित आणि

उत्तम पोषाखानें मंडीत अशी जर ती त्या स्थलीं तशा वेळीं बसती तर कमलनयना लक्ष्मीप्रमाणेंच ती भासली असती. तिजमध्यें न्यूनत्व आणण्यास एक जयपाळ कारण आणि त्याचेच संबंधानें विचार तिचे हृदयांत काहूर उमळावित होते.

संध्याकाळ टळली. तरी तिला भानच नव्हतें परंतु तिच्या मयूरानें मात्र गडबड करण्यास प्रारंभ केला. विस्कळीत कमळांच्या पाकळ्या आणि स्फाटिक-माळा तिच्या हातांत देऊन घरीं चलण्याची सूचना तो करूं लागला, तरी तिनें प्रथम तिकडे लक्षच दिलें नाहीं, परंतु मग तो मयूर उडून तिचे अंकावर बसला, आणि गडबड करून तिला उठविण्याचा प्रयत्न करूं लागला. त्याच्या चळवळीनें ती भानावर आली परंतु रात्र पडत चालली ह्मणून उठून घरीं जाण्याची जी त्या मयूरानें सूचना केली होती तिकडे तिचें दुर्लक्षच होतें. तिनें त्याला त्रासल्यासारखें करून दूर झुगारून दिलें आणि " उगच नको कटकट लावूं. बस स्वस्थ तिकडे नाहींतर कुठें तरी जा " असें किंचित रागानें ह्मटलें. अश्रूपूर्ण नयन पदरानें पुसले. कमळांच्या पाकळ्या आणि स्मरणीमाळा एका बाजूस फेंकिली आणि पुनः चंद्रबिंबाकडे नजर लावून बसली.

रागानें बोललेलें कळण्याइतकें ज्ञान त्या मयूरास होतें. तो एका बाजूस गेला. नितक्यांत त्यास कोणी उचललें आणि लडिवाळपणानें " माझ्या जवळ ये. रागीट माणसाकडे आपण जाऊंच नये " असें ह्मणून त्यास कुरवाळिलें. परंतु तो मनुष्य पडला अनोळखी.

अनावरांस, पशु-पक्ष्यांस काय, सर्वांस स्पर्शज्ञान असतें. तो स्पर्श त्यानें तेव्हांच ओळखला, आणि त्याचे हातून सुटण्या करितां तो फडफड करूं लागला. तो घट्ट धरला गेला असल्यामुळें पंखाचे फडफडीनें त्याचा कार्यभाग होईना, म्हणून त्यानें टाहो फोडण्यास सुरवात केली.

ती केकावली कानीं पडतांच वात्सल्यामुळें, जयदेवीचें साहजिक तिकडे लक्ष गेलें, आणि " पुरेरे बाबा तुझा त्रास. उद्यांपासून तूं मजबरोबर येतही जाऊं नकोस आणि मग रिकामी कटकट लावून त्रासवूंही नकोस " असें म्हणून ज्या बाजूस त्याला भुगारून दिलें होतें, तिकडे ती पाहूं लागली. परंतु तेथें तो नव्हताच. तिला नजर फिरवावी लागली, आणि ती मागें वळून पहाते तों दीपावलीचे प्रकाशांत जी मूर्ति मयूराला घेऊन उभी असलेली दिसली, ती पाहून, तिनें लाजेनें मान खालीं घातली आणि तत्क्षणींच विद्युल्लतेचे चपलतेनें तिचे मुखकमलावरील निस्तेजता उडून जाऊन नभमंडळांतील शशीबिंबाप्रमाणें तें पूर्णकलानिधी झालें.

मयूरास किंचित सैल सोडतांच तो जयपाळाचे हातांतून निसटून आपल्या धनिणीकडे गेला. तिनें त्याला उचलून घेतलें, आणि स्मितहास्य करून म्हणाली " इतका गहजब करायला कोणी परक्यानें कां तुला धरलें होतें. ? पुरुषाचा हात तुला कदाचित बरा नसेल वाटत. आधींच ते मनानें कठोर आणि तुझ्यासारख्या कोमळ प्राण्याला मृदूतऱ्हेनें कसं वागवावं, ह्याविषयीं

अपरिचित ह्मणून कदाचित तुझे हाल झाले असतील. होय ना ! "

दोघांनीं बोलण्यास प्रारंभ कोणी आणि कसा करावा ही मोठी अडचण पडली होती. जयपाळाला काय वाटत असेल तें त्याच्या ओशाळलेल्या चेहऱ्यावरून दिसून येतच होतें. त्याचे तोंडांतून प्रथम शब्द निघताच ना! कारण तो अपराधी होता. जयदेवीला आनंदाचे आणि लज्जेचे भरांत एकदम बोलण्याचें सुचलें नाहीं, तरी प्रारंभ तिनेंच केला. असो.

तिचें संदिग्ध भाषण ऐकून जयपाळ ह्मणाला " पुरुष कठोर तर असतातच पण– "

जयदेवीनें त्याजकडे तोंड करून ह्मटलें " खरंच इतका राग नको कांहीं यायला! मी सहज थट्टेनें ह्मटलें. आजच पौर्णिमा आहे " असें ह्मणून तिनें प्रेमपूर्ण नेत्रांनीं त्याजकडे अवलोकन केलें.

जयपाळ मुखस्तंभ राहिला. त्याचें मन त्याला खात होतें.

तें पाहून जयदेवीनें मयूरास खालीं सोडिला आणि जयपाळाजवळ जाऊन ती ह्मणाली, " खरंच गडे. एक पौर्णिमा जाऊन आज दुसरी उजाडली. बोलल्याप्रमाणें वर्तणूक न झाल्याकारणानेंच कां इतकें वाईट वाटून घ्यायचें ? "

तरी जयपाळ गप्पच उभा होता.

त्याचे कंठांत हात घालून आणि दीन वदन करून जयदेवी ह्मणाली " माझ्या बोलण्यानें जर कांहीं अपमान झालासा वाटत असला तर मी क्षमा मागतें.

प्रिया जयपाळा बाबाकडील खबर काय आहे ती लवकर सांगा पाहूं ?

जयपाळानें दीर्घ श्वास सोडला आणि आपल्या कंठांत असलेला तिचा कोमल हात एका बाजूस केला.

याबरून जयदेवी ह्मणाली " काय, कांहीं विपरीत झालें आहे ह्मणून तुह्मांला तिकडील खबर सांगतां येत नाहीं ? प्रिया जयपाळा, काय असेल तें एकदम सांगून टाका. मला संशयांत ठेवूं नका. "

" कांहीं नांहीं " इतकेंच जयपाळ ह्मणाला परंतु चाणाक्ष जयदेवीला तो आपल्यापासून कांहीं चोरून ठेवीत आहे, असें तात्काळ कळून आलें.

ती आर्तस्वरानें ह्मणाली " प्रिया, प्रत्यक्ष हृदयाचें चूर्ण करून टाकण्यासारखी जरी कांहीं खबर असेल, तरी मज विषयीं मनांत बिलकूल भीति न धरतां स्पष्टपणें मला सांगा. माझें हृदय मी वज्रापेक्षांही कठीण केलें आहे. काय, बाबांची त्या नीच अल्लाऊद्दीनानें वाट लाविली ?

" नाहीं " इतकेंच उत्तर तिला मिळालें,

जयदेवीनें चौकसपणानें विचारिलें " तर काय आपला डाव फसून आपणांवर काहीं संकट आलें आहे ?

" नाहीं " पुनः इतकींच अक्षरें उच्चारून जयपाळानें नेत्रांतून पाणी काढिलें.

" मग मला सांगण्यासारखं नाहींच कां कांहीं ? प्रिया संशयांतच मी मरावें असंच का आपणाला वाटतं " अगदीं केविलवाणें तोंड करून जयदेवी ह्मणाली.

तिची ती वृत्ति पाहून जयपाळास फारच वाईट

वाटलें. तथापि आपल्या उदासीनतेचें कारण तिला कळवूं नये असेंच त्याला वाटत होतें. तो कांहींच बोलला नाहीं.

त्याची ती उद्विग्न मुद्रा आणि मौन्य पाहून जयदेवीस पराकाष्टेचें दुःख झालें. उद्विग्नतेचें कारण ऐकण्यास ती अतिशय उत्सुक झाली होती. जयपाळ कांहींच बोलत नाहींसें पाहून "हाय हाय, माझेबद्दल देखील आपणांस अविश्वास उत्पन्न झाला आहे, हेंच कारण असावें" असें ह्मणून सुकुमार हस्तांनीं त्यास वेलीप्रमाणें गुरफटून तिनें त्याचे उरस्थलावर डोकें टेकिलें. आणि तिच्या उष्ण नेत्रबिंदूनीं त्याचा तो भाग ओला केला.

जयपाळ अत्यंत गहिंवरून ह्मणाला "शुद्धमना जयदेवी, तुजबद्दल तिळमात्रही माझे मनांत किंतु नाहीं, किंवा तुजबद्दल माझे ठिकाणी गैरविश्वास उत्पन्न व्हावा असें तुझें आचरणच नाहीं. माझ्या उद्विग्नतेचें आणि दुःखाचें जें कारण आहे तें तुला न कळावें असें मला वाटतें कारण त्यायोगें माझें हृदय जर चूर्ण होत आहे तर तुजसारख्या कोमल हृदया कुमारीकेची काय स्थिती होईल असा विचार माझे मनांत येऊन मला तें तुला सांगण्याचें धाडस करवत नाहीं. हाय, हाय" दुःखाचा सुस्कारा टाकून तो ह्मणाला "ज्या उत्कंठेनें मी तुजकडे येण्यास निघालों, ज्या तुझ्या प्रीतीच्या जोरावर आणि उत्कंठेच्या अजब सहायानें रानांवनांतील संकटें न जुमानतां येथवर आलों, त्या उत्कंठेचें आज, अगदीं ऐनवेळीं चूर्ण झालें."

विस्मयचकित होऊन जयदेवी ह्मणाली "काय

माझ्यावरील प्रीतीचा नाश झाला, असें आपण बोलतां!"

"छे, छे, जयदेवी परमेश्वर करो आणि तसें कधींही न व्हावो. तुझे ऐकण्यांत फरक झाला. माझें बोलणें तूं बरोबर ऐकलें नाहींस. असो. तुझ्या निष्कपट प्रेमपाशानेंच तर मी येथें आलों, नाहींपेक्षां ज्या स्थळीं माझ्या उत्कंठेचें चूर्ण झालें तेथपासूनच परत फिरलों असतों. जयदेवी, कुळभूषणें कुमारी स्वयंवर करूनच तुझ्याशीं विवाह करावा हा जो माझा हेतु तोही आतां असाध्य झाला." जयपाळ ह्मणाला

"काय, असाध्य झाला! जयपाळ, बोला लवकर. मी आपलं हृदय इतकं कांहीं कठीण केलं आहे कीं, प्रलयकालचे गर्जने प्रमाणें जरी ती खबर अत्यंत भयंकर असली तरी मला तिचें कांहीं वाटणार नाहीं. मला पुर्तेपणीं कांहींच ताडतां येत नाहीं, तथापि आतांपर्यंतच्या आपल्या बोलण्यावरून जें कांहीं थोडें बहुत माझे लक्षांत आलें, तेवढ्यावरून मला वाटतं कीं, आपला बेत फसला. आपलें गुह्य उघड होऊन जरी आपण सुटला आहां, तरी बाबानां त्याचं प्रायश्चित्त भोगावं लागत आहे. आपल्याच्यानें त्यांची सुटका करवत नाहीं. असंच कीं नाहीं;" तिनें मिठी सोडून एका बाजूस उभी राहून त्यास ह्मटलें. त्यावेळीं तिची मुद्रा जरा उग्र दिसत असून जयपाळास त्यावर तिरस्काराची छटा दिसून आली.

"कांहीं अंशीं तूं जें ताडलंस तें खरें आहे. परंतु तुझ्या बाबानां मात्र बिलकुल त्रास पोंचत नाहीं. ते सुखांत आहेत. बंदिवासांतील दुःखाची कल्पना दे-

खील आतां त्यांना होत नसेल " जयपाळ ह्मणाला.

किंचित प्रसन्न मुद्रेनें जयदेवी ह्मणाली " दिल्ली-पतीनें त्यांची योग्यता जाणून त्यांनां मुक्त केलें काय!"

" दिल्लीपती त्यांना मुक्त करणार? सर्पाची जात ती. त्यानां दया, माया कोठची? बाबानींच मुक्तता करून घेतली " जयपाळानें उत्तर दिलें परंतु लज्जेनें त्यानें मान खालीं घातली.

" बाबानीं आपलं पाणी दाखवलं तर त्या मुसं-ड्यांनां! वहावा, जयपाळ, आतां त्यांची माझी भेट कधीं होईल बरं? " अत्यंत उत्सुकतेनें जयदेवीनें वि-चारिलें.

जयपालानें तिरस्कारयुक्त मुद्रा करून उत्तर दिलें, " जयदेवी, तुझ्या सारख्या कुलभूषणेनें त्याची पुन्हः भेट घेणें अगदीं गैरवाजवी होणार आहे "

" ह्मणजे " असें ह्मणून विस्मयित होऊन जयदे-वीनें विचारिलें.

" जयदेवी, तें तूं मला विचारूं नकोस. तुला तें जरी कळणार आहे, तरी त्याचा माझ्या मुखांतून उच्चार व्हावा, हें मला योग्य वाटत नाहीं. शृंगारल-तिके, तुला संशयांत ठेवल्या कारणानें मजबद्दल जर तुझ्या ठिकाणीं रोष उत्पन्न झाला, तर त्याचे शमनार्थ तूं मला पाहिजे तें शासन कर. परंतु माझ्या उद्वि-ग्नतेचें कारण अथवा तुझ्या बापाबद्दल एक शब्दाक्षरही मला विचारूं नकोस. माझें हृदय आंतून पेटतें आहे. तो भडका जर सगळ्या शरीराची राख करून टाकील, तर फार बरें होईल. भ्रष्टता—" पण इतक्यांत त्यानें

जीभ आंवरली. त्याची मुद्रा भयंकर दिसूं लागली. क्रोधाच्या तडाक्यांत तो पूर्ण सांपडला, हें जयदेवीनें जाणलें आणि ती दूर होऊन घाबऱ्या स्वरानें ह्मणाली, " भगवाई, हें काय! आपण पुढें काय बोलणार होता! आणि आपली शांत मूर्ति एकाएकीं इतकी खवळल्यासारखी कां दिसूं लागली! जयपाळ, माझा जर कांहीं अपराधच आपल्या रागाचें कारण असेल तर मी क्षमा मागतें, आणि आपण शेवटले जे शब्द उच्चारले त्याप्रमाणेंच जर आपणांस मजविषयींचा संशय येत असून त्याचमुळें हृदयांत भडका उडाला असेल तर माझी वाट लावून आपण आपल्या कोपाचें शमन करा. " दीन वदन करून ती पुढें ह्मणाली " जयपाळ, आपले देह भिन्न आहेत, आणि अद्यापि आपण विवाह रज्जूनें एकबद्ध झालों नाहीं, हें जरी खरें आहे तरी सर्वांसमक्ष जो वाक्‌निश्चयविधी झाला, त्याअर्थी आपण माझे स्वामि निश्चीत झाला नाहीं काय? मी तर आपला देह एक समजतें. जयपाळ, बोला बोला आपणाला कसला इतका राग असा आला आहे तो. मी आपणांपुढें पदर पसरितें. "

तिचें दीनवदन, अश्रुपूर्ण नेत्र आणि थरथरणारे ओंठ पाहिल्याबरोबर जयपाळास अत्यंत वाईट वाटलें, आणि तो मोठ्या सदयतेनें तिच्या हनुवटीस स्पर्श करून ह्मणाला " लावण्यवती जयदेवी, छे छे इतक्या निकरावर तूं येऊं नकोस. तुजबद्दल माझें मन किती निर्मळ आहे आणि झालेल्या निश्चयाची गांठ हृदयांत इतकी पूर्ण दृढ बसली आहे कीं, जर माझ्यानें हें हृ-

दावा. रात्रीं शय्येवर पडल्यावर एकांत स्थान मिळा-ल्याकारणानें विचारांनीं उचल खावी निद्रा येऊं नये. तळमळ व्हावी. कचित पहांटच्या किंचित शीत परंतु सुखकर अशा वाऱ्याचे झुळकीनें त्याजवर मेहेरनजर करून निद्रेचा आणि त्याचा समागम जुळवून दिलाच तर " मोठ्या समारंभानें जयदेवीनें दिल्लींत प्रवेश केला असून दिल्लीपती अल्लाऊद्दीन तिला सामोरा गेला आहे. तिची बन्दोबस्त उत्तमप्रकारची ठेवून तो तिला आपलें वैभव दाखवून पर्यायानें रजपूतांची क्षुद्रता तिला उघड व्यक्त करून दाखवीत आहे. तिला तें सर्व खरें आणि रास्त वाटून तिनें उघड महंमदी धर्माचा स्वीकार करून अल्लाऊद्दीनाशीं लग्न लाविलें, आणि तीं दोघें आनंदांत आहेत. तिला बापाची आठवण मुळींच होत नसून रजपूत मंडळीसंबंधानें तिचे मनांत तिरस्कार उत्पन्न झाला आहे. नंतर आपणांस कबूल केल्या प्रमाणें अल्लाऊद्दीनानें चितोड परत न देतां तेथें गादीवर स्थापन केलेल्या आपल्या मुलाचे दरबारीं सरदार बनून राहण्यास सांगितलें आहे. आपणास अन्य उपाय उरला नाहीं समजून आपण तें कबूल केलें आहे, आणि त्याच्या मुलाच्या मुखीचे वाक्शर मोठ्या मिनतवारीनें आणि शांतपणानें ऐकून घेत असून त्याजबद्दल स्वजातीय आणि स्वदेशस्थ व पूर्वीचे प्रजाजन आपल्या नेभळेपणाबद्दल अत्यंत लाजिरवाणीं अशीं अपमानाचीं विशेषणें देऊन उपहास दर्शवीत आहेत. मुसलमानास मुलगी देऊन स्वतःची सुटका करून घे-

णारा ह्मणजे आपल्या पोरीचा गळा कापणारा, तिचा सर्वस्वी नाश करणारा, अथवा तिला भ्रष्टमार्ग दाखविणारा बाप हा, असें ह्मणून तिरस्कारदर्शक हंसत आहेत आणि आपल्याकडे बोटें दाखवीत आहेत. आपणांस तें विषासमान लागून त्याचा प्रतिकार करण्याचें साधन, व सामर्थ्य नसल्याकारणानें मनांतले मनांत जळफळत अपमान सोसावा लागत आहे. बाहेर तोंड काढण्यास जागा नाहींशी झाली आहे, आणि तशा स्थितींत मनाची टोंचणी अबाधित चालूं असल्याकारणानें आपणांस चित्तभ्रम होऊन वेड्याप्रमाणें चाळे करूं लागलों असून, एकवेळ चितोडाधिपती असणाऱ्या राजाला चितोडच्या रस्त्यांतुन धोंडे मारीत वेडा ह्मणून फिरण्याची पाळी आली आहे " किंवा " जयपाळानें पत्र कोणासच न दाखवितां दाबून ठेविलें आहे. दिवसांची मुदत संपल्यामुळें अल्लाऊद्दीनानें स्वतः जसलमीरास वेढा दिला आहे. प्रणयी जयपाळ जिवावर उदार होऊन कांहीं मंडळींच्या साह्यानें त्यास प्रतिबंध करीत आहे. तथापि अल्लाऊद्दीनापुढें त्याचें शौर्य व्यर्थ होत असून त्याचा माघार होत आहे. वेळ साधून अल्लाऊद्दीनानें जयपाळास वार करून घोड्याखालीं पाडलें आहे. त्याचा प्राण तळमळत असूनही जयदेवीबद्दल तो, हळहळत आहे इतक्यांत आपल्याकडे त्याची नजर गेली असून तो दांत ओंठ खाऊन आपणांस कुलकलंकी ह्मणून विशेषण देऊन अनेक उपहासास्पद शब्द बोलत आहे. शिव्या शाप देत आहे. त्याचा प्राण निघून गेला आहे. जयदेवी

आक्रोश करीत त्याच्या प्रेताजवळ येऊन पोंचते आहे, इतक्यांत अल्लाऊद्दीनानें तिला धरून घोड्यावर बसविली आहे, व सर्वत्र मंडळीसह त्यानें दिल्लीची वाट धरिली आहे, मध्यंतरी जयदेवीचें लक्ष आपणांकडे लागून ती आपला उपहास करीत आहे व संधी सांपडतांच " स्वतःचे मुलीस भ्रष्ट करणाऱ्या पित्यास जन्मभर त्रास व विपत्ती आणि परलोकीं नर्कवासच मिळणार " असा आपणांस श्राप देऊन तिनें विषपूर्ण मुद्रिका गिळली आहे, तिचे आंगाचा दाह होऊन जीव कासावीस होत आहे, आणि पुढें कांहीं उपाय कोणी करण्याचे अगोदर ती गतप्राण होऊन घोड्यावरून खालीं पडली "अथवा " अल्लाउद्दीनानें तिच्याशीं जुलूमानें लग्न लावलें आहे. तिला महंमदीधर्माची दिक्षा दिली आहे. कांहीं दिवस ती दिल्लीपतीचें आराध्यदेवत बनली. परंतु पुढें अल्लाऊद्दीनास तिचें महत्व कमी वाटूं लागून तिजकडे तो बरेंच दुर्लक्ष करूं लागला. तिची कौलादेवीप्रमाणें स्थिती होऊन विरहावस्थेंत तिला दिवस काढावें लागून ती आपणास अतोनात श्राप देत आहे. आपल्या एकुलत्याएक दुहितेची सर्वस्वी दुर्दशा झाली आहे " असे किंवा ह्याहूनही भयंकर असे देखावे त्यास स्वप्नांत मूर्तिमंत दिसावेत आणि त्यानें दचकून उठावें. स्वप्नांतील गोष्टींचा परिणाम त्याजवर फारच वाईट व्हावा. त्याला शय्येवर पडूं नयेसेंच वाटूं लागलें.

कांहीं केल्या स्वस्थता मिळत नाहीं. मनाची टोंचणी कमी होत नाहीं, आणि विवेकाचें अस्तित्व तर

त्याचें मन मानीत नाहीं मग त्यानें काय करावें! अशा स्थितींत डोकें खाजवूनही कांहीं तोड निघेना. दुसऱ्याचा मल्ला तरी त्यानें कसा मिळवावा! कारण अल्लाऊद्दीनाचे अत्यंत विश्वासू अशा मंडळींनीं तो वेढलेला. तेव्हां तोड कांहीं तरी त्याचेच मेंदुतून निघाली पाहिजे. पक्के निगरगट्टही त्यास बनतां येईना. अशा कांहीं चमत्कारिक पेंचांत तो सांपडला गेला. तरी हालचाल जर कांहीं करावयाची असेल तर ती स्वतः आपणच केली पाहिजे हें तो पक्कें समजून होता.

दुसरी गोष्ट अशी होती कीं, तशा स्थितींत अस्वस्थतेनेंच मरणें देखील त्यास प्रिय वाटत नव्हतें. असे दिवस काढीत असतां ह्मणजे क्रमाक्रमानें त्याची अस्वस्थता वाढत असतां, एकें दिवशीं सहज तो गवाक्षद्वारें बाहेरील बगीच्याचे सौंदर्याकडे नजर लावून बसला होता त्यास दृष्टीसमोर जयदेवी दिसूं लागली. तिचा चेहरा निस्तेज असून नेत्र अश्रूपूर्ण होते. आणि ती अत्यंत दीनावस्थेंत असल्याचें त्यास भासलें. तिनें आपल्या अंतस्थितीचा पाढा वाचून दीनवाणीनें आत्मघात करून घेण्याबद्दल त्याची परवानगी मागितली. आणि एव्हढें दान तरी मला द्याच असें ह्मणून पदर पसरून ती उभी असल्याचा त्यास भास झाला.

त्यानें तिकडून नजर फिरविली आणि पुनः पहिल्या स्थळीं अवलोकन केलें, तों त्यास तेथें उपवनशोभेशिवाय कांहींच नजरेस पडेना तेव्हां हा सर्व भास समजून तो जाग्यावरून उठला. त्याचे मनांत कांहीं विचार आले आणि त्या झटक्यासरशीं त्यानें लिहि-

ण्याचें सामान पुढें घेतलें आणि एका कागदावर कांहीं खरडलें. त्या कागदाची घडी केली आणि वर कांहीं लिहून, लिहिण्याचें सामान उचलून ठेविलें, आणि तो स्वच्छ मोकळया हवेवर-सज्ज्यावर-येऊन बसला.

त्याला किंचित संतोष वाटला असें दिसलें. तो स्वतःशींच विचार करीत होता, तथापि पूर्वीप्रमाणें निराशेचीं चिन्हें त्याचे चेहऱ्यावर दिसत नव्हतीं. एवढ्यावरून आणि वारंवारदां तें खरडलेलें पत्र काढून पाही, कधीं उलगडून वाची. ह्यावरून त्यांत जें कांहीं त्यानें लिहिलें त्यायोगानेंच त्याला संतोष वाटला, असें अनुमान होतें आणि तें खरेंच. कारण तो सज्ज्यावरून उठतां-उठतां ह्मणाला, " बस्स काय होईल तें होवो. अपकीर्ति पेक्षां मरण पुष्कळ उत्तम. " परंतु हें जेसलमीरास कोण घेऊन जाईल? " तो दिवाणखान्यांत आला. त्याचा उद्वेग बराच कमी झाला. तथापि तें पत्र नेणारा कोण ही त्याला चिंता उत्पन्न झाली. त्यानें एका नोकरास हांक मारली आणि तो त्यास कांहीं सांगणार, इतक्यांत अल्लाउद्दीन हंसत हंसत आंत आला, आणि हात पुढें करून ह्मणाला " जेसलमीरास पत्र घेऊन जाणारा माझ्याशिवाय दुसरा विश्वासू मनुष्य तुह्मांला कोणीच मिळणार नाहीं. "

त्या भाषणानें राजा इतका काहीं ओशाळला कीं, त्यानें खालींच मान घातली. गुप्त गोष्ट प्रथमारंभींच उघडकीस आली, तेव्हां ईश्वरीसंकेतच तसा " असें त्याचे मनांत आलें.

अल्लाउद्दीनानें राजाला हालवून ह्मटलें " आपण

असे ओशाळता काय ह्मणून? आणा पाहूं तें पत्र. मुखाची अपेक्षा होती तें मिळालें. आतां तुह्माला " अपकीर्ति " दिसूं लागली. मरण चालून येत असतां त्यास लांब पळवून टाकिलें कोणी? स्वतः आपणच नां!"

रतनसिंग गप्प होता.

" बेइमान, तें पत्र काढ कोठें आहे तें! मला तें अवश्य वाचलें पाहिजे. कॉफर ते काफरच. त्यांच्यावर उपकार ह्मणजे सर्पावर उपकार केल्याप्रमाणें आहेत." अल्लाउद्दीन रागानें ह्मणाला.

रतनसिंग निरुत्तरच झाला. त्याच्यानें उत्तर काय देववतें! पत्र तरी त्याचे स्वाधीन कसें करावें, असा त्याला विचार पडला.

अल्लाउद्दीनानें रागानें त्याला चांगला हलवीला आणि ह्मणाला. " पत्र दाखीव नाहींतर मरण बरें ह्मणून ह्मणत होतास तेंच कपाळीं येईल, बोल! " अल्लाउद्दीन पुरता रागावला.

रतनसिंगाचा निश्चय ढळला. मरणाचें आधिकत्व नाहींसें झालें, अपकीर्तीची भीति पार उडाली. उपहास क्षुल्लकसा झाला, आणि त्यानें कांपऱ्या हातानें तें पत्र अल्लाउद्दीनाचे स्वाधीन केलें

तें पत्र घेतांना रतनसिंगाच्या हाताला अल्लाउद्दीनानें असा कांहीं जोराचा हिसडा दिला कीं, तेवढ्यावरून आजचा क्रोध अनिवार आहे अशी राण्याची खात्री झाली.

अल्लाउद्दीनानें त्या पत्रांतील मजकूर वाचला, आ-

णि रागानें त्याचे तुकडे करून तें फेंकून दिलें. क्रोधानें चेहरा लाल करून, आणि नाकपुड्या फुगवून तो ह्मणाला " बेवकूब, असलें पत्र जेसलमीरास नेणारा दिल्लीस एकादा बेईमान सांपडेल काय? अलबत, तुला कारागृहवासच सोईस्कर आहे. मनाची चलबिचल बंद करण्यास माझेजवळ एक अप्रतिम जादू आहे, आणि थोड्याच वेळानें तुला सर्व कांहीं समजून चुकेल.

राणा खालीं मान घालून उभा होता. त्याचें रक्त थरारलें, आणि भीतीनें सर्वांग कांपूं लागलें. मुख्यतः शेवटच्या धमकावणीनें तर त्याला पूर्व रंग आठवला. यमपुरीची ओळख नुकतीच कोठें तो विसरत चालला होता, ती मूर्तिमंत पुढें उभी राहिली. आणि तें दुःख पुनः सहन करणें—मृद्दाम आंगावर ओढून घेणें—नको असेंच त्याचे मनानें ठरविलें. अपकीर्ती झाली तरी बेहत्तर, परंतु यातना नको. असा विचार तावडतोब त्याचे मनांत येऊन केलेल्या अपराधाची क्षमा मागण्यास तो तयार झाला. त्यानें मान वर केली आणि अश्रूपूर्ण नेत्रांनीं अल्लाउद्दीनाचे भयानक चेहऱ्याकडे अवलोकन केलें. आणि पुढें तोंडांतून कांहीं शब्द तो उच्चारणार इतक्यांत अल्लाउद्दीनानें त्यास एक धक्का देऊन मागें लोटलें आणि गर्जना करून ह्मणाला " कमबक्त, नादान असून आणखी रिकामी मिजास. मी समजलों-तूं काय ह्मणणार आहेस तें, तुझ्या मनाची अस्थिरता माझे लक्षांत आली आणि ही वेळ तुला गय केली आहे. खबरदार पुनः अशाप्रकारचें कौटिल्य माझ्यापाशीं आजपासून पाहण्याचा प्रयत्न करशील तर

तूं मनांत पक्कें समजून ठेव कीं, सूर्याची किरणें जशीं इतस्ततः वाटेल तिकडे जातात तशी तुझी गुप्त गोष्ट, जरी तूं कितीही सावधगिरी राखून करण्याचा प्रयत्न करशील तरी, सर्वत्र पसरेल." दांत ओंठ खाऊन तो ह्मणाला "हीच पहिली आणि शेवटची क्षमा. इतःपर गय ह्मणून कोणत्याही बाबतींत तुला केली जाणार नाहीं. तुझें जिवंतपणीं कोल्हीं कुत्रीं इत्यादिकांकडून मांस खावविलें जाईल हें लक्षांत धर. मुदत पुरी होई पर्यंत तरी सुख भोगून घे. पुढें मृत्यु तुझे ललाटीं लिहिलेला आहेच."

ह्या शब्दांनीं भयचकित होऊन राण्यानें वर पाहिलें. त्याचा हेतु अल्लाऊद्दीनानें जाणला. तो ह्मणाला "अलबत, तुझी मिजासखोर कारटी जर नेमल्या मुदतींत न येईल तर तो दोष तुजवरच येईल आणि प्रथम प्रायश्चित्त तुलाच मिळेल.

राण्यानें किंचित धीर धरून प्रश्न केला "पण तो दोष मजकडे?"

"चुप नादान, गप्प बस अलबत तुझ्याकडेच दोष राहील. तुझी कारटी तुझें ऐकणार नाहीं! बापाची कीव तिला येणार नाहीं! वैभवाची तिला इच्छा नाहीं! सुखासमाधानांत आणि उच्चपदारूढ स्थितींत आयुष्य जावें हें तिला आवडणार नाहीं! राज्ञीपदाची इच्छा तिला मुळींच नाहीं! सार्वभौम आणि दिल्लीश्वर अल्लाऊद्दीनाची अर्धांगी होण्यांत तिला भूषण वाटणार नाहीं! अलबत स्त्रीस्वभावानुरूप ती वैभवाची, मानाची, डौलाची, सुखाची आणि अगणित संपत्तीची

बराचे आसमंतांतील भाग खुलवूं लागलीं.
रोवराच्या शुभ्र आणि पवित्र अशा
कलानिधीचें प्रतिबिंब दृग्गोचर होउ
असल्याचें भासूं लागलें. सूर्
शांतिकिरण असह्य वाटल्यामुळेंच
झांकून घेतलीं तथापि चंद्र
झाला तो कांहीं अवर्णनी
वदनांनीं

ग्नळच बसली होती कीं, तिजकडे पाहणाऱ्या-
ळीच आहे, अथवा एखादी विद्याधर
ा जलदेवता आहे असा भास झाला
रडे तिचें लक्षच नव्हतें त्यामुळें
ागें आला किंवा नाहीं अगर
काहीच ठाऊक नव्हतें. तिनें
पहाण्याचेंच टाकिलें होतें,
... ... लावून सोडिलें.

दय विदारण करून दाखवितां आलें असतें, तर तुझा खात्री पटती. आपले प्रेमांकूर सारखे वाढतच आहेत बरं. तूं मनाला व्यर्थ दुखवून नाना कुतर्क काढूं नकोस.

सद्गदित होऊन जयदेवीनें त्याचे हृदयावर आपलें शीर ठेऊन ती म्हणाली जयपाळ, मग आपल्या भावी अर्धांगीला-छेः छेः आपल्या अर्धांगीला सुखदुःखाचा वांटा नको काय ? माझें मन नाना कुतर्कांनी खरंच भरून गेलें आहे. तें निभ्रांत करणं आपलेकडे असतां आपण मला जास्त निष्ठुरता कां दाखवितां ?" तिच्या नेत्रांतून अश्रुप्रवाह सुरू झाला.

विखुरलेले केंश एकाबाजूस सारून जयपाळानें आपल्या वस्त्रानें तिचे अश्रू पुशिले आणि तो प्रेमानें म्हणाला " पण जयदेवी तुझ्यासारख्या कोमलांगीला तें खरोखर असह्य होईल. "

तो पुढें कांहीं बोलणार इतक्यांत जयदेवी अति त्वरेनें त्याची मिठी सोडून एका बाजूस उभी राहिली. तिचा चेहरा बदलून त्यावर किंचित क्रोधाची छाया दिसूं लागली. ती सरोष वाणीनें म्हणाली " असं. जर आपले देह एक आहेत असा माझा भाव आहे तर आपले हृदय व्यापार मला कळलेच पाहिजेत आणि ते आतां मला कळून चुकले. रजपूत कुलाला कलंक लावण्याचें श्रेय स्वीकारण्यास बाबा तयार झाले आहेत, आणि तो विषयी अल्लाऊद्दीन सौदामिनीस आलिंगन देऊन मृत्यूपंथीं जाण्याची उत्कंठा धरून राहिला आहे. असंच कीं नाहीं. "

तिची ती सरोष मुद्रा पाहून जयपाळास कांहींच

उत्तर देतां आलें नाहीं. तिचें ह्मणणें साफ खोडून टाकण्याचें तर त्याचें धैर्य होतच नव्हतें, कारण तिनें ताडलेलें सर्व खरें होतें, आणि तोंडानें " होय " असेंही ह्मणण्याचें त्यास धैर्य होईना. त्यानें मौन्यच धरिलें.

जयदेवी त्यास मूक पाहून ह्मणाली " तर मग अगदीं असंच तिकडलं वर्तमान आहे हेंच खरं. जयपाळ माझ्या हृदयाचें चूर्ण होईल असें आपणांस वाटलें होतें आणि ह्मणूनच आपण मजपासून ही बातमी छपविण्याचा प्रयत्न करीत होतां नां? ठीक. ही बातमी मला अवश्य कळली पाहिजे. बोला, बोला लवकर बाबांचं ह्मणणं काय आहे तें? त्यांनीं स्वतःचे सुखाकरितां पोटच्या गोळ्याला खाटकाचे स्वाधीन करण्याचा बेत केला आहे काय?

जास्तवेळ मौन्य धरणें योग्य नव्हे, कारण जें खरें होतें तें तिनें ताडलें असून तिच्या अंगाचा संतापानें जास्त दाह होत चालला आहे, तो तसाच वाढत राहूं देणें योग्य नव्हे असें जाणून जयपाळ ह्मणाला, " जयदेवी, जरी तुजबद्दल मला भीति वाटत होती तरी तूं रजपूत कुळोत्पन्न कन्या आहेस हें मी पूर्ण पणें जाणून आहे, परंतु प्रेमातिशयामुळें माझ्याप्रमाणेंच तुझी स्थिती व्हावी हें मला इष्ट वाटत नव्हतें, ह्मणूनच इतकावेळ मी तुजजवळ त्या गोष्टीचा स्फोट केला नाहीं आणि अद्याप देखील तो करावा असें मन मला सांगत नाहीं. तथापि तूं तें चाणाक्षपणानें ताडलेंस तेव्हां आतां खरी गोष्ट छपविण्यांत कांहीं मतलब नाहीं. कारण त्यापासून जो कांहीं तुजवर परिणाम

व्हावयाचा तो झाला. इतकें खरें कीं, मला तो जितका आनिष्ट आणि दुःखकारक होईल असें वाटलें होतें तितका झाला नाहीं. म्हणून आतां तुला ती गोष्ट उघडकरून सांगण्याचें, माझे मनाविरुद्ध, मी धाडस करितों. तूं जें कांहीं ताडलेंस तेंच सत्य आहे, आणि सध्यां तुझ्या बापाची इच्छा तशी बनली आहे. तुझ्या बापाचा स्वभाव जर खऱ्या रजपूतांस शोभण्यासारखा विलक्षण धाडशी, बेफिकीर, कष्टाळू आणि सत्वशील असता तर काय बहार उडाली असती ! ! ! जयदेवी, मी त्यास अश्वासन दिलें, नानाप्रकारानें समजाविलें आणि शेवटीं मी त्यास दुहाईही घातली परंतु त्याचा धरसोडीचा निश्चय कायम दिसून आला. गोष्ट खरी आहे कीं, त्याचे अतोनात हाल होताहेत, अल्लाउद्दीन, त्याचे सहाध्यायी आणि त्याचे पदरचे दरोबस्त लहानथोर त्याची अवहेलना करताहेत, त्यास छळताहेत, तथापि तशा प्रसंगींही असाधारण धैर्य दाखविण्यास त्यास संधी होती. मी त्याची सुटका करण्याकरितां प्रतिज्ञा केली होती. निदान मजवर त्यानें विश्वास तरी ठेवावयाचा होता ! पण जयदेवी, नाहींग नाहीं; जरी तुजसारख्या रत्नाचा तो पिता आहे, तरी रजपूत कुल विध्वंसक तो आहे, असेंच मला ह्मणावें लागतें. बेहेत्तर प्राण खर्ची पडले तरी, आंगाची त्वचा सोलून सोलून जरी दुस्मनानीं प्राण घेण्याचा विचार केला तथापि हरकत नाहीं, परंतु कुलाला कलंक लाऊन घेण्यास तयार होणें मानवयोनीस अत्यंत लाजिरवाणें आहे.

असो; थोडक्यांत सांगावयाचें इतकेंच कीं, त्याचे मना-ची घरमोड जेव्हां माझ्या नजरेस पडली, तेव्हां मी अल्लाउद्दीनाचे पाठीस लागलों. कारण त्याच्यामागें स-तेमिरा अल्लाउद्दीनच होता. प्रतिज्ञेप्रमाणें अल्ला-उद्दीनाचे माग लागून मी त्यास एक दोन तीन असे तीर मारले, आणि तो पडलेला जेव्हां माझ्या डोळ्यांनी मी अवलोकन केला तेव्हां ती खबर सांगण्यास आणि पुढील तरतूद करण्यास मी जेसलमीरचा रस्ता पकड-ला. कांहीं कारणानें मला आडरानांतूनच प्रवास करावा लागला, आणि त्या मार्गांत मला अनेक आपदा-ही भोगाव्या लागल्या, तरी ती गोष्ट तुला केव्हां एक-दां सांगेन अशी जी मला उत्कंठा होती तिचे जोरावर मी संकटांस न जुमानतां येथवर आलों. जयदेवी, उ-त्कंठेनें माझी जी स्थिती झाली होती, आणि मला जो आनंद झाला होता, त्याची कल्पना तुला होईलच. प-रंतु दुर्दैव आपल्या पाठीमागें पुरें हातधुवून लागलें आहे. त्या नष्टास आपल्या सुखात विष कालविल्याशि-वाय कसें स्वस्थ वाटेल? जयदेवी, माझ्या उत्कंठेचा महादरवाज्यावरच चुराडा झाला बरं. थोडीशी मी जर उतावळी केली असती तर माझ्या उत्कंठेचें सार्थक होऊन मी तुला कोणत्या स्थितींत भेटलों असतों, आणि आनंदानें आपली जी स्थिती झाली असती ती, कल्प-नामय मला दिसत आहे, परंतु, हाय, हाय! अल्लाउद्दी-न थोर नशिबाचा. ईश्वराला पापी मनुष्याचीच आ-वड म्हणूनच त्यानें त्यास जिवंत ठेविलें. त्यानें पुन्हां तुझ्या बापास त्रास देण्यास सुरवात केली. आणि

त्याचा परिणाम—नको नको ते शब्द. जयदेवी, कुलांगाराला देखील लज्जा उत्पन्न होऊन त्वेष चढेल, असें ह्मणून जयपाळानें हृदयावर स्वस्तिकाकार हात ठेऊन वर चंद्राकडे दृष्टी लाविली.

"परमेश्वराची मर्जी. तो आपलें सत्व पाहात आहे. असो; पण जयपाळ, मला पुरतं सगळं कळूंद्या. आपणास महादरवाज्यावर ही बातमी कोणी सांगितली" जयदेवीनें हृदयांतील गडबडीचें चिन्ह वर न दाखवितां शांत मुद्रेनें विचारिलें.

"जयदेवी, खरोखर माझ्या कल्पनेपलिकडेही तुझें हृदय घट्ट आहे. तुह्मां स्त्रियांचें हृदय सुमनाप्रमाणें मृदु आणि वज्राप्रमाणें कठोर असतें, ह्याची साक्ष मला पुरी पटली. चितोड राजकन्ये, तुझ्या पित्यानेंच तुझ्या मानेवर सुरी ठेवण्याचा बेत केला, एव्हढें ऐकून देखील तुझे मनाला स्वस्थ दुःख करीत बसवत नाहीं काय! उलट पुराव्याची तूं चौकशी करितेस! शाबास" असें ह्मणून जयपाळानें आपल्याजवळील एक लिफाफा काढून तिचे अंगावर फेंकला, आणि ह्मणाला "हें तुझ्या बापाचें, प्रत्यक्ष तुझ्या जनकाचें आणि अंतकाचें अक्षर. वरील मोहारही त्याचीच. आंत काय मजकूर आहे हें मी सांगूं इच्छित नाहीं, त्याबद्दल तूं अनुमानच केलें पाहिजे. हें मी महादरवाज्यांत शिरण्याचे बेतांत होतों इतक्यांत एका स्वारानें माझेजवळ आणून दिलें. माझ्या नांवचें ह्मणून मी तें उघडून वाचलें आणि आंतील मजकूर त्यानें बोलणें बंदकरून ओंठातून रक्तस्राव होईपर्यंत ते करकरून चावले. हातांच्या मुठी

वळल्या. डोळे लालबुंद होऊन आंतून ठिणग्या पडता- त कीं काय अशाप्रकारें चंद्रप्रकाशांत ते चमकूं लागले. आणि त्याचा श्वासोश्वास फारच जोरानें चालूं झाला. त्वेषाची परमावधि झाली.

तरी जयदेवीची मुद्रा शांतच दिसत होती. तिनें तो लिफाफा वर उचलून तो एक दोन वेळां उलटून सुलटून पाहिला आणि नंतर आंतील पत्र काढून तें जयपाळा- चे पुढें करून तिनें शांतपणानें त्याला विचारिलें " जयपाळ, आपल्याच नांवानं पत्र लिहिलं आहे ह्मणतां. बरं पण बाबांनीं त्यांत असं काय लिहिलं आहे ? "

जयपाळानें तिचे हातांतील पत्र घेऊन दूर फेंकलें आणि तिला दूर ढकलून तो क्रोधानें ह्मणाला " निर्ल- ज्ज, तुला अनुमान काढतां येत नाहीं काय ? माझें दुःख जास्त दुणवावें असा तुझा हेतु दिसून येतो. बेशरम, ज्या पत्रानें माझें हृदय विदीर्ण करून टाकलें, त्या पत्रांतील मजकूर मला विचारूं नकोस असें सांगि- तलें असतांही पुनः पुनः मला जास्त प्रश्न करून माझा त्वेष वाढवूं पहातेस काय ? शरमेची गोष्ट आहे कीं, इतकावेळ आंतील मजकुरासंबंधानें जें कांहीं संदिग्ध भाषण होऊन पर्यायानें त्याचा उलगडा झाला असतां तुला त्याबद्दल कांहींच वाटत नाहीं " तिचे हृदयावर हात मारून " हें हृदय कोपानें जळून कर- पत नाहीं काय ? "

जयदेवीनें अगदींच कळस केला. ती ह्मणाली " नाहीं, करपून गेल्यावर त्यांत काय अर्थ आहे ? "

त्वेषानें पाय आपटून जयपाळ ह्मणाला " करपून

गेल्यावर काय अर्थ आहे? होय खरोखर कांहीं अर्थ नाहीं. तुझें काळीज करपून गेल्यावर, तुझा मुखेंदु म्लान झाल्यावर, तुझें तेज कमी झाल्यावर आणि तारुण्यावस्थेंतील तुझीं नैसर्गिक सौंदर्य—भूषणें एकूण एक निस्तेज झाल्यावर मग तुला पट्टराणी म्हणून अल्लाऊद्दीनाचे जनान्यांत मान मिळणार नाहीं. अस्मानची परी म्हणून तो दिल्लीनृप तुला मिठी मारणार नाहीं. तुझा त्याजवर पगडा बसणार नाहीं, आणि मग तुला तोंड्यानें मिरवतांही येणार नाहीं. नीच कुलांगारे, तुझी जर अशी इच्छा होती, तर मला मधुपाप्रमाणें लोलुप कां करून ठेविलेंस? पतंगाप्रमाणेंच मी जळून जावें म्हणून तुझा मजवर प्रयोग चालू आहे काय? छेः छेः जयदेवी, पण नको आतां तुला तें सुंदर नांव. नबाबीण ताई, तुम्ही खाण तशी माती अशा जन्माला येऊन रतनसिंगाचा स्वार्थानें उध्दार केलात. वहावा! निर्लज्जपणाची कमाल झाली." तिच्या हृदयावर रागानें हात मारून "अजूनही तुझ्या हृदयांत शांति आहे; बोल? तें विदीर्ण होत नाहीं? तुला कुलाची, धर्माची, अब्रुची आणि वचनाची चाड नाहीं; बोल? "हं" म्हण कीं, तटातट प्रेमरज्जुचे तुकडे होतील, आणि मला माझा मार्ग मोकळा राहील" त्वेषानें त्याचें हृदय उडूं लागून श्वास अधिकाधिक वाढूं लागला.

जयदेवीचे मनांत प्रचंड काहूर पेटलें होतें. परंतु तिला जयपाळाची परिक्षा पहावयाची होती म्हणूनच कीं काय? तिनें मोठ्या गंभीरतेनें म्हटलें "जयपाळ, रागानें चवताळून काय होणार आहे? वेळ पडेल तशी

पाठ घ्यायला नको काय? परदुःख शीतळ आहे. बापा-शीं कुठवर हाल सोसावे? त्यांच्या मुलीनें–"

त्यानें तिला पुढें बोलूं दिलें नाहीं. त्वेषानें तिचा हात घट्ट धरून त्यानें विचारिलें "जयदेवी, अल्लाऊद्दिनालाच तूं आपलासा करून घेणार? तूं नवाबीण होणार?"

हात घट्ट आंवळला गेल्याकारणानें तिला वेदना होऊं लागल्या. त्या सहन न होऊन ती दुःखव्यग्र झाली. तथापि अंगाला आळेपिळे देऊन अगर त्याची विनवणी करून हात सोडवून घेण्याचा तिनें प्रयत्नच केला नाहीं. फक्त आपल्या पदराखालीं तिनें आपला मुखेंदु लपविला.

स्वाभाविक जरी तिच्या क्रिया चालू होत्या तरी कोपी जयपाळाला त्या मुद्दाम आणि कांहीं अंतस्थ हेतूच्या द्योतक म्हणूनच केल्या असें वाटे. त्यानें तिचा हात रागानें झिडकारिला आणि तो म्हणाला, "नीच कुलांगार, जो तुझा कोमल हात यत्किंचित आघातानें किंवा क्रियेनें दुखावला जात असे, तोच हात तुला वेदनांचा भास देखील करूं देत नाहीं ना? उलट त्या मुसंड्याचं नांव, तुझ्या भावी जाराचें नांव माझे मुखांतून निघतांच तुला गुदगुल्या होऊन लज्जायुक्त स्मित हास्य मला दिसूं नये म्हणून तोंड लपवितेस? धिःकार असो. तुझ्याप्रमाणें कलंकयुक्त कारट्यांना!! अग मनांत तूं त्याच्या मूर्तीनें विटाळलेली असतांना मला वारांगनेप्रमाणें नखरे दाखवून इकडून तिकडे आणि तिकडून इकडे असा वेड्याप्रमाणें नाचविलास. अगदीं

बेडाफकीर बनविलास. जयदेवी, " त्यानें मुद्रा उदास करून तिला प्रश्न केला, " जयदेवी, चितोड नृपकन्ये, बोल. एकदां मनांतील विष ओकून टाक की, माझें तोंड तुझ्या पुनः नजरेस पडणार नाहीं. बोल ! आणि जर खरोखरीच तुझ्या मनांत त्या अल्लाऊद्दीनाचे अंकावर लोळण्याची लालसा उत्पन्न झाली असेल, किंवा पूर्वींचीच ती असेल तर हे महाराज्ञी तुजवर वृथा आषक्त होऊन तुला त्रास दिला ह्या माझ्या अपराधा-बद्दल मला देहांत प्रायश्चित देऊन मोकळें कर! नाहीं-पेक्षां मला स्वतःच शिक्षा करून घेण्याची आज्ञा कर. मी फक्त आतां तुझ्या उत्तरावरच जीवीत ठेऊन आहे. जयदेवी, जयपाळ खां अथवा सार्वभौमराज्ञी नबाबीण! तुला कोणतें आवडतें आणि तुला काय ह्मणूं ? तुझ्या स्वरुपाकडे, कुलाकडे, शीलाकडे आणि एकंदर पुढील परिस्थितीकडे लक्ष पोंचवून एकदां मोक्ष किंवा मोक्ष करून टाक, ह्मणजे मी सुटलों, आणि लपंडाव खेळण्याचें कारणही तुला रहाणार नाहीं. "

जयदेवीनें समर्याद त्याजकडे पाहिलें, आणि गालांतल्यागालांत हंसून ती ह्मणाली " जयपाळ आज-पर्यंतच्या आपल्या अनुभवास कसं येतं की मी— " पुढील शब्द उच्चारणें तिला जड वाटलें आणि जय-पाळास बिल्गून तिनें लज्जेनें खालीं मान घातली.

जयपाळाचा क्रोध पुरता नाहींसा झाला. त्यानें हास्यमुद्राकरून तिचें अधोवदन वर केलें आणि ह्मणा-ला " जयदेवी, आजपर्यंतच्या अनुभवानेंच मला तुजब-द्दल वेड लाविलें आहे. परंतु, तुझ्या मौन्यावरून मला

जो संशय आला तो मला फारच जाचक झाला. मती-भ्रम झालेल्या मनुष्याप्रमाणें माझी स्थिती झाली आणि पुढें ओंगळ चित्र माझे नजरेपुढें दिसूं लागलें आणि मला तें सगळें असह्य झालें. जयदेवी, तुझ्या उत्सुकतेमुळेंही थोडाबहुत माझा संशय दृढ केला, आणि अशी अमंगल वार्ता स्त्रियांचे कर्णी आदळली असतां त्यांची जी अनिवार स्थिती होते, तिच्या उलट तुझी शांतवृत्ति पाहून तर मला अतोनात राग आला. कारण माझ्या संशयपिशाचिकेस तें चांगलेंच पौष्टिक मिळालें. तुझ्याप्रमाणें असाधारण स्थैर्य खरोखरी इतर कुमारिकांचेठायीं आढळून येणें दुष्कर आहे. जयदेवी, लज्जा दूर करून-तिचा त्याग-करून एकदां "मी आपली आहे" असें मला ऐकीव बरं! माझी तेवढ्यानें जी तृप्तता आणि मनाची शांती होईल, आणि मला पुढील विचार सुचूं लागतील, तीं इतर कोणत्याही कारणानें होणें शक्य नाहीं.

जयदेवीनें कांहींच शब्द उच्चारले नाहींत, परंतु सलज्ज, सप्रेम, सस्मित आणि संकोचित दृष्टी यांहीं करून तिला काय उत्तर द्यावयाचें तें तिनें दिलें.

दोघांचे दृष्टीचें संमेलन होतांच दोघांसही परमावधीचा आनंद झाला, आणि जयपाळानें तिजजवळ इतका वेळ केलेल्या व्यर्थ आग्र्याबद्दल क्षमा मागितली. जयदेवीनें तिकडे लक्षच दिलें नाहीं. तिची नजर तिच्या आवडत्या मयूरावर गेली. तो बिचाराप्राणी अंधा प्रमाणें स्वस्थ एका जागीं बसला होता. त्याला त्या दोघांचे संभाषणाचें ज्ञान कसलें होणार! जयदे-

वीनें झटकन जयपाळापासून दूर होऊन त्याला उच-लून घेतलें आणि कुरवाळून ह्मणाली " इतकावेळ ह्या-ची मात्र दैना झाली. थंडीनें हा अगदीं काकडून गेला आहे. " वक्रदृष्टीनें-सप्रेम-जयपाळाकडे पाहून ती त्या मयूराला संबोधून ह्मणाली " पण तुझ्याकडे इत-कावेळ दुर्लक्ष केलं ह्मणून तुंही रागावून माझ्यावर ताव काढणार असलास तर आतांच काय मला शासन करावयाचं असेल तें करून घे. एकदमच सगळं होऊ-न जाऊं दे. "

जयपाळानें तो रोंख ओळखून आपला अपराध कबूल केला. तो ह्मणाला " उतावळेपणानेंच हा बों-टाळा उडून इतकावेळ गडगडाट झाला परंतु तो व्यर्थ होता हें लक्षांत आल्यावर आतां मी क्षमा मागतों. "

तिच्या जवळ जाऊन आणि तिच्या हनुवटीस स्प-र्श करून तो हंसत हंसत ह्मणाला " दुसऱ्याचा राग शांत करून मग आपण रागावयाचें, ही तऱ्हा उत्तम ह्मणावयाची. अपराधाची माफी नाहीं तरी शासन तरी होऊंद्या "

" करतां येईल " असें ह्मणून जयदेवीनें लज्जेनें आपलें तोंड फिरविलें आणि पुढें ह्मणाली " अगबाई हा थंड वारा फारच झोंबूं लागला. मध्यरात्र झाली की काय ! "

" अजून माध्यान्हींची नौबत झडली नाहीं, तरी पण रात्र बरीच झाली. येथें जास्त वेळ थांबणें बरें ना-हीं " जयपाळ ह्मणाला.

" घरी माणसं रिकामी काळजी करीत असतील. "

असें ह्मणून तिनें आपली स्मरणी उचलून घेतली. वस्त्र आंगावर घेतलें आणि घरीं जाण्यास ती तयार झाली. तरी पण तिच्यानें पाऊल पुढें टाकवेना.

"मयूराचें आणि स्मरणीचें ओझें झालें असल्यास माझ्या जवळ द्या. तेंव्हढी तरी सेवा-नव्हे तेंच शासन घडू द्या आमचे हातून" जयपाळ थट्टेनें ह्मणाला इतकेंच नव्हे तर त्यानें हात पुढें केले.

घडी उलगडून पांघरूण घेण्याकरितां आंगावर घेत असलेल्या वस्त्राची साधारण घडी करून तें त्याचे हातीं देऊन जयदेवी ह्मणाली "कदाचित हेंच मला जड झालें असेल. हें घेतल्यानें दोन्ही कामें होतील. एक थंडी, थोडी बहुत निवारण होईल आणि दुसरें आपण ह्मटल्या प्रमाणें—"पुढील शब्द ओठापर्यंतच आले. त्यांचा उच्चार झालाच नाहीं. तिनें दोन पाऊलें पुढें जाऊन एकलिंगजीस नमस्कार केला, इतक्यांत जयपाळही तिचे मागून आला आणि त्या वस्त्राची अर्धवट असलेली घडी उलगडून तें तिला पांघरवून ह्मणाला "छे छे हें जड होणारच नाहीं. रानांवनांतून हिंडणारे आह्मीं, तेंव्हां आह्मांला असलें पाहीजे कशाला? आणि मध्यां वायूपासून आह्मांस शीताची पीडा तरी कितीशी होणार? उलट हा सुगंधयुक्त येत असलेला वायु आमच्या सारख्यानां जास्त प्रीयकर वाटतो; कारण त्या योगें सास्हादमन होऊन शरीरास हुशारी येते. तुझ्यासारख्या कोमळ लतिकेला हा झोंबत असेल ही गोष्ट मात्र खरी. ह्या वस्त्राला काय ह्मणून तूं अंतर देतेस. जागचे जागींच तें शोभतें."

जयदेवीनें स्मित हास्य करून त्याच्याकडे पाहिलें आणि पुन्हा एकवार एकलिंगजीस नमस्कार करून ती घरीं जावयास निघाली. जयपाळानेंही सप्रेम आणि भक्तिपुरःसर एकलिंगजीस वंदन करून तिच्या मागोमाग रस्ता सुधारला. दोघांनींही मौन्य स्वीकारिलें होतें. क्वचित जयदेवी मागें वळून पाही आणि लज्जायुक्त हास्य करी तसेंच जयपाळानंही तिचें उसनें ठेविलें नाहीं.

## भाग ८ वा.

दुःखमुक्त होऊन पुनः स्वतंत्रता प्राप्त व्हावी या हेतूनें चितोडाधिपतीनें अल्लाऊद्दीनाचें ह्मणण्यास मान देऊन, जयदेवी त्याला अर्पण करण्याचा निश्चय ठरविला. अल्लाऊद्दीनानें स्वतः त्याचे जवळ बसून त्याचे करवीं जेसलमीरास पत्र लिहीवलें आणि त्यांत जयपाळानें तिला बरोबर घेऊन यावें अशा आशयाचा मजकूर घालण्यास त्यास भर घालून-जबरदस्ती करून-तें पत्र स्वतः बंद करून राजाची वर मोहोर ठोकून जेसलमीराकडे, एका विश्वासू जासुदाकरवीं, पाठवून दिलें. इतकें झाल्यावर त्यानें रतनसिंगाचे स्थितीचा विचार केला. त्यास दुःखमुक्त केलेंच; परंतु बंध मुक्त मात्र केलें नव्हतें. राजास कुरुक्षेत्राचे दाक्षिणबाजूस एका हवाशीर बंगल्यांत नजर कैदेंत ठेविलें. राजाचे खाण्यापिण्याचे हाल चुकले. वैभवशिखरीं असतांना जे जे ऐषआराम भोगण्याची त्यास संवय

होती ते ते त्याम येथें अल्लाऊद्दीनाकडून पुरवले गेले. राजास प्रथमदर्शनी आनंद वाटला. पीडामुक्त केल्या-बद्दल त्यानें अल्लाऊद्दीनाचे उपड उपड आभार मानले.

परंतु हा आनंद अगदीं थोडेच दिवस टिकला सुख आणि चैन यांची रेलचेल उडूं लागली तरी राण्याला अंतर्यामी दुःख त्रास देऊं लागलें. त्याच्या शरीरयातना जरी बंद झाल्या तरी अंतर्यामी त्यास दुःसह वेदना होऊं लागल्या. विश्रांतिस्तव सर्व साधनें जरी अनुकूल होतीं तरी तीं त्यास सुखावह न होतां उलट त्रासदायकच झालीं. बंदीवासांत असतानां शरीरयातनांपासून त्यास जें दुःख भोगावें लागत असे त्याच्या पेक्षां कितीतरी पटीनें त्यास जास्त पीडा होऊं लागली अस्वस्थता प्राप्त झाली आणि सुखमंदीरांत--त्याच्या पूर्वीच्या समजुतीप्रमाणें जरी त्याला स्थान मिळालें होतें तरी तें त्यास दुःसह वाटूं लागलें. कारण त्याचें मनच त्याला खाऊं लागलें. मन घट्ट करून जयदेवी अल्लाऊद्दीनास अर्पण करण्याचा जो त्यानें निश्चय केला होता तोच त्यास पीडादायक होऊन त्याच्या स्वस्थतेची त्यानेंच रांगोळी केली. एकंदरीत जयदेवी, अल्लाऊद्दीनास अर्पण करण्याचा निश्चय करतेवेळीं त्याला पुढील स्थितींतील सुखाच्या ज्या कल्पना होत्या आणि जी अपेक्षा होती ती जरी बाह्यात्कारीं नव्हे खरोखरी-त्यास प्राप्त झाली तरी बंदीवासापेक्षां जास्त पीडादायक झाली. सुखाची दिशा चुकली असें तावडतोब त्याचे लक्षांत आलें.

त्याचें मन त्याला खाऊं लागलें. केलें तें अगदीं अयोग्य केलें असें त्याला समजून आलें. पण तें केव्हां?

फारच उशीरानें पत्र घेऊन गेलेला जासूद परत येण्याची देखील वेळ झाली, असें जेव्हां त्याचे लक्षांत आलें तेव्हां निरुपाय ह्मणून तो स्वस्थ बसला. तथापि त्याचें मन त्यास टोंचून टोंचून खात होतें.

अशाप्रकारचे सुखानंदीं राणा निमग्न असतां एके दिवशीं दिल्लीपतीची स्वारी त्याचे दर्शनास आली! राणा प्रत्यक्ष श्वशूर झाला तेव्हां त्याचा परामर्ष घेण्याचें काम अल्लाऊद्दीनाचें होतें, आणि तोही नातें व श्वशूराचा मान ओळखून, राण्याची नेहमीं भेट घेत असे. अशी भेट घेण्यांत त्याचे कांहीं अंतस्थ बेत असतील, किंवा कारणेंही निराळीं असतील, त्यांच्याशीं आपल्याला कांहीं कर्तव्य नाहीं.

राणा आणि अल्लाऊद्दीन ह्यांचे भेटीचे योग नेहमीं प्रभातकाळींच जुळत असत. अल्लाऊद्दीन स्वतः राण्याकडे जात असे. राण्यास-भावी—श्वशूरास तसदी देणें त्यास बरें वाटत नसे. अल्लाऊद्दीन भेटीस आला ही गोष्ट राण्यांस समजतांच तो नियमाप्रमाणें बाहेर येऊन त्यास सामोरें गेला. इष्टस्थळीं दोघेही बसले. बरोबरीच्या नात्यानें दोघांचें संभाषण झालें. तथापि चाणाक्ष अल्लाऊद्दीनास राण्याचे प्रकृतींत फरक दिसून आला आणि त्यानें प्रकृति अस्वस्थ आहे कीं काय " असा राण्यास प्रश्न केला.

राण्याचें मन गोंधळलें तरी त्यानें जबाब दिला " छेः छेः आपणासारख्यांचा मजवर लोभ असल्यावर मला न्यून तें कसलें शिवाय हल्लींच्या स्थितींत शरीरबाधेचाही संभव नाहीं. "

अल्लाऊदीनानें त्याचे चर्येवरून, उत्तर देण्यास गोंधळल्यावरून आणि शब्दांवरून जें काय समजायचें तें समजून घेतलें, आणि राण्याचा निरोप घेऊन तो निघून गेला. परंतु त्या दिवसापासून राण्यावर त्याची विशेष नजर असे. आणि बहुधा प्रत्यहीं जरी तो राण्याची भेट घेत नसे, तरी त्याचे अपरोक्ष, एकंदर समाचार घेऊन जात असे. मात्र ही गोष्ट राण्याचे कानावर जात नसे.

असेही कांहीं दिवस लोटले. राण्याची प्रकृति अधिकाधिक क्षीण होत चालली. त्यास अहोरात्र मनाची टोंचणी लागली. स्वस्थता, निद्रा, आराम हीं त्यास अनोळखी झालीं, आणि त्याचे चर्येवर पांडुरता आली. प्रतिक्षणीं हजारों विचारतरंग त्याचे मनांत वाकूं लागले. झाल्या गोष्टीस नाईलाज आहे स्वस्थ असावें असा धडा करून त्यानें चित्त दुसरीकडे लागावें म्हणून बागेंत हिंडावें, जलाशयांत नौकेंत बसून सायंकाळची हवा घ्यावी, अनेकप्रकारचे खेळ काढावे, गानवादनाकडे विशेष लक्ष लागावें म्हणून गानवादनपटूमंडळीस मुद्दाम बोलावून त्यांच्या मजलसी कराव्या परंतु " जयदेवी अल्लाऊद्दीनास अर्पण करण्याचा केलेला निश्चय अगदीं त्याज्य, तोंडास, कुळास आणि शीलास कलंक लावणारा आहे आणि जगांत अपवादच आपले वाट्यास येणार " हे विचार कांहीं त्यास सोडीनात. त्यानें आपल्याकडून पराकाष्ठा केली परंतु मन त्याचे स्वाधीन होईना.

दिवसभर इकडे तिकडे बसून विचारांतच वेळ का-

भुकेली असलीच पाहिजे. परंतु तूं जर कांहीं जास्त-कमी तिला कळविलें असशील, तिच्या इच्छांचा चुराडा करण्याचा प्रयत्न केला असशील, तिचा गैर समज व्हावा एतदर्थ कांहीं निराळया तऱ्हेनें लिहीलें असशील, रिकामी धर्माची, कुळाची, जनाची आणि अब्रूची तिला भीति घातली असशील, तिचा सत्यानाश करण्याचे हेतूनें तिचें मन वळविण्याचा प्रयत्न केला असशील, आणि परस्तानच्या परीप्रमाणें अप्रातिम सौंदर्याचा उपभोग घेण्यास एखादा अजागळ रजपूत नेमस्त करण्याबद्दल तिला गळ घातली असशील तरच ती इकडे येणार नाहीं. हज्जार हिश्शानीं तिला तिचें मनच इकडे ओढून आणील आणि तुझा मात्र साहजिक तिच्यामुळें फायदा होणार आहे. याद राखून रहा. कोणत्याही प्रकारची हालचाल तुला घातकच होईल स्वस्थ बसशील तर मरणाची घटका येईपर्यंत तरी सुखांत दिवस काढशील, नाहींपेक्षां त्या घटकेपर्यंत हाल हाल सोसावे लागतील." राण्याला पुरतें बोलूं न देतांच अल्लाऊद्दीन ओरडून ह्मणाला.

राण्यानें तें ऐकून घेतलें. दुसरा कोणता मार्ग त्यास खुला होता! त्यानें कृतज्ञता दर्शक मुद्रा करून अल्लाऊद्दीनाकडे पाहिलें. त्याच्या मनाला किंचित समाधान झालेंसें दिसलें. कारण जयदेवीनें परांङमुख व्हावें ह्मणून आपण मुळींच प्रयत्न केला नसल्याचें त्यास माहीत होतें. आणि ह्मणून जयदेवी पित्याचे आज्ञेस रुकार देऊन नेमल्या वेळीं, नेमल्या दिवशीं

तेथें हजर होईल आणि आपलें मरण टळेल अशी त्याची खात्री होती.

अल्लाउद्दीन चाणाक्षच होता. त्यानें राण्याचें अंतरंग ओळखलें आणि इतकावेळ केलेला त्रागा हा केवळ उसना होता असें दाखविण्याकरितांच कीं काय तो हंसला, आणि तेथून निघून गेला.

राण्याचे स्थितीचें वर्णन नकोच.

## भाग ९ वा.

मनुष्याच्या ज्या ज्या ह्मणून इच्छा असतात, त्या त्या जर सर्व पुरविल्या गेल्या किंवा मनुष्य मनांत आणील तितकें जर सर्व त्यास प्राप्त होईल किंवा त्याच हातून होईल तर जगाची रहाटी कांहीं विलक्षण तऱ्हेची बनून जाईल आणि एका अदृश्य पण अजिंक्य अशा शक्तीवर जी माणसांची श्रद्धा आहे ती साफ उडून जाईल. परंतु तसें नाहीं, आणि कधींही होणार नाहीं. कारण जगाची रहाटी आहे ह्याच धोरणावर चालली पाहिजे असा सृष्टीनियंत्याचा हेतु आहे आणि तें तसें चालणारच. असो.

जयपालानें दिल्ली सोडून जेसलमीरची वाट धरली तेव्हां त्याचे मनांत कोणकोणते हेतु होते, त्याची इच्छा काय होती, त्याला कोणत्या गोष्टींची उत्कंठा होती, तो कोणत्या स्थितींत होता वगैरे गोष्टीकडे लक्ष दिलें असतां पुढें जो त्याच्या उत्कंठेचा परिणाम झाला तो

कितीतरी विलक्षण आणि किती निराळ्या तऱ्हेचा हें दिसून येईल. जयदेवीला सुवार्ता कळवून तिजकडून प्रेम निरोप घ्यावा, आणि पुनः कांहीं मंडळीसमवेत दिल्लीस जाऊन राण्याची सुटका करावी. राण्याचेच हातून जयदेवीचा विवाहसमारंभ व्हावा, व आपणही स्वयंवराप्रमाणेंच कांहीं अप्रतिम आणि अलौकिक कृत्य करून जयदेवीचा स्वीकार केला, अशाबद्दल थोरपणा मिरवावा असा जो जयपाळाचा हेतु तो, राण्याचें पत्र त्याच्या हातांत पडल्यावर, खात्रीनें सिद्धीस जात नाहीं असें वाटून तो निराश व्हावा ह्यांत नवल काय आहे? राण्याचें पत्रच अशा मजकुराचें होतें कीं, तो मजकूर वाचल्याबरोबर जयपाळाचें हृदयाला जबरदस्त धक्का बसून तें चूर्ण होऊन जावें. त्याच्या इमारतीचा पायाच ढांसळल्यावर त्यानें वर इमारत चढवावी कशी? एकंदरींत पूर्वीचे सर्व बेत रद्द करून, त्याला दुसरी कांहीं तोड काढल्या विना इलाज उरला नव्हता. अल्लाउद्दिनाला आपण ठार केला अशी जी आपली समजूत झाली ती साफ खोटी हें त्यास कळल्यावर तर त्याला अंतानात वाईट वाटलें. प्रयत्न अगदीं व्यर्थ केला. राणाही निजामऱ्याप्रमाणें आणि मागूबाईसारखा पुनः अल्लाउद्दीनास भाळला आणि अखेर ज्या दुखाला तो भीत होता तेंच जयपाळापुढें साक्षात् उभें राहिलें. राण्यानें तर साफ लिहिलें होतें कीं, "जयदेवीनें मागील करारमदार, वाग्निश्चय इत्यादि साफ रद्द समजून, दिल्लीस आलेंच पाहिजे आणि पितृऋणांतून अंशतः तरी मुक्त होण्यास्तव

तिल्लीपतीस आपला देह अर्पण करून पित्याची मुटका करवावी. असें करण्यांत जर हयगय होईल तर पितृघाताचें पातक तिच्या शिरीं बसेल इतकेंच नव्हे पण जन्मभर तिला यातना भोगाव्या लागून, अंतीं आणि यमलोकींही दुर्धर यातना तिला सोसणें भाग पडेल." पित्याची आज्ञा जयदेवी अमान्य करील ही गोष्ट संभवनीय नाहीं तथापि पित्याच्या अशा नीच मनोदयानुरूप तीं आपला धर्म सोडून अपकीर्तीचा कलंक लावून घेण्याकरितां अल्लाउद्दीनाची रखेली होऊन राहण्यास कबूल होईल असेंही होणें असंभवनीयच. तेंव्हां जयदेवीचा पक्का निश्चय कोणता आहे हें समजून घेण्यास्तव त्यानें तें पत्र तिला वाचून दाखविलें आणि तिचा हेतु काय आहे हें पाहण्यास्तव त्यानें कांहींवेळ तिला नानातऱ्हेनें विचारून विचारून पुरे पुरे केलें. त्याची स्थिती खरोखर फारच चमत्कारिक झाली होती. जयदेवीच्या उत्तरावरच त्याचा प्राण अवलंबून होता इतकें ह्मटलें ह्मणजे पुरे आहे. त्याला तर तिच्या संबंधानें कांहींच ठरवितां येईना. कारण प्रेमातिशय, कुल, शील आणि धर्म इत्यादिकांचे ठायीं असलेली तिची अत्यंत श्रद्धा आणि कळकळ व पुढील दुःखदप्रसंग टळावा ह्मणून इत्यादिकांसाठीं ती पितृ-आज्ञा उल्लंघन खात्रीनें करील असें त्यास एकवार वाटे परंतु लगेच तिची पित्याचे ठायीं असलेली अप्रतिम पूज्यबुद्धी, भक्ति, कळकळ इत्यादि गोष्टींचा विचार पुढें आला ह्मणजे पित्याचे मुक्ततेकरितां खात्रीनें ती

आपला देह बळि देईल असेंही वाटें. मिळून त्यास तर कांहींच तर्क करतां येत नव्हता.

जयदेवीनें तो पत्रांतील मजकूर ऐकल्याबरोबरच तिच्या आंगावर कांटा उभा राहिला. ती गोंधळल्यासारखी झाली-नव्हे घाबरली आणि तितक्यांत जयपाळानें तिला विचारून विचारून पुरेसें करून सोडलेलें, अशा स्थितींत कांहींवेळ स्वस्थ उभी राहिली. एक निमिषमात्रच तिचे अंतर्व्यापार थबकल्यासारखे झाले. तथापि नंतर तिच्या मनाचा गोंधळ सुरू झाला. तरी तिच्यापुढें जेव्हां भावी दुर्धरस्थितीचा देखावा एकदम उभा राहिला तेव्हां तिला भय तर वाटलेंच पण पितृआज्ञा गैरशिस्त असल्यास तिचें उल्लंघन करणें बिलकूल गैर होणार नाहीं असें तिच्या लक्षांत आलें. शिवाय कुलास अपकीर्तीचा डाग, जगांत हंसे, मागें पुढें दैना, हीनसेवा, आणि भ्रष्टता इत्यादिकांचा जेव्हां ती विचार करूं लागली तेव्हां तर तिच्या मुखांतून " बेहेत्तर शील राखून बाबा स्वर्गवासी झाले तरी " असे शब्द एकदम बाहेर पडले.

जयपाळाला दुप्पट उमेद आली. ते शब्द म्हणजे त्याला अमृत किंवा संजीविनी अथवा उत्तम भेषजच वाटले, आणि त्यांचा परिणामही त्याजवर फारच त्वरित आणि उत्तम असा झाला.

तिचा झालेला निश्चय अगदीं ठाम ठरला अशी जरी त्याची खात्री होती, तरी आणखी दृढता म्हणून पितृआज्ञा वंदन करून तीप्रमाणें अनुसरल्यास जीं दुःखें भोगावीं लागतील त्यांचें आणखी जास्त दुःखप्रद

व भयंकर असें चित्र रेखाटून तिच्या निश्चयास पुष्टी आणण्याचा त्यानें प्रयत्न केला. अल्लाऊद्दीनाचीं क्रूर कृत्यें, त्याच्या जनान्यांतील अमानुष आणि जुलूमाचीं अशीं अनन्वित कृत्यें, कमलादेवीची दैना, देवलदेवीचें धर्मांतर आणि तिचा जबरीचा विवाह आणि अल्लाऊद्दीनाचे विषयवासनेस बळी पडलेल्या अनेक अबलांची हृदयद्रावक स्थिती इत्यादिकांचें, साधारण घट्ट मनाच्या मनुष्यालाही पाझर फुटेल अशा तऱ्हेनें, त्यानें वर्णन केलें आणि रतनसिंगाचें नीचत्व किती आहे हेंही त्यानें उघड करून तिला सांगितलें.

वास्तविक तिला त्या गोष्टींची फोड करून सांगण्याची कांहीं अवश्यकता नव्हती. तिला कल्पना होती आणि तिच्या मनानें काय जें ठरवावयाचें तें अगोदरच ठरविलें होतें. तथापि जयपाळानें आपलें कर्तव्य समजून तसें केलें आणि खरोखरी त्याचे सांगण्यांत जरी वर्णनाची अतिशयोक्ति होती तरी त्यानें तिला निवेदन केलेली एकंदर हकीकत खरी होती. अर्थात बापाचे नीचत्वाची तिला कींव आली परंतु, राण्यासंबंधानें तिटकारा मात्र तिच्या ठिकाणी उत्पन्न झाला नाही. आलेलें विघ्न तर टळावेंच पण, बापाचे जीवाला बिलकूल धक्का पोंचूं नये, त्याची सुटका व्हावी, अशी कांहीं तरी युक्ति ती मनांत धुंडाळीत होती. जयपाळानें अगोदरच विचार ठरविला होता आणि जेव्हां आपल्या भाषणाचा परिणाम उत्तम अर्थात त्याला अनुकूल-असा होणार अशाबद्दलचीं चिन्हें जेव्हां त्यास दिसूं लागलीं तेव्हां तो अतिशय उत्कंठि-

व झाला आणि जयदेवी कांहीं बोलणार तों आपणच तिला आपला मनोदय त्यानें सांगितला. त्यानें जें कांहीं सांगितलें तें जयदेवीस पटलें [illegible] तेवढ तें तिचें समाधान मात्र झालें नाहीं. तिचे [illegible] हेतु साधून न घेण्याचे जे कांहीं प्रयत्न तिला सुचले होते त्यांत सुलभ, अवघड आणि आवडनिवड करण्याकडे, मन गुंतलें होतें ह्मणून मान्यतादर्शक मान हालवून तिनें जयपाळाच सूचनेस-कल्पनेस-मान डोलविली परंतु मुखावाटे मान्यतादर्शक यावत अशी जी जयपाळाची इच्छा-उत्कंठा-ती पूर्ण झाली नाहीं.

तिचा विचार ठरण्यास कांहीं फार अवधि लागण्याची जरुरी नव्हती आणि ती लागलीही नाहीं. तिचा जो विचार ठरला तो तिनें नंतर जयपाळास सविस्तर सांगितला आणि बापाची सुटका, त्यांचे केसासही धक्का न लागतां कशी करतां येईल तेंही सुचविलें. जयपाळानें आणि तिच्या विचारीं एकमत्य आलें आणि तें झालेंच पाहिजे होतें कारण जर मार्गच दोन उरले होते आणि त्यांपैकीं एक मार्ग जरी अवघड तरी सुखकर आणि दुसरा प्रथम दर्शनी जरी दिसण्यांत सोपा आणि सुखकर तरी दुर्घट आणि दुःखयुक्त असा दिसत होता तर दोहोंपैकीं एक ग्राह्य करणें अगत्यच होता. वाईट मार्गानें तर जावयाचें नाहीं हा जर तिचा निर्धार होता आणि जयपाळाला तें आतां कळून चुकलें होतें तर सुखकर, हितप्रद, शुभ आणि कीर्तिप्रद असाच उरलेला मार्ग ती स्वीकारणार. तेव्हां दोघांच्याही विचारांचें संमेलन होऊन सांवेल तितक्या

तांतडीन [illegible]ोटोपून घ्यावें आणि नंतर युक्तीप्रयुक्तीनें राण[illegible]टका करवून घेऊं निदान करूं असाच त्यांच[illegible] शवटीं निश्चीत होणारच आणि त्याप्रमाणें [illegible]ा ठरविलें.

बापा[illegible]न आपलें दान जयपाळास, मिळण्याचा सं[illegible] अजिबात नाहींसा झाला, म्हणजे रतनसिंगानें स्वतः तिचें जयपाळाबरोबर लग्न लाऊन दिलें असतें म्हणजे वधूवरांच्या मनाला जो कांही विशेष आनंद होणार होता त्या आनंदाला ती मुकली, हें पाहून जयदेवीला वाईट वाटलें परंतु तेथें तिचा नाइलाज झाला. तिचा लांबचा एक चुलता होता आणि त्याचेचयेथें ती आतांशा रहात होती. त्यानें तिचें कोणत्याही गोष्टींत न्यून पडूं दिलें नव्हतें आणि म्हणून रतनसिंगाचे जागीं तोच कल्पून त्याचेच हातून समारंभ करवावा असा जयपाळाचा संकेत पूर्वीच ठरला होता. जयदेवीचें ही त्या गोष्टीस अनुमोदन पडलें.

रात्रंदिवस ज्याला हृदयांत स्थान देऊन पूजिलें, त्याच्याशीं यथाशास्त्र आणि विधीपूर्वक संमेलन होण्याचा मुहूर्त जवळ आलेला पाहून वास्तविक जयदेवीचें अंतःकरण कितीतरी प्रफुल्लित व्हावयास पाहिजे होतें परंतु तें केव्हा ! जर सर्व यथास्थित असून चितोडास रतनसिंगाचे हातून समारंभ होण्याचा सुयोग जुळून आला असता तर ? ! ! सर्व गोष्टी स्वतःलाच कराव्या लागल्यामुळें तिचें मन किंचीत रंजीस झालें होतें. चुलत्याजवळ जरी जयपा-

ळानें ही गोष्ट काढिली तरी अर्थात माझें अनुमोदन घेऊनच तसें ठरविलें आहे असें त्यास सांगणें जरूर आहे आणि मग अर्थातच जनदृष्टीनें आपला थोडासातरी निलाजरेपणा दिसून येईल असें वाटून तिला विशेष वाईट वाटत असे. तथापि प्रसंगाकडे विशेष लक्ष देऊन तिला मुकाट्यानें सर्व गोष्टींला सादर व्हावें लागलेंच.

तिचे चुलत्याजवळ जेव्हां जयपाळानें प्रथम ही गोष्ट काढिली तेव्हां स्त्रैणत्वाचा आणि भिरुत्वाचा दोष ठेऊन त्यानें जयपाळास धिक्कारूनच टाकिलें. त्याचा मतलब असाच होता कीं, रतनसिंगाचे मुक्ततेप्रीत्यर्थ जयपाळानें चालविलेले प्रयत्न तसेच नेटानें पुढें चालवावे आणि रतनसिंगानें स्वतःच आपल्या मुलीचें कन्यादान करावें. पहिल्याच शब्दाबरोबर त्यानें साफ नकाराचा पाढा वाचला. परंतु जयपाळानें राण्याचें पत्र त्याजला जेव्हां वाचून दाखविलें आणि एकंदर स्थितीचें चित्र रेखाटून तसें होतांहोईतों त्वरेनें उरकून घेण्यांत, कोणता फायदा आहे हें जेव्हां आपल्या मनोहर आणि मोहक वाणीनें त्यास फोड करून सांगितलें तेव्हां तो थोडासा मवाळला तरी त्याचा हेतु जो होता तो सोडून द्यावा असें कांहीं त्याचें मन त्यास सांगेना. " तसें अगोदर झाल्याशिवाय रतनसिंगाची सुटका होणें दुरापस्त आहे. " वगैरे नानाप्रकार सांगून आणि जयदेवीच्या अनुमोदनानेंच हें सगळें ठरलें आहे असें सांगून जयपाळानें त्याचें मन बरेंच

वळविलें. त्यानें ही **जयदेवीचे** घाष्टर्याबद्दल थोडेसे कुचेष्टेचे शब्द बोलून शेवटीं रूकार दिला आणि चालून येत असलेला मान स्विकारण्यास तो कबूल झाला.

त्याचा रूकार पडतांच **जयपाळानें** आपल्या वडीलांची आज्ञा घेतली आणि वडिल मंडळीच्या संमतीनें सर्व कांहीं ठरून सुमुहुर्तावर **जयपाळानें** जयदेवीचें पाणिग्रहण केलें. जातिधर्माप्रमाणें **जयदेवीला** उल्हास तर वाटलाच परंतु अंतर्यामी तिला किंचित पीडा होत होती. **जयपाळाची** स्थिती सर्वांशींच तिच्याप्रमाणें नव्हती तरी पण वाटावें तितकें समाधान त्याचे मनास वाटलें नाहीं.

वधूवरांशिवाय इतर मंडळींत मात्र समाधानता आणि उल्हास दिसत होता. दोन्हीपक्षांकडून विवाहप्रित्यर्थ बराच खर्च झाला. नानाप्रकारचे रंग झाले. मिरवणुकी मोठ्या कडाक्याच्या झाल्या. त्यांतही **जयदेवीच्या** चुलत्यानें अनेक कारणास्तव फारच सढळ हातानें खर्च करून समारंभास योग्यतेप्रमाणें टोलेजंग स्वरूप दिलें. त्यांत उभयपक्षांकडील मंडळींची हौस हें कारण होतेंच. शिवाय नांवाप्रमाणें कार्य समारंभ झाला पाहिजे अशी इच्छा विशेष होती. एका पक्षाकडील तयारी टोलेजंग दिसून आली तेव्हां अर्थात दुसऱ्या पक्षासही खर्चास कंबर बांधावी लागली. आतां असला टोलेजंग समारंभ उभयतां वधूवरांस मनापासून रुचला नाहीं ही गोष्ट खरी परंतु वडील मंडळीच्या इच्छेविरुद्ध जाणें शक्य नव्हतें अर्थात निमूटपणें सर्व विधी यथासांग आणि फारच टोलेजंग झाले.

लग्नसमारंभाचें या पेक्षां जास्त वर्णन करण्याची येथें आवश्यकता नाहीं. इष्ट हेतु सिध्यर्थ विप्रवर संतुष्ट करण्याकडे मात्र वधूवरांनीं नजर पोंचावली होती हें येथें सांगणें अवश्य आहे. धर्मावर पक्का भरंवसा, त्याची विशेष आवड आणि धर्माची विलक्षण कळकळ हे गुण त्याचवेळीं उत्तम अस्तित्वांत होते आणि ह्मणून देवतारूपी जे विप्रजन ते संतुष्ट करून त्यांचा अनुग्रह घेण्याचा परिपाठ फारच जारीनें चालू होता. त्यावेळीं विप्रजन देखील विप्रदेवता या नांवाला शोभतील असे असत. कलियुगाचे नियमाप्रमाणें कलीच्या प्रारंभापासून, जरी ब्रह्मत्वाचा ब्राह्मणांत लोप होण्यास सुरवात झाली होती तरी ज्यांनां कलीनें मिठी मारली होती अशाचेच ठिकाणीं तो लोप हळूहळू दिसून येत होता परंतु कलीचें कपट लक्षांत घेऊन त्याचा स्पर्श आपणांस न होईल अशा दक्षतेनें वागणारे जे विप्रजन असत ते अत्यंत पूज्य, सुशील, सत्वशील आणि प्रत्यक्ष देवतां प्रमाणेंच असत. आणि त्यांचा अनुग्रह नेहमीं फलकारक असे. कलीची प्रबलता वाढत चालली तसतसा तो आपला अंमल करडा चालवून पुष्कळांनां कवटाळूं लागला. तसतशी त्याची कळा सर्वत्रांत वाढूं लागून तिचा परिणाम कलीच्या इच्छेप्रमाणें झालेला सांप्रत आपण पहात आहों. असो.

त्याकाळीं वधुवरें व लग्नसमारंभास जमलेली इतर मंडळी यांचे करमणुकीकरतां शौर्योत्साहकारक असे मर्दुमकीचे खेळ करविण्याची चाल असे कसरत, शस्त्रकौशल्य, आणि इतर अशाचप्रकारचे खेळ, वधुव-

रांपुढें झाले. अनेक खेळाडू मंडळींनीं आपलें कौशल्य दाखवून अजब प्रयोगांनीं मंडळीचीं मनें प्रसन्न केलीं आणि हुषारी प्रमाणें—योग्यतेप्रमाणें—त्यांची संभावना उभयपक्षांकडून करण्यांत आली. जयपाळ आणि जयदेवी ह्या उभयतांस मनापासून, युद्धोपयोगी असें शस्त्रकौशल्य ज्यांनीं ज्यांनीं म्हणून दाखविलें, अशीच मंडळी जास्त आवडली. पट्ट्याचे हात, भाल्याचे फेंक त्याचप्रमाणें अचुक निशाणें वगैरे खेळ त्याकाळीं सर्वसाधारण होते. *

आणखी एक आश्चर्य मानण्यासारखी कला त्यावेळीं कांहीं मंडळीस अवगत होती. ती मंत्रविद्या होय. मंत्रतंत्राच्या सहायानें कांहीं अजब आणि अमानुष

---

* कालचक्राच्या फेऱ्याबरोबर सद्धां हिंदुस्थानांतील एकंदर कलांचा ऱ्हास झाला आहे. तथापि प्रत्येक कलेंत निपुणता प्राप्त करून घेण्याची इच्छा असल्यास साधनें अद्यापही उपलब्ध आहेत असें दाखविणारे कांहीं लोक अद्याप आपणांत ह्यात आहेत. त्यांची शस्त्रकौशल्याची शिताफि पाहून मन थक्क होऊन जातें. दुर्दैवानें तशा गुणज्ञांची चहा व्हावी तशी होत नाहीं ही गोष्ट निराळी. त्याचप्रमाणें कसरतींचीं व आंगमेहनतींचीं कामें अप्रतिम करून दाखविणारे ही अद्याप पुष्कळ आहेत त्यांचे कौशल्याची तारीफ परस्थ लोकच करतात. आम्हांस त्याचें कांहीं वाटत नाहीं इतकेंच नव्हे तर उलट तशाप्रकारच्या निपुणिकांची कितिएक प्रसंगीं निर्भत्सनाही झालेली कांनीं येते. उघडच आहे. एक तर ती कला अज्ञानी मंडळीचे हातीं गेली आणि सज्ञान मंडळीस तिचें हल्लींच्या काळांत मोल वाटत नाहीं. कारण ती निरुपयोगी आहे. आंगमेहनतीचे, मर्दुमकीचे आणि शस्त्रकौशल्याचे खेळ खेळण्याचे दिवस निघून गेले. सद्द्यांचा मनु तत्वज्ञानाचा आहे असा बहुतेक सर्वत्र समज आहे.

कृत्यें करून दाखविणारी मंडळी त्या काळीं हयात होती, असा जुन्यांत उल्लेख मिळतो. वधूवरांचे करमणूकीकरितां जे खेळ झाले त्यांत असे ही कांहीं झाले कीं, एका मनुष्यानें जमिनीवर वस्त्र अंथरून त्या खालून आपल्या मंत्रप्रभावानें अनेक विषारी सर्प काढिले. ते सर्प त्याचे आंगावर चढून बसले. तो नागनाथच झाला. वाटेल त्या तऱ्हेनें त्यानें त्या सर्पांस खेळविलें, नाचविलें, डवचिलें आणि झासून सोडलें परंतु एकाही पन्नगमूर्तीनें आपल्या विषयुक्त दंताचे त्यावर प्रहार केले नाहींत. त्या नागधारी मांत्रिकानें पुनः पुनः धोतर झाडून टाकावें, सर्व मंडळींची खात्री करून द्यावी आणि पुनः सर्पांस अह्वाहन करावें. पन्नगपंक्ती जणूं त्याची सेवकसेनाच बनली. आज्ञा होतांच हजरी देण्यास एकामागून एक टोळ्या तेथें जमून पन्नगधारी मांत्रिकापुढें हजर होत. असा क्रम बराचवेळ चालूं ठेवून त्या मांत्रिकानें हजारों सर्प काढून दाखविले आणि शेवटीं त्या सर्वांस वस्त्राखालीं झांकून आपापले ठिकाणीं जाण्यास आज्ञापिलें. एका क्षणांत तो पन्नगसमूह नाहींसा होऊन त्या मांत्रिकानें वस्त्र झाडून दाखविलें.

दुसऱ्या एका मांत्रिकानें दोन रिकाम्या तंबूंतून दोन गजराजांस अव्हाहन केलें. त्या बरहुकूम दोन हत्ती तेथें हजर झाले आणि आज्ञेची वाट पहात उभे राहिले. त्या मांत्रिकानें त्यांनां झुंजण्याची आज्ञा करतांच त्यांचीं गंडस्थळें एकमेकांवर मोठ्या जोरानें आदळलीं. सोंडेचे तडाके एकमेकांवर बसूं लागले. दंतक्षतांनीं दोघेही बेजार झाले. मस्तकाची टक्कर होतांच

झणकून अवाज होऊन तेथें ठिणग्याच पडत. अवजड मूर्तीच्या दणक्यानें तो प्रदेश दणाणून गेला. त्यांचे दुःखपूर्ण चित्कार ऐकून मंडळीचे मनांत अनुकंपा उत्पन्न होऊन त्यांनीं त्या दोघांची झुंज सोडविण्यास सांगितलें. मांत्रिकाची आज्ञा होतांच दोघेही गजराज आपापले तंबूंत निघून गेले आणि आगि तेथें अदृश्य झाले. *

* ही हकीकत उघडाउघडी अगदीं असंभवनीय दिसते आणि निव्वळ गप्प वाटते. इंग्रज ग्रंथकारांनीं, ह्या गोष्टी जुन्या पोथ्यांतून घेतल्या आहेत, असा उल्लेख ठिकठिकाणीं केला आहे. परंतु असल्या गोष्टी कितपत शक्य आहेत किंवा भरवंसेदार आहेत अशाबद्दल स्पष्ट मत देण्याची मात्र कोणी तसदी घेतलेली नाहीं. वास्तविक त्यांचे तसें न करणें हें खोडसाळपणाचेंच द्योतक आहे. असल्या गोष्टींना एक तर सयुक्तिक आधार सांपडणें कठिण आणि पुरावाही बिलकूल मिळावयाचा नाहीं. अशाप्रकारच्या अनेक गोष्टी ऐकल्याचें पुष्कळ सांगतात परंतु प्रत्यक्ष डोळ्यांनीं अशा गोष्टी पाहिल्याचें सांगणारा एकही आढळावयाचा नाहीं. परंपरया असल्या गोष्टी लोकवार्तेंतून पसरत असतात. शिवाय असल्या गोष्टींवर पूर्ण विश्वास जरी बहुतेकांचा असत नाहीं तरी त्या साफ खोट्या अगर नुसत्या गप्पा, असेंही पुष्कळांस, मानावेंसे वाटत नाहीं

मांत्रिक मंत्रप्रभावानें पाहिजे ते करूं शकतो असा साधारण समज आहे आणि ह्मणून मांत्रिकाचा आव आणणाऱ्या मनुष्यांसही सर्वत्र वचकून असतात. निदान त्याचे वाटेला तरी कोणी जाऊ नका असें सांगणारे सांगतात. इतका मंत्रविद्येचा धाक बसण्यास बहुशः कादंबरींतील कल्पनाभांडारच कारण असावें.

मंत्रविद्येत पारंगतता मिळविल्याचा आव घालणारे मंडळींचा वेळोवेळीं जो फजितवडा उडतो तो पाहून हंसूच येतें, अज्ञानी लोकांस फसवून, त्यांचे डोळ्यांत धूळ टाकून आपली पोतडी भरण्याचा प्रयत्न करणारे येथून तेथून मांत्रिकपणाचा डौल मिरवीत असतात. असो. जों जों शास्त्रीयशोध विशेष लागूं लाग-

अशारितीनें लग्नसमारंभ पार पडला. आप्तइष्ट मंडळी हळूहळू जेसलमीरांतून आपापलें खटलें आटपूं लागली. जयदेवी आणि जयपाळास एक कार्य निर्विघ्न तडीस गेलें ह्मणून जरा समाधान वाटलें, तथापि मुख्य आणि अत्यंत महत्वाचें जें काम तें अद्यापि होणें आहेच आणि तें नीट साध्य झालें तरच पहिल्या कार्याची कांहीं महति होती तेव्हां त्या दोघांस पुढील उद्दीष्ट कार्य साधण्याची उत्कंठा असली पाहिजेच आणि तीं दोघें त्याच विवंचनेत होतीं.

एकेदिवशीं, ह्मणजे विवाहविधी आटोपल्यावर सुमारें एका आठवड्यानें, सायंकाळीं जयदेवी रिवाजाप्रमाणें मोठ्या थाटमाटानें आपल्या मैत्रीणींसह, एकलिंगजीच्या दर्शनास गेली होती. जात्या ती सौंदर्यवान, तशांत संपूर्ण अलंकारांनीं युक्त आणि शिवाय आनंदी अर्थात तिचें तेज अप्रतिम दिसून पहाणाऱ्यास थक्क करून सोडणारें असें असलेंच पाहिजे. ती मंदगतीनें देवळांत गेली. एकलिंगजीला भक्तिपुरस्सर वंदन करून ती कांहींवेळ तेथेंच बसली. देवळांत जमलेल्या इतर बायकांत तिजविषयीं कुजबूज उत्पन्न होऊन त्या तिजकडे पाहूं लागल्या, बोटें दाखवूं लाग-

तील तों तों आपोआप हा धाक कमी होईल ही गोष्ट खरी. विषय वाढविण्याचें किंवा त्याच्या खरे-खोटेपणाबद्दल चर्चा करण्याचें हें स्थळ नव्हे. फक्त असल्या गोष्टी गैरविश्वास उत्पन्न करण्याऱ्या आणि निव्वळ गप्पा असतात इतकेंच सांगितलें ह्मणजे पुरे आहे. येथें ह्या गोष्टी उतरून घेण्याचें कारणही अज्ञानाचा मासला दाखविण्या करतांच होय.

ल्या, आणि मधून मधून तिरस्कृतीदर्शक मुद्रेनें, तिच्या काळजास घरें पडतील अशा तऱ्हेचे शब्द उच्चारून, हसू लागल्या. जयदेवीनें तिकडे फारसें लक्ष दिलें नाहीं. परंतु जेव्हां गोष्ट अति निकरावर आली अर्थात उघडाउघडी जेव्हां बायका तिज-संबंधानें बोलूं लागल्या आणि एका वात्रट स्त्रीनें जेव्हां प्रत्यक्ष तिलाच दिल्लीकडील खबर कशी काय आहे आणि आपण कधीं जाणार ! गां-वात जी बातमी पसरली आहे कीं, अल्लाऊद्दीनाची आपणावर फार मर्जी बसली आहे ती खरी कीं काय? आणि मग हे लग्नाचे रिकामे सोहाळे करण्यांत काय अर्थ होता " असें विचारिलें तेव्हां ती मुकाट्यानें ते-थून उठून घरीं आली. त्या बायकोचे धारिष्ट्याबद्दल तिला फार आश्चर्य वाटलें. आणि अशा प्रकारचे धाष्टर्याचा उपयोग जर अन्य कामीं, स्त्रिया करितील तर त्यांना खात्रीनें तें भूषणावह होईल असेंही तिच्या मनांत आलें व तिनें पर्यायानें त्या वात्रट स्त्रीच्या कानावर, ती गोष्ट, घालण्यास आपल्या कांहीं मैत्रि-णीस सांगितलें.

परंतु त्या स्त्रिच्या कुत्सित शब्दांचा जयदेवीचे मनावर काय परिणाम झाला ! तिला एकदम सर्व गोष्टींची आठवण होऊन थोडावहूत जो तिच्या मनाला आनंद म्हणून वाटत होता तो पार नाहींसा झाला आणि तिच्या मनाला सारखी तळमळ लागली. लग्नांतील सोहाळे आपण मोठ्या खुशालीनें भोगीत आहोंत आणि तिकडे बाबा प्रत्यक्ष यमापुढें दिवस- आणि तेही निवळ अ.प.

देत, काढीत आहेत ही गोष्ट फारच दुःखाची आहे, आपल्याला तरी निदान येथें सुखसोहाळे स्वस्थतेनें भोगीत बसणें अत्यंत अयोग्य असें तिला वाटलें. तिचें मन तिला टोंचूं लागलें आणि तशा स्थितींत ती नेहमीप्रमाणें घरभर विद्युल्लतेप्रमाणें चमकत न राहतां एकदम, शयनमंदीराकडे गेली आणि दार नुसतेंच लोटून ठेऊन ती शय्येवर पडली. एकांत मिळाल्यावर तर तिच्या मनानें फारच उचल खाल्ली. प्रथम ही गोष्ट गावांत सर्वत्रांचे कानीं गेली असावी कशी? या गोष्टीचा छेडा लावून तें कृत्य चुलतीचेंच असावें असा तर्क काढल्यावर ती पुढील इमारत कोणत्या थाटानें उठवायची आणि सर्वत्र कुत्सित मंडळींचीं तोंडें कशीं बंद करावयाचीं या विवंचनेस लागली. हजारों विचार तिला सुचूं लागले परंतु एकही नीटसा तिला वाटेना. शेवटीं सर्वच यथास्थित आणि मनासारखें झालें ह्मणजे आपोआपच लोकांचीं तोंडें बंद होतील. फक्त योजिलेल्या कार्याचे प्रयत्नांस होतांहोईतों लवकर प्रारंभ करावयाचा एवढाच शेवटीं विचार निघून तिचें मन कांहींसें हलकें झालें. ज्या ज्या गोष्टी घडून येत आहेत त्या त्या रीतसर आहेत सबब आपल्याकडे दोष नसून उलट आपण योग्य मार्गानेंच जात आहों असें तिला जेव्हां दिसून आलें तेव्हां तर अगदींच मनाची तळमळ नाहींशी झाली. तिचें मन स्वस्थ झालें. आणि नेहमींप्रमाणें आपल्या उद्योगास लागावें ह्मणून ती जों उठणार तों शयनमंदीराचे बाहेरच्याच बाजूस कोणी बोलत असल्याचें तिला कळून आलें. लक्ष

देतांच चुळतांचुळतांच ऐकमेकांशीं बोलत असून विषयही आपलाच निघाला आहे असें समजतांच, तो गुप्त संवाद ऐकून घ्यावा ह्या हेतूनें, ती तशीच पडून राहिली.

जयदेवी एकलिंगजीचें दर्शन घेऊन परत आल्याचें जयदेवीच्या एक दोन मैत्रिणींशिवाय व कांहीं, चाकरनोकर ह्यांशिवाय, कोणालाही माहित नव्हतें. तेव्हां ती देवदर्शनार्थ गेली आहे अशी संधि पाहून काकाजींनीं जयदेवीचे संबंधानें आपले अत्यंत गुप्त विचार आपल्या लाडक्या स्त्रीस सांगण्याचा विचार केला आणि एकांतस्थल फक्त तेंच असें पाहून तीं नवराबायको जयदेवीचे शयनमंदीरासंनिध बोलत उभीं होतीं. जयपाळ घरीं नाहीं आणि जयदेवी देवदर्शनास गेली ती अद्यापि आली नाहीं असा त्यांचा समज होता म्हणून अगदीं मोकळ्या मनानें उभयतांचें संभाषण चाललें होतें.

जयदेवीनें इत्थंभूत तें संभाषण ऐकलें. तीं नवराबायको पुढें ही कांहीं बोलत होतींच परंतु त्या भाषणांत विनाकारण पाल्हाळाखेरीज कांहीं नव्हतें म्हणून जयदेवीनें तिकडे दुर्लक्ष केलें तथापि तीं दोघें तेथून जाईपर्यंत तिला मंदिरांतून बाहेर जाणें शक्य नव्हतें म्हणून तसेंच पडण्याशिवाय दुसरा मार्गच नव्हता. मधून मधून त्यांच्या पाल्हाळाकडे ती लक्ष देई परंतु तो निरुपयोगींच होता. शेवटीं “ बरीच रात्र झाली आणि जयदेवी परत येण्याची वेळ झाली ” असें म्हणून काकाजींनां घेऊन काकूबाई तेथून निघून गेल्या.

तें जोडपें निघून गेल्यावर आपोआप जयदेवीस

पुनः एकांत मिळून तिला ऐकलेल्या संभाषणावर विचार करण्यास वेळ मिळाला. डोळे मिटून ती पडली होती आणि अंतर्याम सगळें अनेक विचारांनीं भरून गेलें होतें. काकाजींचे मनांतील अगदीं अंतस्थ हेतु जो तिला समजला तो अर्थात महत्वाचाच असला पाहिजे कारण तिला पुनः विचारसागरांत बुडावें लागलें.

रात्र पडल्याकारणानें जयपाळ घरीं आला. त्याला कारणापुरतें बाहेर जावें लागे तेथें त्याचा नाईलाज होई. बाकी सगळा वेळ जयदेवीच्या सहवासांत तो घालवी आणि जयदेवी नेहमीं दृष्टी समोर असावी अशी त्याची इच्छा होती. असो. तो घरांत इकडे तिकडे न जातां किंवा कोणाशीं न बोलतां तडक शयनगृहाकडे गेला आणि दरवाजा अर्धवट लोटलेला पाहून आंत जयदेवी आहे किंवा कसें हें पहाण्यास्तव त्यानें दरवाजा परता उघडला. जयदेवीनें नेत्र मिटले होते आणि दरवाज्यापासून जर कांहीं शब्द होऊन तिनें जागृत व्हावें तर तो आवाज तिला विचारांतून एकदम जागी करण्याइतका समर्थ नव्हता. अर्थात तिचे स्थितींत कांहीं बदल झाला नाहीं. जयपाळानेंही जास्त त्रास देऊन तिला एकदम दचकवून उठविण्याचा प्रयत्न केला नाहीं. तो तिजकडे पाहून मनाशींच धन्यता मानून घेत दरवाज्यांत उभा राहिला आणि तशा स्थितींत दिसणाऱ्या तिच्या स्वाभाविक सौंदर्यमधूचें नेत्रांस पान करवूं लागला.

जात्याच सौंदर्ययुक्ता जयदेवी, आभरणांनीं मंडित असतां जास्त मोहक दिसणार नाहीं काय ? तिचे नीट

नेटके आणि सप्रमाण अवयव दृग्गोचर होण्यास ती वेळ फारच सहाय होती. वामहस्त उशाशीं घेऊन त्यावर तिनें आपलें मस्तक ठेविलें होतें. कोमल हाताला तो भार जरी फारसा जड नव्हता तथापि रक्ताभिसरण पूर्ण स्वतंत्रतेनें होण्यास अडथळा झाल्या कारणानें थोडासा भाग आरक्त झाला होता. हात सरळ धरलेला असून फक्त दंडावरच मस्तकाचा आधार असल्यामुळें आरक्तपणा दंडापर्यंतच दिसून पुढील सर्व भाग किंचित निस्तेज दिसत होता. बोटांतील रत्नजडित मुद्रिकांचा प्रकाश तिचे शशीवदनावर शुभ्रयुक्त पडला होता. रत्नाची तेजस्विता अतोनात होतीच परंतु भरीला रत्नदीपाचे जोतीनें ती सतेज-अधिक-झाली आणि निरनिराळ्या रत्नांतून निघणारी सूक्ष्म जोत ही निरनिराळी शशीप्रभेप्रमाणें दिसून जयदेवीचें वदन जास्त खुलवीत होती. सुवर्णालंकारमंडीत ती अप्सराच त्यावेळीं तेथें पडली असल्याचें जयपाळास वाटून त्यानें स्वतःस धन्य मानावें ह्यांत कांहीं आश्चर्य नाहीं. वस्त्रें, भूषणें, स्थिति आणि वेळ व इतर सगळीं साधनें जर तिची मोहकता वाढविण्यास कारण झालीं होतीं तर प्रत्यक्ष अप्सरेचा अथवा सर्व अप्सरांची राणी जी तिलोत्तमा तिचा भास जयपाळाला झाल्यास नवल नाहींच. त्यास अत्यंत धन्यता वाटली. अति आनंदानें तो आंत गेला. तिला एकदम जागी करण्यापेक्षां कांहीं तरी चेष्टेनेच तिला जागी करावी अशी इच्छा मनांत येऊन त्यानें रत्नदीपावर एक गुलालगोटा उडविला. तो फुटून आंतून गुलाल सर्वभर

पसरून जोतीचा रंग बदलला आणि त्या प्रकाशांत जयदेवी जास्तच मोहक दिसूं लागली. जयपाळानें तेथें तबकांत ठेविलेला एक पुष्पहार उचलून घेऊन तो फारच सावधगिरीनें जयदेवीचे आंगावर फेंकला.

त्या पुष्पहाराचा स्पर्श होतांच जयदेवी एकदम जागी झाली. चपल विद्युल्लतेप्रमाणें ती उठून बसली आणि हार हातांत घेऊन त्याचा एकवार तिनें वास घेतला. मनोहर सुवासानें तिचें मन प्रफुल्लित केलें. तिनें सभोंवार दृष्टी फिरविली तरी तिला कोणी दिसलें नाहीं. गुलाल उधळलेला पाहून ही शृंगारचेष्टा खात्रीनें जयपाळाचीच आहे हें तिनें ताडलें. ती पर्यंकावरून खालीं उतरली आणि रत्नदीपाजवळ गेली. जयपाळ पर्यंकाजवळच खालीं वांकल्याकारणानें उघडच तिच्या नजरेस पडला नाहीं. ती रत्नदीपाजवळ गेलेली पाहून हळूच जयपाळ तिचे मागून गेला आणि तिचे नेत्र झांकून धरिले तो स्पर्श तिनें ओळखला. तिची तनु किंचित सकंपित झाली आणि त्या चेष्टेचा परत आहेर ह्मणून हातांतील हार तिनें तसाच उलट बाजूनें जयपाळाचे गळयांत घातला.

तावडतोब जयपाळाचे हात तिचे नेत्रांवर असलेले सुटले आणि त्याचे मुखांतून आनंदोद्गार निघाले तो तिचे हनुवटीस हात लावून ह्मणाला " जयदेवी " परंतु तो पुढें कांहीं बोलणार तोंच जयदेवीनें त्याचे हातून आपणांस सोडवून घेऊन ती सलज्ज एका बाजूस उभी राहिली. तिनें आश्चर्यानें आपला हात

मुखावर धरला. जणुं काय त्यानें तिचें नांव घेतलें हें महदाश्चर्यच तिला वाटलें.

जयदेवी आश्चर्यभरित आणि सलज्ज उभी असलेली पाहून, विशेषतः तिची आश्चर्यव्यक्त करणारी मुद्रा पाहून जयपाळ हंसला आणि ह्मणाला जयदेवी परंतु त्यानें मुखांतून तिचे नांवाचा उच्चार करतांच तिला अतिशयच आश्चर्य वाटून तिचें एक अर्धक्षण वदन आश्चर्यभरित झालें आणि लागलेंच स्मित हास्य करून तिनें आपली मान फिरविली. दृष्टी वळवितानां जयपाळाकडे सप्रेम दृष्टीनें एकवार तिनें पाहिलेंच आणि तेवढ्यानेंच जयपाळाला विशेष आनंद झाला. जयदेवीनें मान खालीं घातली. तिची दृष्टी जरी हातांत धरलेल्या शालूच्या दशीकडे आणि दुसऱ्या हातानें त्या दशी बरोबर चालविलेल्या चाळ्यांकडे लागलेली दिसत होती तरी वास्तविक त्या दृष्टीचा रोख किंचित मागील बाजूस, अर्थात जयपाळाकडे, होता.

काय चमत्कार आहे पहा! जी जयदेवी प्रथम मोकळ्या मनानें स्त्रीजातीला शोभणाऱ्या शालीनतेनें परंतु बेताच्याच आणि एखाद्या जिवलग मित्राप्रमाणें जयपाळाबरोबर बोलत होती, हंसत होती, खेळत होती, त्याला हरएक गोष्टींत सल्ला देऊन प्रत्येक बाबतींत प्रोत्साहन देत होती, तीच जयदेवी विवाहरज्जूंनीं त्याच्याशीं परिबद्ध झाली असतां त्याच्याशीं मोकळेपणानें आणि पूर्वीप्रमाणें धीटाईनें बोलण्यास लाजूं लागली. जी प्रथम जयपाळास नांवानें संबोधीत असे, तीच जयदेवी स्वतः मुखांतून त्याचें नांव उच्चार-

ण्याचें एकाबाजूस राहिलें परंतु जयपाळाचे मुखांतून आपलें नांव निघतांच लज्जित आणि आश्चर्यचकित झाली. मनांतून जरी इष्ट तरी दृष्टी जयपाळाकडे उघडपणें फेंकण्यास धीर तिला होऊं नये, त्याच्याशीं सलगींत निराळ्याप्रकारचें अंतर पडावें आणि त्याच्या देखत तिनें तोंड फिरवावें त्याचप्रमाणें त्याच्या सांनिध्यानें तिची तनु सकंप आणि रोमांचित व्हावी!! फारच लक्षांत घेण्यासारखा हा फरक. एकट्या लज्जेनें-स्त्रियांत विवाहानंतर स्वाभाविक दिसून येणारी आणि रूढीनें उत्तम आणि स्त्रीयांस भूषणास्पद मानलेली जी लज्या—तिनें हा फरक केला. प्रेमाची गोष्ट तर वेगळीच तें दृढ, चिरकालिक आणि दुप्पट झालें. असो.

तिच्या लज्यायुक्त शृंगारचेष्टेनें जयपाळाला किती आनंद झाला असेल? त्यानें " जयदेवी, खरोखर तूं ह्मणजे एक मोहनीच आहेस. अप्सरांचीही योग्यता खात्रीनें तुजपेक्षां मी पुष्कळ कमी समजतों. पुरे ही लज्जा " असें ह्मटलें, आणि तिचा हात धरून तिला पर्यंकाजवळ आणिली. त्याचे हातून हात सोडविण्यास व केवळ चिन्हाकारण तिनें प्रयत्न केले. मनांत जें हवें असें वाटतें किंवा मनापासून ज्याची आवड तें सुख मिळत असतां वरकांति त्याचा प्रतिकार करण्याचे शुष्क प्रयत्न करण्याचें कारण काय असेल तें असो! परंतु लज्जा निदान स्त्रीजातीला तरी तसें करण्यास लावते. जयपाळाचे इच्छेप्रमाणें ती पर्यंकाजवळ जातच होती, परंतु पावलें टाकण्यांत मंदत्व दिसत होतें आणि प्रफुल्ल व लज्जेची त्यावर छाया पूर्ण दिसत होती असें

मुखकमल वस्त्रावृत्त करून ती पावलें टाकीत होती. तरी वक्रदृष्टीनें जयपाळाचे वदनाचा दर्शनलाभ घे-ण्यास मात्र ती चुकली नाहीं. तिची दृष्टी जयपाळाक-डेच होती तिनें बसावें अशाबद्दल जयपाळास बराच आग्रह करावा लागला. तिनें उभें राहणेंच बरें असें जरी पर्यायानें त्याला दर्शविलें होतें आणि ओढून ता-णून चंद्रबळ आणलें होतें तरी जयपाळास तें कळून चुकलेंच होतें. असो. नूतन विवाहित अशा उपवर जोडप्याचे शृंगारिकभाव वर्णन करण्याचें येथें कांहीं प्रयोजन नाहीं. आणि त्यांचा संबंधही येथें कांहीं ना-हीं, अर्थात जसें व्हावयाचें तसेंच वर्तन दोघांचेंही पर-स्परांकडून होत होतें इतकेंच सांगितलें ह्मणजे पुरे आहे.

जयपाळानें प्रथम तिचें गुणवर्णन थोडेसें बोलून प्रास्ताविक भाग आटोपून घेतला आणि त्याचवेळीं, ती निद्रिस्त नसून जागीच परंतु विचारांत गढलेली होती, हें ही त्यास कळून आलें. विचाराचें कारण अवश्य कळलेंच पाहिजे कारण जयदेवीसारखी स्त्री जेव्हां गूढ विचारांत पडली तेव्हां तें कांहींतरी महत्वाचेंच असलें पाहिजे. ओघाओघानें जरी तें, सांगण्याचें जयदेवीचे मनांत नव्हतें तरी जयपाळानें काढून घेतलें. त्यालाही तें ऐकून आश्चर्य वाटलें—परंतु तिच्याप्रमाणें गोंधळांत मात्र तो पडला नाहीं. तो तिरस्कृतिदर्शक हास्य करून ह्मणाला " असले भागूबाईसारखे विचार काका-जीनां मान्य झाले हेंच आधीं नवल. बाकी ते कोण असल्याचें मला पुरतें माहीत आहे आणि प्रत्यक्ष अनुभवही मला नुकताच आला आहे. परंतु त्यांच्या

स्त्रैणत्वाची इतकी कमाल असेल असें मला आतांपर्यंत वाटलें नव्हतें. असो. असल्या मंडळीपासून जरी आपणांस उघडाउघडी कांहीं भय नाहीं तरी असल्यांची गुप्तकृत्यें मात्र आपणांस नेहमीं अवश्य कळलींच पाहिजेत, नाहींपेक्षां कांहीं चमत्कारिक तऱ्हेनें ते आपली हानी करण्यास चुकणार नाहींत. आडून गोळ्या ज्या येतात तिकडेच फार लक्ष दिलें पाहिजे. हें कळलें हें बरें झालें. तूं निर्भय रहा "

जयदेवीनें कांहींच उत्तर दिलें नाहीं. तिला बोलण्यासारखें कांही नव्हतेंच.

जयपाळ तिला ह्मणाला " अशावेळीं दुसऱ्याचे हृद्गत विचार, आपण एकांत साधून ऐकणें, योग्य आहे किंवा नाहीं? वास्तविक स्त्रीपुरुषांचा एकांत चाललेला संवाद कोणी मुद्दाम ऐकूं नये ही गोष्ट खरी आहे परंतु असली सर्पस्वभावी मंडळी निपजल्यावर शास्त्रवचन सहजच धुडकाविलें जाणार नाहीं काय? हा दोष आपला नव्हे. असो. सुशिले, तुला जर वाईट वाटणार नाहीं—छे, छेः पण वाच्यता करण्याची जरुरच नाहीं. "

जयदेवीनें आतुरतेनें विचारलें " मध्येंच विषयांतर करून पहिली गोष्ट लपविण्याचा प्रयत्न कशाला? मला वाईट वाटण्यासारखी गोष्ट आपल्या हातून घडणार नाहीं हें मला पक्कें ठाऊक आहे. पण असं काय मनांत आलं होतं तें सांगितलंच पाहिजे "

जयपाळ ह्मणाला " ती गोष्ट ह्मणजे इतकीच कीं, जशास तसें. "

जयदेवीनें आश्चर्यचकित होऊन विचारिलें " म्हणजे ?"

जयपाळ म्हणाला " ज्याची विद्या त्यालाच फळली तर काय मजा होईल ? म्हणून म्हणतों दुसऱ्यासाठीं जें तयार करून ठेविलेलें बंधन त्यांत स्वतःचीच मान कशी सांपडते, म्हणजे, जर दुसऱ्याचें अनिष्ट करण्याचा प्रयत्न केला तर स्वतः त्याच साधनांनीं किंवा दुसऱ्या करितां तयार केलेल्या युक्तींनीं स्वतःच कसे पाशांत सांपडले जातों हें त्या उभयतांस कळावें. "

" पण तसें करणं म्हणजे दिखील वाईट नव्हे काय ? जयदेवी म्हणाली.

" मग एखाद्या दुर्दैव्याप्रमाणें जागचे जागीं मरावें हेंच तुला इष्ट वाटतें काय ? तुझ्या विशाल भांडारांतून शेवटीं तुला नें काय सांपडलें तें हेंच काय ? खात्रीनें तूं पूर्वीची जयदेवी नव्हेस. तुझ्या अंतःकरणानें तुला फसविलें ह्यांत संशय नाहीं. " जयपाळानें विचारिलें.

" माझ्या अंतःकरणानें मला फसविलें नाहीं, आणि तें मला कधीं फसविणारही नाहीं. हल्लीं राग मात्र अति त्वरित येऊं लागला आहे. माझ्या बोलण्याचा अर्थ असा भलताच कसा वाटला ? जयदेवी म्हणाली.

" नाहीं. राग मला मुळींच नाहीं. परंतु तुझ्या अंतःकरणाची समता नाहीं हें पाहून वाईट वाटतें. तुझ्या म्हणण्याचा भावार्थ काय तर मग ? " जयपाळानें विचारिलें.

" माझं म्हणणं असं कीं, कोणाचंही नुकसान किंवा

घातपात न होतां जर कांहीं केलं तर तें बरं नव्हे कां ?" जयदेवीनें उत्तर दिलें.

" नाहीं घात हा झालाच पाहिजे. नीच मनुष्यांना प्रायश्चित्त मिळालेच पाहिजे. तुला आतां प्रेमबंध नडूं लागला आहे असें मला वाटतें पण विचार कर अस-ल्या माणसाचे हातून किती वाईट कृत्यें होतील " जयपाळ ह्मणाला.

" होतील परंतु "

" परंतु वगैरे कांहीं नाहीं मी ह्मणतों असें झालेंच पाहिजे " जयपाळ तिला पुढें न बोलूं देतां ह्मणाला " तुझा समज अगदीं चुकीचा आहे. मला पाहिजेतर उतावळा किंवा अविचारी ह्मण किंवा बायकांचे श-चिनमोलाचे असें समजणारा ह्मण, पण मी ह्मणतों असें झालेंच पाहिजे. त्या दंपत्याचे दांत चांगलेच पाडले पाहीजेत. लग्न लावलें ह्मणजे कांहीं मरणासाठीं नव्हे किंवा भीतीनें लपून छपून एकदां कांहीं उरकून घेऊन प्राणहानी करून घ्यावी, ह्मणजे अल्लाउद्दीनाचे तडाक्यांतून तूं सुटशील आणि माझ्याही यातना वांचतील, असल्या पोरकट विचारांचे भरीस पडून मी तुझ्याशीं विवाह केला नाहीं. मला स्मरत आहे कीं, माझें मुख्य कर्तव्य अद्याप पुढेंच आहे आणि तें जर मी योग्य रीतीनें बजावलें नाहीं तर तुझें पाणिग्रहण करण्यांत मी मोठा मूर्खपणा केला असें समजून काय वाटेल ती व्यवस्था स्वतःबद्दल करीन आणि ओढून ताणून नातें जुळविलेल्या स्त्रैण काकाची विनाकारण कींव बाळगणारी तूं काय वाटेल तर कर. योग्य वाटेल

तर माझी मरमंडळींत निर्भर्त्सना कर अगर माझी क्रूरतेनें वाट लाव. परंतु सध्यां मी ह्मणतों तसें झालेंच पाहिजे. मला शीघ्र कोपि ह्मणून तूं आतांच दोष दे, मी त्याची पर्वा करणार नाहीं परंतु तूंच विचार कर. " जयदेवी, अल्लाउद्दीनाचे हातीं सांपडून कुळभ्रष्ट होऊं नये आणि जयपाळ त्याचे सूडास बळी पडूं नये ह्मणून अन्नांत जहर कालवून दोघांसही जगांतून पार करावें असें तिनें सुचविलें आणि तुझ्या काकोबांनी नंदीबैलासारखी मान डोलवून तिचे सूचनेस अनुमोदन दिलें हें कृत्य पुरुषास शोभेसें त्यानें केलें काय ? तूंच आपल्या मुखानें मला हें सगळें सांगितलेंस ना ? समज कदाचित् पुढें आपणांवर कांहीं बिकट प्रसंग आला आणि ऐनवेळीं आपणास जेसलमिरातच छापा धरून बसावें लागलें तर तुझा स्त्रैण काका ती गोष्ट अल्लाउद्दीनास सांगितल्याशिवाय राहील काय ! अल्लाउद्दीनानें त्यास राखेचे तोबरे दिले तर तो आमचा सुगावा लावून दिल्याशिवाय राहील काय ! त्याच्या आंगांत रजपूताचें रक्त खेळतें आहे काय ? एकपरी तुझा बाप पुष्कळ बरा. मी ह्मणतों एवढीच एक गोष्ट नाहीं परंतु माझें मन मला पक्कें सांगत आहे कीं, त्या नंदी बैलाला कृतघ्नत्वाचें प्रायश्चित्त मिळालेंच पाहिजे आणि मी तशी व्यवस्था करणार. ह्यावर तुझें काय ह्मणणें आहे बोल ! "

काय कारण असेल तें असो. जयदेवीला पूर्वीप्रमाणें जयपाळाचे बोलण्यावर प्रत्युत्तर करण्याचें धाडस होईनासें झालें. तो ह्मणेल तें निमुटपणें आपण मान्य केलेंच पाहिजे असाच तिचा समज झाला, नव्हे

तिचे मनाचा कल बदलला. त्याच्या म्हणण्याचे आड आपण येऊं नये इतकेंच नव्हे परंतु जरी त्याचें म्हणणें अकारण असलें तरी त्याच्या आड आपण येणें म्हणजे मोठा गुन्हा करण्यासारखें आहे असेंच तिला वाटूं लागलें. त्याला ज्यांत सुख त्यांतच जयदेवीला सुख, दुःख, काळजी, आराम वगैरे सगळ्या गोष्टी, जयपालाला जर अनुकूल अगर प्रतिकूल तर तिलाही तशाच. अशी स्थिती तर तिची झालीच परंतु त्याचें मत तेंच-हिचें मत, त्याच्या दृष्टीनें जें ग्राह्य तेंच हिला ग्राह्य असेंही होऊं लागलें, म्हणजे तिचें स्वतःचें म्हणून जें कांहीं होतें तें साधारणपणें नाहींसें झालें. फक्त ज्या गोष्टींत वास्तविक जुळे तेथें मात्र तिच्या गुणांचा विकास पूर्वीप्रमाणें दिसून येई. बहुशा जयपाळ वावगें कधींही करणार नाहीं किंवा बोलणार नाहीं असा तिचा समज झाला असावा. आणि तिचा त्यावर विश्वास होताच, कांही असो. तिनें जास्तकमी कांहीं न बोलतां त्याचे म्हणण्यास रुकार दिला.

तिचा रुकार पडलेला पाहून जयपाळास धीर आला आणि त्यानें आपला निश्चय कायम केला. तिचा रुकार मिळण्याचे आधीं, जरी निश्चयात्मक म्हणूनच त्यानें आपलें मत तिला सांगितलें होतें तरी, तिच्या उत्तराकरितां तो ज्या उतावळीनें तिच्याकडे पहात होता त्यावरून त्याचा बेत कायम झाला नव्हता असें जयदेवीनें, जर तिनें त्याचे चेहऱ्याकडे पाहिलें असतें. तर खात्रीनें ओळखलेंच असतें परंतु तिचें त्याच्या विरुद्ध बोलणेंच नव्हतें.

जयपाळ तिला ह्मणाला " तर मग तुझें काम एवढेंच " आणि त्यानें तिच्या कानांत कांहीं सांगितलें. त्याचे शब्द कानीं पडतांच तिचें तोंड उतरल्यासारखें झालें आणि ती घाबरल्यासारखी दिसली. तिला सडकून घामही आला.

तशी तिची स्थिती पाहून जयपाळ किंचीत हसून ह्मणाला " एकूण तुला फारच भीति वाटली. असो तुझ्या समजूतीनें जरी हें दुष्कृत्य असलें तरी मला तें कर्तव्यच आहे आणि तेंही आपणां उभयतांचे फायद्या साठींच. तुझी ह्या कामांत प्रत्यक्ष आंग घालण्याची इच्छा नसल्यास माझें कांहींएक ह्मणणें नाहीं. तूं स्वस्थ मात्र रहा. मीं सगळी व्यवस्था करतों. त्यांनां शासन यथा योग्य झालेंच पाहिजे.

जयदेवीनें नुसती मान हलवून आपली कबुली दर्शविली.

---

## भाग १० वा.



जें घर लग्नसमारंभांत गजबजलेलें होतें, ज्या घरांत नानाप्रकारचे उत्सव होत होते, जेथें मूर्तिमंत आनंद वास करीत होता आणि लग्न होऊन गेलें तथापि अद्यापिही जेथें अनेक याचित तसेंच विप्र आणि नगरांतील इष्टमित्र यथास्थित तृप्त होत होते, तेंच घर दुसरे दिवशीं प्रातःकाळीं ( मागील भागांत सांगितले-

ल्या रात्रीनंतर ) आनंदाचे ऐवजीं आक्रांतानें गजबजूं लागलें. आनंदोद्गारांचे ऐवजीं तेथें आर्तस्वरच ऐकूं येऊं लागले. घरांतील दरोबस्त मंडळीच्या दुःखोद्गारांनीं आणि आक्रोशानें तें घर व्यापून गेलें. काकाजींचें देहावसान झालें. नव्हे त्यानां कोणी विष घातलें. त्यांचें अंग हिरवटलें असून नाकांतून रक्त बाहेर पडलें होतें. तोंडावाटे श्यामवर्ण फेंस आलेला होता. आणि तळमळ करतां करतांच त्यांचा प्राण निघून गेला असावा, असें दिसून येत होतें. त्यांच्या पत्नीचा शोक तर अनावरच होता. तिचें सौभाग्यच नाहींसें झालें आणि त्याकाळच्या रिवाजाप्रमाणें तिला सतिजाणें इष्ट असल्यामुळें आयुष्यही संपलेंच, मग तिनें अनावर शोक करावा ह्यांत कांहीं आश्चर्य नाहीं. ती काकाजींचे शवास आलिंगन देऊन बसली होती. बडवून बडवून तिचें वक्षस्थल सुजलें होतें आणि आरडून आरडून घसा बसला होता तरी ती आक्रोश करून वारंवार त्रागा करीतच होती.

जयदेवी खालीं मान घालून अश्रु ढाळीत होती. रडून रडून तिचें सुकुमार मुख आरक्त झालें होतें. अश्रुजलानें वक्षस्थलावरील वस्त्राचा भाग आर्द्र झाला होता. ती जरी आक्रोश करीत नव्हती तरी आतून तिला यातना असह्य होत होत्या हें वरचेवर येत असलेले हुंदके व्यक्त करीत होते. वास्तविक तिचें कर्तव्य काकुचा समाचार घेऊन-तिला आवरून-तिच्या शोकाला कांहीं थोडाबहुत आळा घालण्याचें होतें. परंतु तें तिचे हातून घडत नव्हतें. कदाचित पर्यायानें

आपणच काकीच्या दुःखास कारण आहों हें तिचे लक्षांत आलें असेल. वास्तविक पाहतां अशाप्रसंगीं सामोपचाराच्या गोष्टी सांगणें हें कर्तव्य आहे म्हणूनच इतरांनीं शांतवन करावें खरें पाहिलें तर ज्यांस प्रियजनांचा वियोग होतो त्यांचें दुःख कमी होणें नाहीं निदान तो प्रसंग नजरेसमोर असतांनां तर कधींच त्यांना इतर ब्रह्मज्ञानाच्या गोष्टीरुचणार नाहींत. असें जरी आहे तरी जर निकट आप्तसंबंधीं खेरीज करून इतरांनी अशा माणसांस ब्रह्मज्ञानाच्या गोष्टी न सांगितल्या तर तीं दोषास पात्र होतात. असो; जयदेवानें मात्र आपलें कर्तव्य केलें नाहीं.

उरल्यांपैकीं चाकरमाणसांनीं एकवार कल्होळ करून सोडला. तीं मोलांचीं माणसें. जरी कितीही त्यांचें प्रेम असलें तरी आप्तजनांची सर त्यांनां कधींच येणें नाहीं. तीं बाजु बाजुस बसलीं होतीं. आणि कांहीं इतर कामांत गुंतलीं होतीं.

जयपाळानें प्रथम दुःखोद्गार काढून शोकाचा अविर्भाव केला आणि लगेच तो मोकळाही झाला. सोंगाची बतावणी झाल्यावर तो इतर मंडळींत मिसळून पुढील उद्योगास लागला.

इष्टमित्रांनीं तसेंच इतर नागरिक मंडळींनीं काकासी-चे मृत्युबद्दल दिलगिरी दर्शविली आणि पुढील विधी ताबडतोब उरकून घ्यावा अशा हेतूनें पुढील तयारीस सुरवात केली.

जयपाळानें काकाजींच्या मृत्यूबद्दल इतर मंडळीस जें कांहीं सांगितलें तेंच खरें असें सर्वांस वाटलें. कार-

ण संशय घेण्यास कोणासही जागा नव्हती. तो जेव्हां जेव्हां काकूबाईजवळ येऊन त्यांना शोक आवरण्याबद्दल सांगे तेव्हां तेव्हां त्याचा मानभावीपणाचा मासला पाहून जयदेवीस अतिशयच हुंदके येत. तो तर तिच्याकडे पाहिल्याशिवाय एकाही खेपेस परतला नाहीं. तिची त्याची नजरानजर होई तेव्हां त्यांत "आपण जें कांहीं केलें तें खरोखर अमानुष असून हृदयविदीर्ण होण्यासारखेंच आहे आणि असलें दुष्कृत्य हातून घडल्याबद्दल जी चटपट मनास लागावयाची ती आपणाला कशी नाहीं आणि असें अंतर्यामी स्वस्थ आपणांस कसें बसवतें?" असेंच ती आपणांस विचारीत असल्याचें जयपाळास दिसून येई. परंतु तिकडे दुर्लक्ष करून तो खुशाल निघून जाई. दुःखाचे भारानें जयदेवी मात्र करपून गेली होती म्हटलें तरी चालेल.

खरोखर आश्चर्याची गोष्ट आहे कीं, महानमहान ऋषिवर्य, अद्वितीय गुणज्ञ विद्वानलोक, तत्ववेत्ते आणि विचारी माणसें ही सगळी महानिद्रेच्या तडाक्यांत सांपडून त्यांचा अंत झाला. लहान मोठे, उच्च नीच आणि गरीब श्रीमंत मिळून एकंदर मानवयोनी तशीच प्राणिकोटी ही मृत्यूच्या तडाक्यांतच पार होऊन जाणार. मृत्यूच्या विशाल दाढांखालीं सर्वांचा चूर होणार. ही सर्वभक्षक अशी महानिद्रा म्हणजे आहे काय ह्याचा शोध करणारा कोणी निघनो आहे काय! मरणें म्हणजे प्राण निघून जाणें असें कोणी म्हणतात. श्वासोश्वास बंद होणें किंवा यमलोकीं जाणें, देहाचा

त्याग करणें असेंही कांहीं ह्मणतात. मिळून देह आणि प्राण हे परस्पर भिन्न होणें त्यालाच मृत्यु अशी संज्ञा सर्वत्र देतात. परंतु देह आणि प्राण हे प्रथमपासून जर एकमेकांशीं अगदीं संलग्न आहेत तर ते निराळे कां व्हावे? त्यांच्या मैत्रींत अंतर कां पडावें? परस्परांत बेबनाव कां व्हावा? बरं कदाचित प्रसंगविशेषीं बेबनाव होतो असें जरी धरिलें तरी मग त्यांची समजूत घालून एक गट्टी कां केली जात नाहीं? भाऊबंदकीचीं कारणें आणि तीं निवारण्याचीं साधनें हीं जशीं अनेक तऱ्हेनें सुचविलीं जातात तशीं कांहीं साधनें देह आणि आत्मा ह्यांमधील बखेडा मोडून त्यांची पूर्ववत गट्टी करून देण्याबद्दल कां पुढें येत नाहींत? परंतु मानवबुद्धीच्या अतर्क्य अशा कांहीं गोष्टी आहेत आणि त्यांतील प्रमुख ही आहे. या महानिद्रेचा उलगडा होणें दुरापस्त, असा निदान सध्यां तरी समज आहे.

महानिद्रेनें एकदां मनुष्यावर झडप घातली ह्मणजे त्यास धनदौलत, आप्तइष्ट, गणगोत, प्रत्यक्ष देह, कीं लहानपणापासून फारच काळजीनें रक्षण केलेला, मोठ्या दक्षतेनें वागविलेला आणि ज्यावर अतोनात प्रेम, तोही सोडून द्यावा लागतो. हा नियम गरीब श्रीमंत सर्वत्रांस लागू आहे, श्रीमंतीचा ताठा, अधिकाराचा मद आणि हेवा मत्सर इत्यादि सर्व मनोविकार जागच्याजागींच सोडून द्यावे लागतात. ही गोष्ट जरी कळत आहे तरी जगांतील व्यवहार निरनिराळ्या धर्तीवर सर्वकाळ चाललेच आहेत. धनदौलत, भार्यापुत्र, इष्टमित्र आणि देह इत्यादिकांपैकीं मृत्यु नंतर एकही

बरोबर येत नाहींत. फक्त सुकृत आणि दुष्कृत हीं मात्र आत्म्याबरोबर येतात. म्हणून मृत्युनंतर आत्म्याला सुख मिळावें, शांति मिळावी-अशी इच्छा धरणाऱ्यानें आपल्या आयुष्यांत नेहमी सत्कृत्येंच करीत असावीं असा एका महंताचा उपदेश आहे. त्याची किंमत अतिशयच आहे तथापि उपयोग करण्याला मात्र तो सुलभ आणि सौख्यदायक आहे. असो.

रीतीप्रमाणें काकाजींचें शव दहनस्थळीं नेलें. तेथें अगोदरच एक लाक्षागृह तयार करून ठेविलें होतें. काकाजींच्या धर्मपत्नीनें सहगमनाचा विचार केला होता. बहुशः रजपुत मंडळींत त्या काळीं सहगमनाची चाल प्रचारांत होती. विप्रगणांचे सूचनें प्रमाणें मंत्र तंत्र दान धर्म इत्यादि विधी उरकल्यावर काकाजींचें शव मांडीवर घेऊन त्यांच्या धर्मपत्नीनें त्या गृहास अग्नि लावला. इतर मंडळींनी बाहेरून चिता पेटविली. सर्वांनीं त्या सतीचें दर्शन घेतलें आणि आगीच्या डोंबांत त्या दंपत्याचे देहाची रक्षा झाली. स्वर्गग्रामीं परस्पर सुखानंदांत रहाण्याकरितां तें दंपत निघून गेलें. *

---

* प्रेमातिशयामुळेंच भर्त्याचे मागें रहाणें स्त्रियांस अमंगल आणि अनिष्ट वाटत असतें आणि म्हणूनच खऱ्या सत्वशील आणि पतिवर निष्ठा ठेवणाऱ्या स्त्रियांस सति जाणें इष्ट वाटत होतें. अद्यापिही सुशील स्त्रियांची तशीच इच्छा आहे, सतीची चाल बंद करण्यासंबंधानें कायदा पसार झाल्यामुळें उघडपणें पतीचे शवाबरोबर सती जाणें हा श्रेष्ठ मार्ग अनुसरणें जरी स्त्रियांस सांप्रत सुलभ नाहीं तरी अन्योपायानें त्या आ-

जयदेवीचें दुःख एकदोन दिवस तरी कमी होणार नाहीं असें जाणून जयपाळानें तिजनवळ काकाजी अगर त्यांची पत्नी ह्या संबंधानें एक अवाक्षरही काढलें

---

पल्ल हेतु साध्य करून घेतात. पतीचे मरणानंतर एका तासानें अगर एक, दोन, तीन अशा दिवसांनीं देहत्याग केलेल्या अनेक साध्वींचीं उदाहरणें सध्याचे काळीं ऐकूं येतात. जिला ह्मणून धर्माज्ञा अवगत आहेत, मान्य आहेत. जिला ह्मणून पति हेंच एक आराद्ध दैवत वाटतें अशा साध्वी स्त्रीस त्याच्यामागें रहाणें कधींही इष्ट वाटणार नाहीं. आतां अपवाद ह्मणून पुष्कळ उदाहरणें दाखवितां येतील आणि पूर्वी देखील अपवादार्थ पुष्कळ दिसून येत होतीं परंतु तेवढ्या वरून सर्वंध स्त्रीजातीला आणि त्यांच्या-बरोबर रूढीला दोष देण्यांत कांहीं अर्थ नाहीं. पूर्वी "सती जाणा-ऱ्या स्त्रीला प्रथम अफूचा अर्क पाजण्यात येत असे" असें कांहीं इंग्रज ग्रंथकारांचे ह्मणणें आहे. परंतु तें खोडसाळपणाचें आहे, ह्याच्यापलीकडे त्यास जास्त महत्व देण्यांत कांहीं अर्थ नाहीं. ज्यांनां आमच्या समाज स्थितीचें, व्यवहाराचें आणि चालीरितीचें ज्ञान नाहीं, ज्यानां स्त्रीपुरुषांच्या अन्योन्य ग्रंथी कितपत दृढ असतात ह्याची कल्पनाही नाहीं, आणि स्त्रियांचे कर्तव्यकर्मासंबंधानें ज्यांच्यांत आणि आमच्यांत फारच मोठें अंतर, अशांनीं कांहींतरी विधानें ठोकून देऊन चांगल्यास वाईट ठरविण्याचा प्रयत्न केला तर तो वेडेपणाच होय. शिवाय आप-णास ज्या गोष्टींसंबंधानें पूर्ण ज्ञान नाहीं अशा गोष्टींसंबंधानें व्यर्थ कांहींतरी कुत्सित बुध्दीनें लिहिणें हें खोडसाळपणाचें लक्षण होय आतां रूढीचा परिणाम स्त्रियांचे मनावर होऊन आणि इतर माणसांनीं भर देऊन देह त्यागासारखें कृत्य एखाद्या अ-विचारी स्त्रीचें झालें असेल परंतु तेवढ्यावरून सर्व गोष्टी तशाच ह्मणणें अगदीं अयोग्य. अहल्याबाईनें मुलीस सती न जा-ण्याबद्दल अनेकप्रकारांनीं सांगितलें होतें परंतु तिचा निश्चय ढ-ळला नाहीं. माधवराव पेशवे यांची स्त्री रमाबाई हिलाही आप्तवर्गानें पुष्कळ उपदेश केले, धास्ती घातली, आणि नाना उपाय केले, परंतु व्यर्थ ! !

नाहीं. खरोखरच जयदेवीचें दुःख लवकर हलकें झालें नाहीं. जेंव्हां जेंव्हां ह्मणून जयपाळ तिचे नजरे-स पडे तेंव्हां तेंव्हां तिला हुंदके येऊन ती रडूं लागे. जयपाळाचे मुखाकडे पाहण्याचें धैर्य तिला होईनाच. नेहमीं ती पदराखालीं मुखचंद्रमा लपवून अश्रु ढाळीत बसे. तिच्या अनिवार शोकामुळें कदाचित् तिच्या सुकुमार प्रकृतींत फरक पडेल अशा भीतीनें जयपा-ळानें तिला समाधानाच्या गोष्टी सांगून पाहिलें परंतु जयपाळाच्या गोष्टींचा किंवा वेदांताचा परिणाम तिच्या मनावर मुळींच झालानाहीं. तिचें मन वरचेवर जय-पाळानें केलेल्या अपराधाची-दुष्कृत्याची-आणि तिनें रु-कार दिल्याबद्दलची पूर्ण ओळख तिला करी आणि ती आ-ठवण तिला फारच तापद होई. अप्रत्यक्ष रीतीनें काकाजी-ना विषप्रयोग करण्याचें अघोर पातक आपणच केलें असें मनांत आलें ह्मणजे तिच्या अंतःकरणाच्या चिंध्या उडत आणि जगाचा कंटाळा वाटूं लागे. जयपाळा बरोबर तिनें एकदोन दिवस भाषण देखील केलें नाहीं परंतु असाच अबोला ठेवला तर त्याचें मन विनाकारण कलुषित होऊन परिणाम भलताच होईल हें जाणून तिनें पूर्वीप्रमाणें त्याच्याशीं वर्तन ठेविलें. परंतु तिच्या डोळ्यांना मात्र, जोंपर्यंत जयपाळ जवळ असे तोंपर्यंत विसावा नसे. एकांतीं ह्मणजे ती सौख्यानंदांत असे असा भागच नाहीं परंतु एकांत बहुशः विचारांतच जाई आणि एकदां विचार भडकले ह्मणजे जयपाळ दृष्टीपडेपर्यंत सहसा तिचें मन कृतापराधाकडे वळत

नसे. तथापि एखादेवेळीं एकांतात देखील दिवसांचे दिवस ती अश्रु ढाळीत बसे.

प्रत्येक गोष्टीला अंत हा आहेच. जयदेवीच्या कोमल मनावर काकाजींसंबंधानें घडलेली गोष्ट जरा जास्त वेळ टिकलीगेली खरी. परंतु जयपाळानें वरचेवर तिचें मन पुढील कार्याप्रित्यर्थ कोणत्या खटपटी करणें इष्ट आहेत वगैरे गोष्टींचा खल करण्याकडे वळविल्यामुळें हळू हळू तिचा विसर पडत चालला. बाकी ती गोष्ट आजन्म तिच्या स्मरणांत राहण्यासारखीच होती. तिचा अगदींच विसर पडणें ही गोष्ट अशक्य होती. असो. जयपाळाला मात्र काकाजींना यथायोग्य प्रायश्चित्त मिळालें याबद्दल बरेंच समाधान वाटलें. दुष्कृत्य तर खरेंच परंतु ज्याचे दांत त्याचेच घशांत घालण्याचें श्रेय त्यानें संपादिलें. जयदेवी अल्लाउद्दीनाच्या हातीं सांपडूंनये व जयपाळही त्याच्या सूडास बळी पडूं नये ह्मणून दोघांसही विषप्रयोग करून मारून टाकून कुळास भावी कलंकापासून साफ दूर करावयाचें अशा गौण हेतुनें काकाजींच्याच सल्यानें काकुबाईंनी जें विषयुक्त अन्न तयार करविलें होतें तेंच अन्न ऐन वेळीं मोठ्या शिताफीनें काकाजींस वाढविलें आणि अशा रीतीनें त्यांनीं तयार केलेल्या कूपांत त्यांसच ढकलून जगांतील व्यापापासून त्यानां मुक्त केलें, हें काम अगदीं योग्य केलें आणि जशास तसें हा न्याय झाला अशाबद्दल जयपाळ मनांत खूष झाला; असो.

त्याच सुमारास दिल्लीहून दुसरें पत्र आलें.

राण्याची स्थिती दिवसेंदिवस फारच वाईट होत चाल-
ली असून जीवाचीहीत्यास आशा वाटत नाहीं असें
त्या पत्रावरून दिसून आलें. जयदेवीला तें पत्र
मिळतांच सहजच तिच्या विचारांचा ओघ राणाजीकडे
वळला. विवाहविधी झाला अर्थात एक काम उरकलें.
आतां दुसऱ्या महत्वाच्या कामाकडे विशेष लक्ष पोंच-
विलें पाहिजे असें जयपाळास कळवून तिनें एकंदर
पुढील तयारीचें अवसान कसें ठेवावयाचें हें ही त्यास
सांगितलें. जयपाळासही तोच ध्यास होता. त्यानें खट-
पट करून कांहीं तयारी केली होती परंतु अल्लाउद्दी
नासारख्या क्रूर व्याघ्राचे तडाख्यांतून राणाजीस
सोडवून आणणें हें काम उतावळीनें आणि कच्च्या त-
यारीनें कधींही निभावणार नाहीं हें तो पक्कें समजून
होता म्हणून मजबूत बंदोबस्तानेंच त्याचा जाण्याचा
विचार ठरत होता आणि तयारीही त्याच धर्तीवर त्या-
नें चालविली होती. परंतु राण्याचें निराशेचें पत्र आणि
जयदेवीचा अत्याग्रह पाहून त्यास त्वरा करणें भाग-
च पडलें. जयदेवीचें समाधान कोणत्याही तऱ्हेनें त्या-
ला करतां येईना आणि तिच्या उतावळेपणाविषयीं
तिला दोषही देतां येईना. राणाजीचें पत्र निराशेच्या
उद्गारानें जरी भरलेलें होतें तरी त्यांत मर्मच्छेदी मज-
कूर इतका कांहीं भरला होता कीं, तो वाचून एक
घाव दोन तुकडे " असें करण्याबद्दल वाचणारास
त्वेष आलाच पाहिजे. तें पत्र वाचून दाखविते वेळेस-
च जयपाळाला इतका कांहीं त्वेष आला होता कीं,
तत्क्षणींच जेसलमीर सोडून दिल्लीचामार्ग धरावा! असेल

त्या तयारीनें जी कांहीं हालचाल करणें शक्य असेल ती करावी आणि मरून जावें. शिवाय राण्यानें विनाकारण जयदेवीस दूषणें दिलीं म्हणून त्याचाही समाचार घेण्याचा विचार, त्याच्या स्वभावानुरूप मनांत आला. जयदेवीला, साद्यंत पत्र ऐकून व्यर्थ वाईट वाटेल आणि विनाकारण तिच्या जिवाला त्रास होईल सबब तें पुरतें न वाचण्याचा त्याचा निर्धार होता आणि खरोखरी, वाचतांना उडवाउडव करून, साधारण मजकूर वाचून दाखवून, राणाजींची निराशा होत चालली आहे इतकाच इत्यर्थ तिला त्यानें कळविला. परंतु जयदेवीला राणाजींच्या स्वभावाची पूर्ण ओळख होती. तिनें पत्रांतील मजकुराचा अजमास अगोदरच ताडला होता. तरी जेव्हां जयपाळानें पत्र वाचून पुरें केलें तेव्हां तिला अचंबा वाटला आणि जयपाळाचे मुद्रेवरून आणि मजकुराचे विसंगतेवरून साद्यंत मजकूर वाचून दाखविला नाहीं हें ताडून पत्र शब्दशः वाचून दाखविण्याबद्दल तिनें आग्रह धरिला. जयपाळाला शेवटीं तें अक्षरशः वाचून दाखवावें लागलें. पत्रांतील मजकुरावरून जरी तिच्यावर जयपाळाचे कल्पनेप्रमाणें फारसा परिणाम झाला नाहीं. तरी तिची उतावीळता फारच वाढली आणि होतां होईतोंपर्यंत त्वरेनेंच काम करून घेण्याबद्दल तिनें हट्ट धरला.

अल्लाउद्दीनासारख्या तख्तनशीब पातशहाशीं उघड सामना करण्या इतकी ताकद जयपाळास प्राप्त कशी होणार ! ती तर गोष्ट अगदींच अशक्य. पात-

शहाशीं उघड रीतीनें कांहींही वैर दाखवावयाचें सामर्थ्य त्याजमध्यें नव्हतें. त्याची हिंमत तशी होती परंतु अनुकूलता असती तर त्या सगळ्या गोष्टी ! तेव्हां त्याचा बेत, साधल्यास पातशहाचा युक्तीनें सूड घ्यावयाचा आणि युक्तीनेंच रतनसिंगाची सुटका करावयाची. हीं कामें तरी हलकीं सलकींथाडींच होतीं ! रतनसिंगाची सुटका करणें हें काम जितकें अवघड, त्याचे दुप्पट पातशहाचा सूड घेण्याचें काम दुर्घट. एकवार संधी तर चुकली. तशी संधी वारंवार येतेच असा कांहीं नेम नाहीं. एकंदरींत जरी युक्तीनेंच दोन्ही कामें करावयाचीं होतीं तरी सामर्थ्याची जरुर पाहीजेच होती. एकवेळ पातशहाचा सूड घेण्याचें काम जरी मागें पडलें तरी चिंता नाहीं परंतु राण्याची सुटका करणें अगदीं अवश्य होतें. सबब त्यानें बरेच दिवस चोंच खटपट करून साधारण तयारी जुळविली होती. आणखी कांहीं अवधी मिळतीतर सामर्थ्य वाढविण्याचा त्याचा विचार होता परंतु जयदेवीचा अत्याग्रहच पडला आणि तो उतावीळपणा अगदींच कुचकामाचा असें त्यासही वाटलें नाहीं. पातशहा मुदत देत होताच. अखेवर रतनसिंगास तो त्रास देत होताच आणि स्वतः राणा तर पराकाष्टेचा त्रासून गेला होता परंतु शीलासाठीं मरणास मात्र तो तयार नव्हता. तेव्हां पुढील अरिष्ट टाळण्यासाठीं होईल तितकी त्वरा करणेंच त्याला इष्ट वाटलें आणि तो त्या उद्योगास लागला.

त्यानें आपला झालेला निश्चय जयदेवीस सांगितला. दोघांचीही त्या संबंधानें बराच वेळ बोलणी होऊन

दोघांच्या विचारांचें ऐक्यत्व झालें, आणि त्याचवेळीं जयपाळानें एक चिठी लिहून दिल्लीस एका जासुदाबरोबर पाठवून दिली. जयदेवीला त्याची उत्सुकता पाहून फारच आनंद झाला. पित्याचे ठायीं असलेलें तिचें प्रेम तिला दिल्लीकडे ओढीत होतें. ती स्वतः तर फारच उतावीळ झाली होती. महत्कार्यांत मोक्ष किंवा मोक्ष कांहीं तरी एक पत्करावयाचेंच, असा दोघांचाही निश्चय ठरलेला होता. दिल्लीस जाण्यासंबंधाची वार्ता शेवटपर्यंत अगदीं गुप्त ठेवण्याची दक्षता त्या दोघांनी आणि त्यांच्या अनुयायांनीं राखीली होती.

---

## भाग ११ वा.

विषयी मनुष्याला उतावीळता आणावी लागत नाहीं. आषकजन नेहमींचेच उतावीळ असतात. प्रितीपात्राची प्राप्ती होईपर्यंचाकाळ कित्येक युगांप्रमाणें त्यानां वाटत असतो आणि " विषय " स्वतःच त्यांस अगदीं दिवाणें बनवितो. अल्लाऊद्दीनाची स्थिती अशीच झाली होती. जयदेवीच्या काल्पनिक मूर्तिकडे त्याचें चित्त वेधलें होतें आणि प्रत्यक्ष तिच्या प्राप्तीविषयीं तो फारच आतूर झाला होता. जयदेवीशिवाय सगळें जग तुच्छ, असें त्यास वाटत होतें. सौंदर्याची अप्रतिम मूस अशी जयदेवी एकच असा त्याचा समज, आणि त्याला भर खुशामती मंडळींनीं

दिली होती. अर्थात रात्रंदिवस त्याला जयदेवीचा ध्यास लागला होता. जयदेवीचा ओढा असल्यामुळें रतनसिंगाकडे दररोज त्याच्या येरझाऱ्या होत होत्या. इकडे रतनसिंगाची रोज रोज मुदत वाढण्याऐवजीं कमी होत होती आणि शिक्षेचें प्रमाण मात्र वाढतें होतें. जयदेवीला दिल्लीस बोलावून आणण्याचें काम रतनसिंगास अगदीं अल्प आणि सुलभ आहे असें वाटून तो राण्याची नेहमी पिच्छा पुरवीत असे. दिवसगत होण्यास कारण स्वतः राणाच आहे याबद्दलचा त्याचा संशय दृढ होण्यास राण्याच्या एका पत्रानें बरेंच पुष्टीकरण दिलें होतें. ह्मणून दिवसेंदिवस त्याचा संशय जास्तच बळावत चालला आणि राण्यानेंच आपणाशीं दगाबाजी केली असें त्याचें मन हळूहळू त्यास सुचवूं लागलें. उघडच मग राण्याचे हाल जास्त होऊं लागले. छळाची सीमा झाली. विनाकारण आपला संशय घेतला जात आहे वगैरे मजकूर अल्लाऊद्दीनाला जरी सांगितला होता आणि प्रत्यहीं आणाशपथा वाहून अल्लाऊद्दीनाला आपलें ह्मणणें खरें भासविण्याचे त्याचे प्रयत्न जरी सुरू होते तरी ते अगदीं व्यर्थ होते. राणा आपली बाजू राखण्यास्तव जों जों आणाशपथा वाही आणि करुणोद्गार काढी तों तों अल्लाऊद्दीनाला त्याचा जास्तच संशय येई. एकंदरीत राण्याची स्थिती फारच वाईट झाली होती. अल्लाऊद्दीनानें, जर त्यास एकदम मारण्याचें योजिलें असतें तर तो खुशीनें मरणास सिद्ध झाला असता. प्रसंगीं राणा स्वतः तसें बोलूनही दाखवी परंतु, पातशा-

हाचा बेत तसा नव्हताच. जोंपर्यंत राणा ताब्यांत आहे तोंपर्यंतच जयदेवी अगदीं सुलभतेनें हातीं येईल, हें तो पक्कें जाणून होता. छळांत कांहीं तरी सौम्यता येईल अशा आशेनें राण्यानें दुसरें एक पत्र जेसलमीरास पाठविलें. त्यांतील मजकूर देखील पातशहानें जसा सांगितला तसाच लिहिलेला असून त्यांत जयदेवीला दिल्लीस येण्याबद्दल अत्याग्रहपूर्वक विनंती केली होती. भाषेसंबंधानेंही बराच कडकपणा योजिलेला असून तिचे कोमल हृदयावर कठोर प्रहार करतील असेच बहुतेक शब्द त्यांत वापरले होते. तात्पर्य काय कीं, राण्यानें आपल्याकडून जितकी खटपट करवेल तितकी केली होती. अल्लाउद्दीनानें तें पत्र स्वहस्तें मोहोरबंद करून जासूदाचे स्वाधीन केलें होतें. जासूद जातो केव्हां, कोणत्या त्वरेनें इत्यादि माहिती ठेविली होती तरी राण्यासंबंधानें त्याला विश्वास वाटला नाहीं. स्वतः जो अविश्वासी त्याला सगळें जग अविश्वासी दिसणारच. त्यांतून त्याचा संशय दृढ होण्यास राण्याकडून जरी एकचवार कारण घडलें होतें तरी तेवढें त्यास पुरे होतें. त्याची प्रियाराधना सारखी चाललीच होती आणि राणा त्याला वारंवार अश्वासनही देत होता.

अल्लाउद्दीनाप्रमाणें राणाही जयदेवीच्या आगमनाची वाट पहात होता. कारागृहवास, छळ, त्रास, निराशा आणि प्राणांत होण्याची भीति हीं जयदेवी येतांच पार विलयास जाऊन तो दिल्लीपतीचा श्वशुर बनणार होता. अर्थात पुनः सुखशैलावर आरोहण

करणार होता आणि ह्मणूनच तो तिची मार्गप्रतिक्षा करीत होता. पूर्वीचे विचार त्याचे डोक्यांतून पार निघून गेले होते. कुलकलंकी ह्मणून जरी सर्व जगभर डंका गाजणार होता तरी त्याची क्षिती तो आतां मानीत नव्हता. सर्व कांहीं सुखांतच त्याची आशा गुंतली होती! आणि तें सुख जयदेवीच्या आगमनावरच अवलंबून होतें. जयदेवी सुपर्तीं दिल्लीस आली कीं, आपला व्यसनाब्धि सफल आला असें त्यास पक्कें वाटत होतें. ती आपली अवज्ञा करील, शोक करितां मरेल किंवा जयपाळाकडून तिला कांहीं अडथळा होईल वगैरे विचार तर त्याच्या मनास शिवत देखील नव्हते. जयदेवी पितृवचनास मान देऊन अल्लाउद्दीनास वरणार, ती दिल्लीराज्ञी होणार, आपली सुटका होऊन पुनरपि सौख्यशिखरावर आपण चढणार आणि जयपाळ चिडलेल्या सर्पाप्रमाणें फोंफावत दिल्लीपतीवर जरी रोंखून आला तरी जीवीतास मुकणार, नाहींपेक्षां जयदेवीचा नाद सोडून स्वस्थ बसणार अथवा हतबल ह्मणून विरहानें झुरून झुरून मरणार, ह्याच गोष्टी घडून येणार असा पक्का भरंवसा त्यास वाटत होता. छळाची पायरी जरी एकेक वरच चढत चालली होती तरी अगदीं थोड्याच काळानें हा काळ केवळ स्वप्नवत होणार ह्याच विचारानें तो मनास धीर देत होता.

एकवेळ निमाज अंतरेल अथवा जेवण विसरेल पण राण्याच्या भेट देण्यांत कधींही अंतर पडणार नाहीं असा क्रम अल्लाउद्दीनाचा होता हें वर सांगण्यांत आलेंच आहे. त्याप्रमाणें अल्लाउद्दीन एके दिवशीं

राण्याकडे आला, त्यावेळीं राण्याचे हातांत एक पत्र असून त्याची मुद्रा आनंदित असल्यानें त्यास दिसून आलें. मनांत संचरत असलेल्या मोहनीकडूनच तें पत्र आलें असल्यानें त्यानें तेव्हांच ताडलें आणि तो एखाद्या मीराप्रमाणें भांबन गेला. राण्यानें हातून तें पत्र हातांत घेऊन आंतील मजकूराची कांहीं ओळख पटते किंवा काय म्हणून पाहूं लागला. परंतु त्याला तसें चांचपडत न ठेवतां राणाच एकदम त्यास म्हणाला " जेसलमीरचेंच तें पत्र आहे आणि दिल्लीपति, आपलें निम्मेंअधिक काम फत्ते झालें असें त्यांतील मजकूराव-रून म्हणायला कांहीं हरकत नाहीं "

अल्लाऊद्दीनानें मोठ्या उत्कंठेनें विचारिलें " काय, ती आनंददायिनी दिल्लीस येण्यास निघाली? "

" होय, निघाल्यासारखीच आहे " राण्यानें उत्तर दिलें.

त्याचें भाषण पुर्ण लक्षांत न आणतां अत्यंत आनंदानें अल्लाऊद्दीन म्हणाला " वहावा, काय पण अल्लानें खैर केली आणि तुमचें स्वातंत्र्य तुम्हांस परत दिलें ती सुख-दायिनी दिल्लीस येऊन पोंचली कीं, राणाजी तुमची स्वातंत्र्यता तुम्हास परत मिळालीच. राणाजी म्हणून बहुमानानें संबोधण्यास त्यानें प्रारंभ त्याच वेळेपासून केला, तो पुढें म्हणाला " राणाजी, अल्लापरवरदीगार फक्त तुमच्याच ज्ञातीवर एवढी मेहेरनजर कां करतो हें मला समजत नाहीं. अस्मानच्या परीपेक्षांहीं सतेज आणि मौल्यवान रत्नें फक्त तुमच्या लोकांतच पैदा होतात काय कृपा आहे! मनमोहनी स्त्रीया जीवाचा

आधार आहेत आणि राणाजी तुमची सर्वांगसुंदर मुलगी माझा काळिजा गार करून सोडण्यास एकटीच पात्र आहे; माझा देह, माझी ऐपत, सत्ता आणि माझें सर्वस्व मी तिला अर्पण करीन आणि मधुपा प्रमाणें तिजवर लुब्ध होऊन राहीन. हा माझा दोष मात्र तुम्ही समजूं नका. कारण तुमच्या कन्येचे आंगी तितकी मोहकताच विलक्षण आहे. चुंबकत्व आहे आणि तिच्यांत विद्युत् शक्ती आहे. प्रत्यक्ष तुम्ही देखील ही गोष्ट कबूल कराल. ठीक आहे. राणाजी तुम्ही बंधमुक्त झालाच समजा. प्रत्यक्ष माझ्याप्रमाणेंच तुमचा मान दरबारीमंडळीकडून ठेविला जाईल, अशी मी व्यवस्था करीन. माझा जनाना शोभविण्याचे कामीं जी तुह्माकडून मला मदत झाली आहे ती मी कधीं विसरणार नाहीं. बस्स, तिला सामोरें जाऊन मोठ्या इतमामानें अस्मानी महाल्यांत घेऊन येणार मी स्वतःच राणाजी. तुमची इच्छा असल्यास तुह्मीही मजबरोबर या; तुह्मांला मोकळिक मिळेल. दिल्लीशहर सतेज होत असलेलें पाहून माझ्या मंडळींत हर्ष आणि आनंद फैलावून ते तिच्या आगमनाचा बडा समारंभ करितीलच करतील. तथापि मी सर्वांस सक्त हुकूम देऊन बडी रोषनाई आणि फारच मोठा समारंभ करण्यास लावीन. राज्ञीपदास योग्य अशी, राणाजी, एक तुमचीच कन्या होय." अशा तऱ्हेचे त्याचे आनंदोद्गार निघत होतेच. जणूकाय जयदेवी आपणासमोर उभी असून तिनें आपणांस वरलेंच आहे असेंच त्यास वाटलें! कल्पनामय सृष्टींती-

कच हे सर्व खेळ. अजून जयदेवी प्रत्यक्ष त्याच्या नजरेस देखील पडली नव्हती.

राण्यानें त्याला यथास्थित बोलूं दिलें. त्यानें होऊन त्याला प्रतिबंध केलाच नाहीं. आधींच तो राणा, तो प्रतिबंध करता काय ? परंतु पत्रांतील एकंदर आशय जर त्यानें अल्लाऊद्दीनास उघड करून सांगितला असता तर त्याचे आनंदोद्गारांस एक प्रकारचा प्रतिबंधच झाला असता. राणाजीला तरी भावी सुखाचें वर्णन प्रत्यक्ष सुखदात्यापासून जर ऐकायला मिळत होतें तर त्याला प्रतिबंध करावा असें कां वाटेल ! अल्लाऊद्दीन ज्या प्रमाणें भावी सौख्याची कल्पनामय रचना करून, तिचें स्वरूप लक्षांत आणून, आनंदसागरांत तो-निर्वीही कल्पनामयच—पोहत होता त्याचप्रमाणें राणाजीही भावी सुखास मोहून गेले होते. असो.

अल्लाऊद्दीनानें आणखी कांहीं वेळ वल्गना केल्या, आणि त्या पत्राचें चुंबन घेऊन तें आपल्या हृदयाजवळ धरिलें आणि राणाजीस म्हणाला " राणाजी, माझ्या मनाला या घटकेस जो कांहीं आनंद होत आहे तो जरी वृद्धिंगतच होत जाणारा आहे तरी सध्यांचा त्याचा उगम मला फारच मजेचा वाटतो. मी आतां जातों. आतांपासून तुमच्या सर्व आपदा अगदीं विलयास गेल्या असें तुह्मी समजा. आणखी थोड्याच वेळानें तुह्मांला मी काय ह्मणतों त्याचें प्रत्यंतर येईल. ज्या गोष्टीची मनापासून आवड, ती प्राप्त झाल्यावर मनाला जो आनंद होतो त्याची कल्पना आप-

णां उभयतांसही सध्यां होत आहे आणि मनाला उल्हास देणारी अशीही तीच आहे ”

राण्यानें ती गोष्ट कबूल केली आणि दिल्लीपतीचे थोर मनाबद्दल आपली कृतज्ञता व्यक्त केली. परंतु अल्लाऊद्दीन ज्यावेळीं त्याची रजा घेऊन जावयास निघाला तेव्हां अगदीं हलक्या आणि नम्रता सुचविणाऱ्या अशा शब्दांनीं तो दिल्लीपतीस ह्मणाला “ प्रभु, तें पुनः एकवार वाचावें अशी मला उत्कंठा आहे आणि ”

अल्लाऊद्दीनानें फारच चपलतेनें तें पत्र त्याचे स्वाधीन करून त्यास ह्मणाला “ राणाजी तुह्मांला उत्कंठा लागावी ही गोष्ट रास्त आहे आणि मला देखील तुमच्या दुप्पट उत्कंठा आहे. अस्मानीमहालांत जाऊन मी ह्याचीं पारायणें करण्याचा विचार केला आहे. वाचा, राणाजी वाचा, मला एकदां कर्णतृप्त करून घेऊंद्या. अगदीं एक अक्षरही सोडूं नका. जरी तुह्मांला सटरफटर मजकुराचें महत्व वाटत नव्हतें तरी मला तो अत्यंत महत्वाचा वाटतो. कारण आनंदनिधीच्या सुखकर लाटांचा उगम करण्यास तो एक प्रकारचा वायु आहे. हं करा आरंभ. जरी मला तुमच्या लिपीचें वास्तविक यथातथ्य सौंदर्य अवगत नाहीं तरी मला हीं अक्षरें फारच मनोल्हादकारक वाटतात कारण कीं, माझी वृत्ती तीं आनंदी करतात. त्यांतील मचकुराचा प्रभावच तसा आहे. ”

अल्लाऊद्दीनानें पराकाष्ठेची उत्कंठा दाखविली इतकी कीं, त्यामुळें तो वेड्यासारखाच इतरांस भासला असता.

राणाजींनी तें पत्र हातांत घेतलें होतेंच. त्या पत्राकडे पाहून ते ह्मणाले " समर्थ दिल्लीपती, जरी आपणां उभयतांसही फारच उत्कंठा आहे तरी अशा प्रकारचे पत्रव्यवहार नेहमीं एकांतातच वाचले पाहिजेत आणि ते देखील फारच सावधगिरीनें. सबब मला हें उघडपणें वाचतां येत नाहीं. "

' अलबत ' अल्लाउद्दीनास ती गोष्ट पटून तो ह्मणाला " नादान मंडळीदेखत आपलीं रहस्यें कधींही वांचू नयेत, उघड करूं नयेत किंवा कोणत्याही प्रकारें तीं व्यक्त होतील असें वर्तन ठेवूं नये असा मला उपदेश मिळालेला आहे. आपल्याला एकांतच पाहिजे आहे आणि आतांच मी बरोबरीच्या सर्वत्रांस बाहेर जाण्यास आज्ञापितों.

इतर मंडळी त्याची आज्ञा होण्याचे आधींच तेथून निघून गेली. एकांत पाहून अल्लाउद्दीन ह्मणाला ' राणाजी, त्या पत्रांतील मजकूर मजकडून ऐकविण्याचा अधिकार आपणांस आहे. कारण तो मजकूर आपल्या मुखांतून निघणें ह्मणजे एकप्रकारची कबूलीच आहे " त्यानें आणखी पुष्कळ बडबड केली.

राणाजी चिंतातुर झाले, कारण इतकावेळ जो अल्लाउद्दीनास उत्साह वाटत होता आणि आनंदनिधीच्या लाटांत जो पोहत होता त्यास किंचित विन्मुख करण्याचें काम त्याला करावयाचें होतें. अर्थात तो अत्यंत क्षुब्ध होईल आणि न जाणो रागाचे आवेशांत आपली इहलोकची यात्रा पुरी करविण्याचेंही श्रेय तोच घेईल. अशी त्यास भीति पडली. परंतु क्रोध विषयी

मनुष्याचे आतुरतेचीं चिन्हें अल्लाउद्दीनाचेठायीं दिसून येतांच भय थोडेसें कमी झालें; तथापि त्याला भीती ही वाटत होतीच, आणि ती अल्लाउद्दीनाचे अविचारीपणाबद्दलच फार होती. त्याला तें कर्तव्य केलेंच पाहीजे होतें, कारण अल्लाउद्दीनानें त्यास लकडा लाविला होता. मजकुरांत कांहीं कमजास्त करणें ह्मणजेही धोक्याचेंच होतें कारण तें पत्र अल्लाउद्दीन दुसऱ्याकडून वाचवीणारच. असो.

राणाजीनीं शेवटीं बोलण्यास प्रारंभ केला. ते ह्मणाले " बलाढ्य दिल्लीपते, माझ्यासारख्या यत्किंचित मनुष्याच्या कन्येवर आपला अनुग्रह होणें हें माझें महत्पुण्यच मी समजतो. आपली अर्धांगी होण्याचें माझ्या जयदेवीचें नशिबीं आहे, हें पाहून मला तिच्या भाग्योदयग्रहांचें मोठें कौतुक वाटतें, आणि हा संबंध जितका लवकर होईल तितका त्वरीत जुळवून आणावा अशी मला फार उत्कंठा आहे. माझी आज्ञाधारी कुमारीही हा संबंध जुळून यावा ह्मणून रात्रंदिवस परमेश्वराची प्रार्थना करीत असेल. कारण संपत्ति, ऐश्वर्यसुख आणि बहुमान इतक्या गोष्टी कोणाला नको आहेत! त्यांतून ज्या समर्थ दिल्लीपतीच्या जनान्यांत आपली धूळ झाडण्याची योग्यता, त्याच जनान्यांतील एक श्रेष्ठ देवी आणि आपल्या सुखदुःखाची वांटेकरीण होण्याचा सुयोग अनायासें जुळून येत असलेला तिला अत्यानंदकारक कां बरं वाटणार नाहीं! राज्ञीपदाची लालसा तिला कां उत्पन्न होणार नाहीं बरं? तिचें मनच तिला पुढें ढकलून येथवर आणील. स्वजातियांपेक्षां मला नृप-

भक्ति अधिक वाटते. दिल्लीपतीचा अनुग्रहच मला पुरे आहे. या सगळ्या गोष्टी जशा मला व्हावयास पाहिजे आहेत तशाच घडून येताहेत. ह्मणजे पर्यायानें माझा भाग्योदय अपाट्यानें होत आहे. मी परमेश्वराचा आणि आपल्या भक्तचा दास आहे, आणि हा आपला अनुग्रह मी फारच मोठा समजतों. परंतु प्रथम मला आपणांजवळून कांहीं मागून घेण्याचें आहे. ह्मणजे मी असंतुष्ट आहे असा भाग नाहीं. परंतु प्रत्यक्ष जयदेवीनेंच आपणापासून जें कांहीं मागून घ्यावें ह्मणून मला आग्रहपूर्वक सुचविलें आहे, तेंच मी मागतों."

**अल्लाऊद्दीन** फारच उतावीळपणानें ह्मणाला " ती परी काय मागत आहे? माझा प्राण तिला अर्पण केला आहे, आणखी तिला काय पाहिजे आहे? सुस्वरूप परीला जास्त शोभणारे असे बहुमोल अलंकार ती मागत आहे काय? राज्ञीपदवैभव तिला प्राप्त होणार सबब तिचा प्रवेशसमारंभही त्याच थाटानें व्हावा ह्मणून सर्व लवाजमा ती मागत आहे काय? अथवा मीच तिला आग्रहानें आणि बहुमानानें घेऊन यावें, अशी तिची इच्छा आहे काय? राणाजी, बोला एकदम. मजसारख्या समर्थ पातशहाचे कलिज्याची इच्छा अपुरी रहाणार आहे काय? बोला बोला, तिची काय इच्छा आहे ती."

" थोड्या अवकाशाकरितां उतावीळ होणारी ती स्त्री नाहीं." राणा ह्मणाला " शिवाय आपण सर्वस्वच जर तिला अर्पण करतां आहां तर यत्किंचित डौलाच्या वस्तूंची ती आपणाजवळ याचना करील काय? नाहीं. **दिल्लीपते**, तिची अशी इच्छा आहे कीं, ज्या कुलांत

आणि धर्मांत, तिचें जनन झालें, त्या कुलाची आणि धर्माची तिला लवकरच अनोळख होणार. स्वकीय आप्तवर्गांना ती दर्शनदुर्लभ होणार, एवढ्याकरितां आपणाशीं संलग्न होण्याचे अगोदर कांहीं दिवस तरी तिनें मजजवळ सभ्यांचे स्थितींत राहून स्वधर्मांतील एकूणएक कृत्यें चालीरितीसंबंधानें मौजा वगैरे एकंदर ज्ञातिकुलधर्माप्रमाणें उपभोगावीं. माझ्यादेखत दानधर्म वगैरे करावे, आणि कांहीं दिवस सद्धर्माचरणांत काढावे. दिल्लीपते, आप्तस्वकीयांचा वियोग मोठा कठीण आहे. माझ्या समजुतीनें तिची इच्छा योग्य आहे. कारण आपणांशीं संलग्न झाल्यावर अर्थात तिला कुलवधूंच्या नियमाप्रमाणें गोप्यांत राहिलें पाहिजे. आणि मग आप्तस्वकीय मंडळीस भेटण्याचे प्रसंग तिला वारंवार यावयाचे नाहींत. धर्मांतर केल्यावर तिनें स्वीकारण्याच्या ज्या ज्या गोष्टी त्या त्या तिला अपरिचीत आणि मनाला किंचीत ओशाळा आणण्यासारख्या असल्याकारणानें माझ्या जयदेवीला स्वकीयांची उघडाउघड लाज वाटेल; आणि आपोआप तिचें दर्शन आह्मांस दुर्लभ होईल. आपण सूज्ञ आहांत असें तिनें लिहिलेंच आहे, आणि खरोखर आपण तसे आहां अशाबद्दल सर्व जग आपल्याला वाहात आहे, तेव्हां जयदेवीची एवढी शेवटची इच्छा—एकप्रकारें, तिच्या पूर्वाश्रमांतील शेवटची पुरवाल, अशी माझी आशा आहे. महाराजी ह्मणवून घेण्यास ती किती उत्सुक आहे, हें पत्रावरून उघड आहेच. शिवाय स्त्रीपुरुषांत परस्परसंबंध जें एकप्रकारचें गुप्त प्रेम वसत असतें, तें तिनें जरी उघडपणें व्यक्त करून दाखविलें नाहीं

तरी पत्राचे रोखावरून आणि तिच्या उत्सुकतेवरून आपणांस कळून आलें असेल. मला त्या संबंधानें उघड बोलतां येत नाहीं. कारण तो माझा अधिकार नव्हे. आपण जाणते आहां, दुसरी एक गोष्ट मला तिचे तर्फेनें सांगावयाची आहे कीं, तिला आपण थोड्या दिवसांची मोकळिक दिल्यास क्षात्रधर्मांतील आज्ञेप्रमाणें आणि आमच्या रिवाजाप्रमाणें तिला मुद्तींत आपणांस भेटतां येणार नाहीं. आपण थोर आहांत, विचारी आहांत, आणि जरी अति उतावीळतेनें आपणांस अस्वस्थ करून सोडलें आहे, तरी विवेकानें आपण आह्मांस इतकी मोकळिक द्याल, अशी माझी पक्की खात्री असल्यामुळेंच मी मनांतील गोष्ट एकदम आपणांस सांगितली. शिवाय आपल्या सौजन्यामुळेंच मला आपणांपाशीं एवढी विनंति करण्यास धीर आला."

अल्लाउद्दीन, राण्याचें बोलणें अगदीं लक्ष लावून ऐकत होता. राण्यानें केलेली स्तुति जरी त्यास मनापासून आवडली तरी बाह्यात्कारी कांहीं न दाखवितां तो ह्मणाला " राणाजी माझ्या तोंडावर माझी कोणी स्तुति केलेली खपत नाहीं. कबूल, तिचें ह्मणणें अगदीं रास्त आहे. तथापि हें बोलणें तिनें स्वतः मजजवळ केलें पाहीजे. मी मोठ्या आनंदानें तिला मोकळिक देईन."

" तर मग नाइलाजाची गोष्ट आहे. मी आपणांस आधींच सांगितलें आहे कीं, रजपूतांचे उपवर मुलीस तुह्मांबरोबर उघड भाषण करतां येणें शक्य नाहीं," राणा ह्मणाला.

" कां बरं? तिला मी अभय देऊन वचन दिल्या-वर देखील तिला भीति वाटेल काय? उघडपणें तिनें माझ्याशीं बोलावें, असें माझें ह्मणणें नाहीं. एकांत अशा ठिकाणींच मी तिचें बोलणें ऐकेन. जर ती माझी आहे, आणि जर मनापासून ती माझ्याशीं शादी करण्याची इच्छा धरीत असेल, तर ती वास्तविक माझ्या भेटीची उत्सुकता धारण करून बसली असली पाहिजे; " अल्लाउद्दीन ह्मणाला.

" पाशा आतां नाइलाजच झाला. दिल्लीपते, पण तिची विनंति काय आहे, हें आपण नीट समजून घेत-ल्याशिवाय—"

" चुप्प, अपमान होत आहे. नादान! तूं मला ही आपल्यासारखा दिवाणा समजतोस काय! अलबत, तिनें माझ्याजवळच स्वतः येऊन विनंति केली पाहिजे. तूं समजत असशील तर मी तिला उद्यांचे उद्यां येथें आणविलीं पाहिजे तर. एका तोफेनें जेसलमीराचा धुव्वा उडवून तुझ्या पोरीला निव्वळ फरफटत येथें आणविण्याची माझी ताकद आहे; सम-जलास! पण मला तसें कर्तव्य नाहीं. माझ्या मनांत इतका सुविचार आहे, मी तुझ्याप्रमाणें अविचारी नाहीं, हें ओळखून माझे तूं आभार मानिले पाहिजेत. जास्त बोलण्याची गरज नाहीं. बोल, तुझी कारटी बऱ्या बोलानें येथें येते आहे कीं नाहीं? बस्स! आज तूं पत्र आतांच्या आतां लिही, आणि तिला कळव कीं, उद्यां सूर्योदयाचे आंत जर तूं दिल्लीस न येशील तर

तुझा बाप तुला अंतरला असें समज." अल्लाउद्दीन रागानें ह्मणाला.

तावडतोब राण्याचा चेहरा उतरला. तो दीनस्वरानें ह्मणाला "प्रभो ही मुदत अगदीं थोडी आहे. आपला हुकूम तिला पोंचण्याचे पूर्वी सूर्योदय होईल."

"नादान, जीभ छाटली जाईल. लक्षांत धर. आतांचे आतां पत्र लिही. सूर्योदय होत नाहीं," अल्लाउद्दीन ओरडून ह्मणाला.

"सार्वभौमा, आपला अंमल पंचमहाभूतांवर देखील आहे, हें मी जाणतों परंतु सूर्योदयापर्यंत वेळ कितीसा पुरणार," राणा कांहीं तरी बोलला.

पण तितक्यांतल्या स्तुतीचा भाग अल्लाउद्दीनास प्रिय वाटला आणि तो शांत होऊन ह्मणाला "राणाजी सगळ्या गोष्टी एका बाजूस राहूंद्या; मी तुह्मांस स्वदस्तुरचें एक मोहोरबंद खत देतों, तें तुह्मीं तिजकडे पाठवून द्या, आणि तिला लवकर पाचारण करा. केवळ तुमच्या बोलण्यावर विश्वास ठेऊन तुह्मांला आणि तुमच्या लाडक्या पोरीला आठ दिवसांची मुदत देतों. येथें आल्यादिवसांपासून आठ दिवसपर्यंत तिनें आपणाजवळ दिवस काढावेत. येथें येतानां किंवा येथें राहिल्यावर जो कोणी तुह्मांस प्रतिबंध करील त्यास माझें खत दाखवा, ह्मणजे तुह्मांला कोणीही कोणत्याही प्रकारचा उपसर्ग करणार नाहीं"

राण्याचा जीव जरा स्थिरावला, तो ह्मणाला "आज्ञामान्य, परंतु आठ दिवसांची मुदत ही अगदीं थोडी अशी आपल्या बंद्याला वाटते"

" राणाजी तुम्ही अगदीं वेडे आहांत. अहो, आठ दिवस तरी माझ्यामतें फार आहेत. जास्त मुदत तर माझ्याकडून मिळणें नाहींच, परंतु माझी आज्ञा तुम्हीं मानली पाहीजे; ती ही कीं, निदान ती येथें आल्यावर तिची माझी नजरानजर झाली पाहीजे. भेटीचा योग जुळवून आणणें हें काम तुम्हांला अवघड नाहीं. आणि मी ह्मणतों कीं, जरी तें अवघड आहे असें वाटेल, तरी तें तुम्हीं केलेंच पाहीजे." अलाऊद्दीन ह्मणाला.

राणा विचारांत पडलेला पाहून तो ह्मणाला" ती माझी आहे. माझा तिच्यावर हक्क आहे, आणि ह्मणून तिजसंबंधानें मला पूर्वींच विचार केला पाहिजे. तुमची ज्ञातीची कांहीं अडचण पुढें आणाल तर त्याबद्दल मला काळजी नाहीं आणि तिलाही काळजी करण्याचें कांहीं कारण नाहीं. कारण तिला धर्मांतर करणेंचें आहे."

राणाजींना कांहींच उत्तर देतां येईना.

· अलाउद्दीन ह्मणाला " तुम्हांला हें काम अडचणीचें आणि अवघड वाटत आहे असें दिसतें. तर मग ठीक आहे. तिनें परभारें अम्मानी महालांत यावें, आणि शादी झाल्यावर मग चाहील तर तुमच्या भेटीला यावें, अशीच मी व्यवस्था करीन. तुमच्या हरएक सवलती मी कबूल करावया असा कांहीं मी बांधलेला नाहीं, अथवा मी तुमचा बंदा नाहीं. चाहील तें करण्यास मला मुभा आहे, एखाद्या दिवाण्याप्रमाणें तुम्हीं मला गणून माझी थट्टा करीत आहां, हें पाहून मी वास्तवीक तुम्हांला गयकरतों हेंच गर आहे." त्याचे डोळे आणि चेहरा आरक्त झाला, आणि पुनः तो को·

पोंचीन माला असल्याचें राण्यानें ओळखलें.

राणा ह्मणाला " माफी, भूपते माफी असावी. खरोखरी माझें मत आपल्याशीं जुळतें असें आहे. माझे हृदयांत काय आहे, आपणाबद्दल कितपत पूज्य बुद्धी माझे ठिकाणीं वसते आहे, हें मला हृदय उघडून दाखवितां येत नाहीं ह्मणून नाइलाज आहे. परंतु मला तिचीच फार भीति वाटते. ती कबूल किंवा नाहीं हें मी आतां सांगावें कसें ! "

" तिनें कबूल केलेंच पाहिजे. नाहीं पेक्षां तिला कबूल करवणें हें काम तुमचें आहे. मी तुह्मांला ओळखतों आणि जबाबदारीही तुमच्यावर आहे असें मी समजतों. तुमच्या आंगांत कितकें कसब आहे, हेंही मी जाणतों पोरीची मिजास मजजवळ दाखविण्यास शरम वाटली पाहिजे आहे. " अल्लाउद्दीन हांसून ह्मणाला.

" माझ्याकडून होईल तितकें करून " राणा पुढें बोलणार तोंच अल्लाऊद्दीन गर्जून ह्मणाला, " खबरदार, विनाकारण जर कांहीं हजार बयादी पुढें आणाल तर, खूप याद राखून रहा. " इतकें ह्मणून तो तेथून पार निघून गेला.

जातेवेळची त्याची क्रुद्ध मुद्रा राण्याचे दृष्टीस पडली होती. त्यामुळें तो अतिशय घाबरून गेला. परंतु त्याचे हातून काय होणार होतें ? समर्थाचे पुढें कोणी बोलावें ! असें ह्मणून तो विचार करण्याचें सोडून पुढें जें काय होईल तें निमूटपणें सोसण्यास तयार झाला.

थोड्याच वेळानें पातशहाकडील एक मनुष्य मोहो-

रबंद लखोटा घेऊन आला. राण्यानें तें ओळखलें आणि तावडतोब एक पत्र लिहून त्याच जामूदाबरोबर तें रवाना केलें. अत्यंत चपलगतीनें जेसलमिरास जाण्यास त्यास हुकूम झाला होता, त्याप्रमाणें राण्यानें पत्र दिल्याबरोबर तें व पानशहाकडील मोहोरबंद लखोटा बरोबर घेऊन तो जासूद विद्युद्गतीनें जेसलमीराकडे वळला.

---

## भाग १२ वा.

चातकपक्षाप्रमाणें निरंतर उत्तराची वाट पहात असलेल्या जयदेवीला दिल्लीहून येत असलेला जासूद पाहून किती आनंद वाटला असेल? तो दिल्लीहूनच आलेला आहे हें जाणण्यास अनेक साधनें होतीं, आणि तो जयदेवीचाच शोध करीत तिच्याच ठिकाणाच्या रोखावर येत होता.

तो आल्यावर त्याने हातचा लखोटा एका नोकरानें घेऊन आंत जयपाळ बसला होता त्याचे स्वाधीन केला. जयपाळ, राण्याकडे चिठी पाठविल्या दिवसापासून, बराच अस्वस्थ झाला होता. त्यानें जो बेत केला होता तो कायमच होता, परंतु तो कितपत साध्य होईल ह्यासंबंधीं त्यास फार काळजी वाटत होती. बलवानाशीं स्पर्धा करणें ती जरी तयारीनेंच केली पाहिजे असे विचार वरचेवर त्याचे मनांत उद्भवून

त्यास गोंधळवीत असत. तरी त्याचा बेतमात्र ढळण्या- सारखा नव्हता. पहिला आणि शेवटचा प्रयत्न एवढाच. याच प्रसंगीं मोक्ष किंवा मोक्ष कोणतेंही लाभो, असें त्यानें मनांशीं ठरवून आपले अनुयायांसही त्याचप्रमाणें उपदेशीलें होतें.

त्यानें ती चिठी वाचली. बरोबर असलेला मोहोर- बंद लखोटा फोडण्याची त्यास अवश्यकताच नव्हती. चिठी वाचतांच तावडतोब ती जयदेवीस वाचून दाखवून तिच्या अनुमतानें उत्तरादाखल एक उलट चिठी लिहिली, आणि जासूदास परत लाविलें. तो जासूद निघून गेल्यावर त्या उभयतांचें फारच थोडावेळ संभाषण झालें, आणि जयपाळ बाहेर निघून गेला.

जयदेवीचे मुखावर प्रफुल्लितता आली होती, आणि तिची मुद्रा आनंदी दिसत होती. पित्याचे दर्शनास ती उत्सुक झाली होती, आणि त्या उत्सुकते- पुढें तिला भावी दुःखाची कल्पनाच होत नव्हती. तिच्या मनांत दुसरे विचारांस जागाच नव्हती. तिला पुढील सुखाचे भाग तेवढे दिसत होते. ज- यपाळाचे तयारीविषयीं, त्याचे सामर्थ्याविषयीं आणि कुशलतेविषयीं तिला पक्का भरंवसा वाटत होता, आणि म्हणूनच बापाची सुटका खा- त्रीनें होणार असें तिनें ठरविलेंच होतें. त्याची मुक्तता झाल्यावर त्यानें दर्शविलेले आभार ऐकून जयपाळास किती आनंद होईल, आपल्या मसलती विषयीं जयपाळास आदरबुद्धि वाटून आपणावर त्याचें प्रेम कितीतरी पटीनें अधीक वाढेल, आणि

आमचें प्रेमबद्ध आणि शुद्ध आचरण पाहून राण्यास किती आनंद होईल, तो परमेश्वराचे आणि जयपाळा-चे किती आभार मानील, आणि आपल्या पितृभक्तीब-द्दल तो किती प्रेमाचे उद्गार काढील इत्यादि गोष्टीच तिच्या मनांत खेळत होत्या. ती विचारांत-मात्री मुखा-च्या-तों जयपाळ तिजजवळ आला, आणि जरा मोठ्या आवाजानें म्हणाला, " बेत ठरला ? निघण्याची तयारी अगदीं आतांच करायची काय ?

जयदेवीनें त्याचे चेहऱ्याकडे पाहिलें तों तो अति-उग्र दिसला. तिनें उत्तर दिलें " माझ्या शब्दांची कांहीं अवश्यता नाहीं, तरी पण त्वरा होईल तितकी श्रेयस्करच आहे "

जयपाळाची मुद्रा जरी उग्र दिसत होती, तरी सूक्ष्म दृष्टीनें त्याचेकडे पाहणारांस तीवर काळजीची छाया दिसून आली असती. त्याचें मन अस्वस्थ अस-ल्याचेंही दिसून आलें असतें. तो म्हणाला " केवळ तुझ्याच बोलण्यावर आम्ही अवलंबून रहाणार नाहीं, सध्यां आहीं या घटकेस देखील निघण्याचा हुकूम आह्मांस मान्य आहे. "

जयपाळाचें बोलणें नेहमीप्रमाणें स्पष्ट आणि नि-र्मळभावाचें नसून टोंचून बोलण्याचा त्याचा विचार आहे, ही गोष्ट जयदेवीचे मनांत ताबडतोब आली. ती म्हणा-ली " ज्यांचेवर जबाबदारी आहे, त्यानींच घटकेचें मान ठरविलें पाहिजे. तयारी असल्यास एक घटकेचा तरी विलंब कशाला ? "

" मग, करा तयारी निघण्याची. आमच्याकडून

कबूली. जरी आह्मीं जबाबदारी आमचे शिरावर घे-
तली आहे, तरी उत्सुकता आह्मांला कच्च्या तयारीनें
बाहेर पडा असें सांगत नाहीं. " जयपाळ ह्मणाला.

तें मर्मच्छेदी भाषण जयदेवीस दुःसह झालें, आणि
ती रागानें लाल झाली. तथापि ती एवढेंच ह्मणाली " माझी
उत्सुकता खात्रीनें कोणाच्याही आड येणार नाहीं.
आणि कमतयारीनें दिल्लीस जावें असे माझे शब्द क-
धींही निघालेले नाहींत. तथापि माझेवरच दोष ठेऊन
पुढील कार्यास हात घालणें असेल तर तसें करण्यास
मात्र माझी नाखुषी आहे. माझा शब्द जमेस धरून
कमकुवतपणें जाण्याची बिलकूल जरुरी नाहीं. "

जयपाळानें ओंठावर आलेले आवेशयुक्त शब्द
मागें घेतले आणि एक क्षणभर थांबून तो ह्मणाला
" जयदेवी, रागावण्यानें कांहीं कारण नाहीं. माझें मन
अद्याप मला माझ्या सामर्थ्याविषयीं भरंवसा देत नाहीं.
एवढ्यावरून माझें मन कचरत आहे. आणि केवळ
तुह्मी उत्सुकताच जास्त ह्मणून मी आज निघण्याचा
विचार केला आहे. "

जयदेवीही कांहींशी शांत झाली. ती ह्मणाली
" ही गोष्ट खरी आहे कीं, जर स्वतःची खात्री ना-
हीं तर कोणत्याही कार्यास हात घालूं नये, पण आज-
मितीस आपल्या सामर्थ्याकडे हा सिद्धांत लावण्याचा
प्रयत्न करणें व्यर्थ आहे, कारण सामर्थ्यवान अल्ला-
ऊद्दीनाशी सामर्थ्यानेंच स्पर्धा करण्याचे आपले प्रयत्न
कधींही सिद्धीस जाणार नाहींत. आपलें सामर्थ्य किती-
ही वाढविलें तरी त्याच्याशीं टक्कर देण्याइतकें साम-

र्व अंगीं येण्यास फारच अवधी लागणार आहे. परंतु सामर्थ्याची दिशा सोडून आपला बेत जो आपण"—

जयपाळ पुरता शांत झाला. तो तिला थांबवून म्हणाला " होय ह्या गोष्टी मला कळतात. तथापि केवळ तुलाच फार उतावीळता आहे. नाहींपेक्षां आणखी जास्त तयारी होती आणि जितक्या प्रमाणानें सामर्थ्य जास्त तितक्या प्रमाणानें तें जास्त उपयोगी पडतें. असो. तुझ्या उत्साहाचा भंग करणें गैर वाजवी आहे. अगदीं आज संध्याकाळींच येथून कुच केलें पाहिजे. प्रिये, जेसलमीरच्या सीमेचें दर्शन घेऊन आणि एकलिंगजीचा आशीर्वाद घेऊन आज रात्रीचा मुक्काम बाहेर झालाच पाहिजे "

" परंतु माझा आग्रह म्हणून नव्हे हो " जयदेवी म्हणाली.

जयदेवीचे शब्द कानीं पडले असतील नसतील तोंच जयपाळ पार निघून गेला. तिच्या मनांतून आणखी कांहीं बोलावयाचें होतें परंतु तिचा नाइलाज झाला. जयपाळाचे मर्मच्छेदि शब्द अद्याप तिला टोंचीत होते आणि साधारण स्त्री स्वभावानुसार तिचे डोळ्यांस पाणी आलें. जयपाळ ज्यापक्षीं पुढील कार्यासंबंधीं उदासीनता दाखवीत आहे त्यापक्षीं आपल्यावरच अपयशाचें खापर फुटणार कीं काय, अशी तिला शंका वाटली. परंतु त्या शंकेचें निरसन लगेच झालें. त्याचा स्वभावच असा भीरू म्हणून तिनें आपल्या मनाचें सांत्वन केलें. तिला त्याचे शूरत्वाविषयीं खात्री होती तथापि कोणत्याही गोष्टीत पडण्याचे प्रारंभीं त्याचें मन

सार्थक होत असतें, आणि त्याला भर देऊन अथवा त्वेष आणून त्याजकडून कोणत्याही कृत्यास प्रारंभ करविल्याखेरीज तोहोऊन कांहींएक करणार नाहीं असें त्याच्या स्वभावाचें एक अंग असल्याचें तिचे लक्षांत आलें.

ह्या विचार तिचे लक्षांत येतांच तिची मुद्रा पुनः आनंदी झाली आणि ती निघण्याचे तयारीस लागली.

त्यांच्या दिल्लीस जाण्यासंबंधानें अनेक कंड्या गांवांत उठल्या होत्या आणि त्यांची तयारी होतांच कांहींजण तर उघड ह्मणूं लागले कीं, दिल्लीपतीची राज्ञी राजधानीस जावयास निघाली. उभयतांनीं सर्व तयारी बरोबर झाली असें पाहून सुमूहुर्तावर घर सोडलें. एकलिंगजींचें दर्शन घेतलें. विप्रजनांचा अनुग्रह संपादन केला आणि सीमेवर आलीं. ठरल्याप्रमाणें त्यांचें अनुयायीमंडळ सीमेवर त्यांची वाट पहात होतें-च. सर्वत्रांनीं सीमेवर बसून तेथील दैवताची पूजा केली, प्रसाद घेतला आणि पुनः परत येण्याबद्दल आशीर्वाद घेऊन सर्वांनीं कुच केलें. जसलमीर सोडतांना जयदेवीपेक्षां जयपाळास फार वाईट वाटलें.

प्रवासांत ह्मणण्यासारखे त्यांचे कांहीं हाल झाले नाहींत. परंतु मनाची स्वस्थता-विशेषतः जयपाळाची-भंग होण्यास अनेक कारणें मार्गांत घडून आलीं. अपशकुनासंबंधानें त्याकाळीं विश्वास फार दृढ असे आणि अपशकुनांचा प्रत्यय हटकून येतोच असा सर्वत्र समज असे. असे अपशकुन मार्गांत बरेच झाले आणि त्यायोगें संशयी जयपाळाला फारच अस्वस्थता उत्प-

न झाली. थोड्याबहुतप्रमाणानें जयदेवीनें त्याला धीर देऊन अस्वस्थतेचा मोड करण्याचा प्रयत्न केला परंतु त्याच्या मनानें जें घेतलें होतें तेंच खरें; असो.

दिल्लीपासून थोड्याच अंतरावर एकरात्र मुक्काम करून जयपाळानें एक चिठी पुढें राण्यास पाठविली. प्रातःकाळ होतांच ते दिल्लीजवळ जवळ आले. ही मंडळी येणार ही बातमी अगाऊ सर्वांस कळलीच होती. अल्लाऊद्दीन तर त्यांची वाटच पहात होता. ती मंडळी प्रथम राण्याचे ठिकाणींच जाणार असल्याचें कळलें होतें आणि तसें ठरलेंही होतें. तेव्हां जरी अल्लाऊद्दीन उतावीळ झाला होता तरी त्यानें आपलें मन आंवरलें. फक्त ती मंडळी आली किंवा नाहीं, इतकी बातमी कळण्याची त्यानें व्यवस्था केली होती.

प्रहर दिवसाचे सुमारास जयपाळ आणि जयदेवी आपल्या अनुयायांसह राण्याचे ठिकाणासन्निध आलीं. त्यांचा थाट विलक्षण होता, आणि तो येथें सांगणें अवश्य आहे. अग्रभागीं पांच हत्यारबंद घोडेस्वार असून त्यांचे मागें कांहीं मेणे होते. प्रत्येक मेणा चार-चार भोयांनीं उचललेला असून त्यांचा पोषाख अस्सल शिपाईबाण्याचा होता. त्यांमागून जयपाळ हा एका उमद्या घोड्यावर स्वार होऊन चालला होता आणि त्याचे संरक्षक पांच असामी घोडेस्वार त्याचे बाजूंनीं चालले होते. त्याचे मागून शंपन्नास मेणे असून त्या मेण्याचे भोयांचा पोषाखही एकसारखाच होता. सर्वांचे मागून एक दहा असामींची टोळी होती. सर्व हत्यारबंद होते. भोईलोकांजवळ देखील हत्यारें होतीं. त्यां-

चे स्वाधीन हत्यारें असण्याचा मतलब कांहीं नव्हता. फक्त हौस! असो.

ही मंडळी राण्याचे ठिकाणाजवळ येतांच बाहेरील रखवालदारानें त्यांनां प्रतिबंध केला. जयपाळ तावडतोब पुढें झाला आणि पातशहाकडील मोहोरबंद लखोटा त्या रखवालदारास देऊन त्याची परवानगी घेतली. त्या रखवालदारानें तें खत—हुकूम—वाचतांच त्या मंडळीस मोठ्या सन्मानानें मार्ग दिला आणि आपण घोड्यावर स्वार होऊन शहराकडे वळला.

ही मंडळी आंत प्रवेश करीत होती परंतु जयपाळाचें लक्ष त्या रखवालदाराकडे होतें. तो शहाराकडे वळला असें पाहतांच जयपाळानें आपल्या उमद्या घोड्यास टांच मारली. त्यासरशीं तो तिरासारखा उडाला आणि अगदीं थोड्याच अवकाशांत जयपाळानें त्या रखवालदारास गांठला. रखवालदारानें मार्गे वळून पाहिलें आणि आपला घोडा उभा केला. मोठ्या सन्मानानें त्यानें पाठलाग करण्याचें कारण विचारिलें, परंतु त्याला उत्तर तीक्ष्ण तरवारीनेंच मिळालें. त्याला छाटून जयपाळानें आपला घोडा मार्गे फिरविला. परत येऊन पाहतो तों सर्व मंडळींचा आंत प्रवेश झाला असून संकेताप्रमाणें नियमीत मंडळी बाहेर उभी आहे.

जयपाळ आंत शिरला. राण्याची त्यानें भेट घेतली. परंतु त्याचे जवळ बिलकूल भाषण न करतां तो तेथून परतला, आणि जयदेवीला राण्याजवळ नेऊन सोडलें. जयपाळ बाहेर आला. राण्यानें सप्रेम जयदेवीकडे पाहिलें आणि त्याचे नेत्रांत प्रेमाश्रूंचें भरतें

आलें. जयदेवीचाही कंठ सद्गदीत झाला आणि राण्याची दुःस्थिति अवलोकन करून तिला अत्यंत वाईट वाटलें. थोडावेळ पर्यंत तीं दोघें एकमेकांकडे पहात होतीं. विवाहित जयदेवीला, जरी तिला आनंदाचें भरतें आलें होतें तरी, बापाजवळ जाण्याचें धैर्य होईना. बापानेंही तिला स्पर्श केला नाही. तिनें " राणाजी असें ह्मणून कांहीं बोलण्याचा यत्न केला परंतु तिचा कंठ दाटून आल्याकारणानें तिला पुढें बोलवेना. एकाच वेळीं तिला आनंद आणि दुःख वाटलें. भेटीचा योग हा आनंदाला कारण आणि राण्याची दुस्थिति आणि कृश शरीर हीं मनाला दुःख देण्याला कारणें झालीं.

राण्याचीही स्थिती तीच झाली. किंबहुना जास्तच. कारण तिचें येण्याचें कारण लक्षांत येतांच त्याला बेमुमार वाईट वाटलें आणि धड जयदेवीकडे पाहण्याचीही त्यास लाज वाटूं लागली. त्यानें मान फिरविली. त्याचे डोळ्यांतून सारखा जलप्रवाह सुरू झाला. आणि मन तर त्यास खाऊं लागलें. स्वतःची अधमता त्यास वाटूं लागली. त्याचें हृदय विदीर्ण झाल्याप्रमाणें झालें आणि त्याच ठिकाणीं आत्महत्या करावी असें त्यास वाटलें.

जयदेवीनें त्याची स्थिती पाहिल्याबरोबर डोळ्यांत आसवें आणून ती ह्मणाली " राणाजी, जयदेवी आपल्या दृष्टीसमोर नसावीशी आपणास वाटते काय ? "

जयदेवीच्या शब्दांनीं तर राणाजीच्या हृदयाचे

तुकडे झाले. तिला काय उत्तर द्यावें हें त्याला सुचेना. कांहीं वेळानें तोंड झांकून घेऊन तो तिला ह्मणाला " बाळे तुझ्या आगमनाचें मी सौख्य मानूं कां दुःख मानूं हेंच मला कळत नाहीं. "

जयदेवी घाबरली. ती रडक्या आणि घाबऱ्या स्वरानें ह्मणाली " राणाजी मी इतकी कृतघ्न आहे असं आपणांस वाटतं काय ? " हाय! हाय!! माझ्या पितृभक्तीबद्दल आपण संशय घेत आहां तर ?

" नाहीं नाहीं जयदेवी नाहीं. मलाच शरम वाटत आहे. तुला मी बाळे ह्मणून हाक तरी कशी मारावी? तुझा सर्वस्वी नाश– " अनोनात दुःख होऊन राण्याच्यानें पुढें बोलवेना इतकेंच नाहीं पण तो खालीं बसला.

" राणाजी आपलीच जयदेवी मी. माझ्याचकरितां आपले हाल झाले, मीं आपली क्षमा मागतें. आपल्याच सुटकेची तजवीज करण्याकरितां आह्मीं येथें आलों आहों " सद्गदित कंठानें जयदेवी ह्मणाली.

" माझी सुटका! जयदेवी नको माझ्या सुटकेची तूं खटपट करूं. मला खितपत मरूं दे. कुलकलंकी राणा ह्मणून सर्वत्र माझा डंका वाजेल. नर्कवास मला भोगावा लागेल. हाय हाय! तें दुःख नको. बाळे मी तुला भेटलों. तुला मी डोळेभरून पाहिलें. आतां माझें दुःख हलकें झालें. तूं जा. उभयतां सुखानें नांदा आणि मला पाप्याला येथेंच खितपत पडूं दे. अरे अधमा रतनसिंगा, स्वतःचे मुलीची—छेः—छेः माझे शरीराला आणि आंत आंत अगदीं हृदयांत अपकीर्तीच्या वेदना

होत आहेत. विषारी सर्पाचा दंश शीतकर असेल पण— " असें म्हणून राणा बडबडूं लागला, त्याला अतोनात दुःख झालें.

जयदेवीची देखील तीच स्थिती झाली. ती मटकन खालीं बसली आणि मुखेंदु झांकून घेऊन रडूं लागली.

राण्याची बडबड सुरू झाली. तो म्हणाला " बाळे, जयपाळाला इकडे बोलाव. तुम्हां उभयतांनां एकत्र पाहूंदे. मला काय सांगयाचें तें मी त्याजपाशीं सांगेन. तुम्ही मजकरितां व्यर्थ पाशांत पडूं नका. जयदेवी, बाळे, तो मांग आला तर काय होईल? अरेरेरे सगळें ब्रह्मांड त्याच्यावर कोसळून तो मार्गांतच गतप्राण होवो. तो दुष्ट यायच्या अगोदर तुम्हीं निघून जा. त्याचा राग मी सोशीन. मी सुखानें त्याला प्राण अर्पण करीन. शीलासाठीं मी प्राणाचीही महति बाळगणार नाहीं. बाळे, त्वरा कर. होईल तितकी त्वरा कर, जा. जयपाळाला येथें बोलाव. "

जयदेवीनें भाषणही केलें नाहीं, आणि ती जागची हाललीही नाहीं.

राणा पुनः म्हणाला " पितृहत्येचें पातक स्वीकारावें लागेल असें तुला वाटतें कां? नाहीं. तुला बिलकूल दोष नाहीं. नेकीनें तूं वर्तणूक ठेवलीस म्हणून उलट तुझी चहा होईल. मी तुझा पिता छे छे. हा कुळांगार, त्या मांगाच्या शब्दाला भुलला. ललाला भ्याला; आणि कीर्तीवर लाथ मारण्यास राजी झाला. हा तुझा पिता कसा!!! नाहीं, नाहीं तूं सत्वशील आहेस ही गोष्ट खरी. पितृवचनास तूं मान देऊन येथें आलीस हें तूं

कर्तव्य केलेंस. आतां माझी आज्ञा पुनः तुला अशी आहे की, तूं जा, जलदी जा. अनमान करूं नकोस. त्या मांगाचे दूत वातसंचारी आहेत. त्याला बातमी लागलीच असेल. तो एखाद्या क्षुधित लांडग्यासारखा येईल पहा. त्याचे आधीं तूं जा. तो तुझी अवहेलना करील, मला नर्कांत पोंचवील आणि जयपाळाला दुखवील." ती हलत नाहीं असें पाहून तो पुढें ह्मणाला "अग वज्रहृदयी जयदेवी, माझ्या बोलण्याचा परिणाम तुजवर होत नाहीं कां! ऊठ, ऊठ पळ धांव मार. जीव, अब्रू आणि कीर्ति बचाव. निघ. त्याला जी उकळी आली त्यासरशी तो उठला आणि जयदेवीचा हात धरून रागानें ह्मणाला "तूं जात नाहींस! एकट्या बापाकरितां तुला तुझा पति, कुलशील आणि कीर्ति ह्यासर्वांस आग लावावीशी वाटतें कां? जा लवकर, मला भेटलीस पुष्कळ झालें, त्या नीचाबरोबर शादी करण्यासाठीं नाहीं तुला माझ्या कुळांत जन्म दिला. धर्मांतर करण्यासाठीं कांहीं तुझा जन्म झाला नाहीं. जनान्यांतील सुखाची अपेक्षा धरण्याची तुला गरज नाहीं. निघ" इतकें ह्मणून त्यानें तिला ढकलली.

तिची स्थिती चमत्कारिकच झाली होती. तिच्यानें तेथून हालवेना किंवा बोलवेना. तो इतका बोलत होता तरी, तिला त्यांतलें कांहीं एक उमजत नव्हतें, अशी तिची दशा झाली होती. स्फुंदून स्फुंदून तिचें मुख आरक्त झालें होतें, आणि अश्रू श्रावानें वसन आर्द्र झालें होतें. तिला ढकलली तरी, ती दुसऱ्या जागीं बसली, आणि दुःखातस्वरानें "राणाजी"

इतकेंच म्हणून रडूं लागली. जयदेवीसारख्या विचारी स्त्रीची अशी स्थिती होणें म्हणजे आश्चर्यच. बापाचा बदललेला विचार पाहून तिनें मनाला आंवरून उद्देश कळवावयाचा होता; म्हणजे राण्यालाही कांहीं समाधान झालें असतें, आणि त्यांनेंही कांहीं उपाय योजिले असते. परंतु, ती देहभानच विसरल्यासारखी झाली, तेथें काय इलाज !

राण्याला मात्र त्यावेळीं खरा पश्चाताप झाला होता. मग तो क्षणिक असो किंवा कसाही असो, परंतु त्याचें म्हणणें रास्त होतें. ती तेथेंच बसलेली पाहून आणि अमोल वेळ व्यर्थ दवडीत आहे असें पाहून राण्याला बराच राग आला. त्या रागाचे भरांत तो तिच्या आंगावर धांवून गेला आणि म्हणाला " अग पाषाणमूर्ते, मी जें तुला सांगतों आहे तें व्यर्थ नको समजूं. जी वेळ तूं व्यर्थ गमावीत आहेस ती फार मौल्यवान आहे. नीट डोळे उघड, नाहीतर पुरती फशीं पडशील. त्या मांगाची नजर एकदां पडली कीं, मग तुझा सत्यानाश होईल. मी कांहीं झालें तरी देहाला मुकणारच, पण विनाकारण हयगयीनें तूं आपल्या पतीचा, कीर्तीचा, अब्रूचा, कुलाचा, शीलाचा आणि स्वधर्माचा खून मात्र करून बेशील ! ऊठ. ऊठ. "

तरी ती जागींच चिकटलेली पाहून त्यास त्वेष चढला. " तूंच कुलांगार आहेस, मानभावीपणा दाखवून राणीपद पटकावण्याचा हा तुझा कावा आहे. माझ्या कुलाचा विध्वंस करून आपल्या पतिकडील आणि माझ्या एकंदर पूर्वजांना नर्की लोटण्याचा तुझा बेत

आहे. मला आतां करून चुकलें. बेहेत्तर पातक लागलें तर" असें ह्मणून त्यानें तिचा मोक्ष करण्याचे इरायानें हस्तप्रहार करण्याकरितां हात उगारला. तो ज्या स्थितींत होता त्या स्थितींत त्याचा हात हत्यारासाठीं कमरेकडे जाणें अशक्य होतें, कारण त्याची आठवण पार गेली होती. शिवाय तो निःशस्त्र असे. इतर साधनें आयतेवेळीं न दिसावींत हें आश्चर्य वाटण्याजोगें जरी आहे तरी साहजिकही आहे. वास्तवीक त्वेषाचे वेळी जन्मस्वभावाबरहुकूम त्याचा हात शस्त्रासाठीं कमरेकडे जाणें योग्य होतें. कारण बहुशः रजपूत लोक अहर्निश शस्त्रास्त्रांनीं वेष्टीलेले असतात. परंतु हस्तप्रहारानींच तिचा मोक्ष होईल ही खात्री त्यास त्यावेळीं असेल किंवा तसा विचार मनांत आला असेल. एकंदरींत त्याचे हस्तप्रहारानें जयदेवीसारख्या नाजूकतनुस्त्रीचा मोक्ष होण्यास विलंब लागला नसता. असो.

त्यानें हात उगारतांच जयपाळ तेथें आला आणि दोघांचे मधें होऊन तो राण्यास ह्मणाला "आटपा, जल्दी पाय काढा, वेळ दवडणें ह्मणजे अरिष्टाला पाचारण करणें आहे."

राण्यानें क्रोध आवरला आणि विस्मय दर्शक मुद्रा करून तो जयपाळाकडे पाहूं लागला. जयपाळाचे बोलण्याचा अर्थ त्याचे लक्षांत आला नाहीं.

जयदेवी मात्र त्या शब्दांनीं सावध झाली आणि अत्यंत उत्सुकतेनें तिनें विचारलें "काम सगळं फत्ते"

"होय. इतकेंच बस्स आहे. आटपा. राणाजी

दरवाजा मोकळा आहे. विद्युत्वेगेनें आपणांस पाय काढला पाहिजे " जयपाळानें घाईनें म्हटलें.

जयदेवी उठली आणि राण्यास म्हणाली " झालं आपलं काम झालं. राणाजी चला आतां. विलंब बिलकूल उपयोगी नाहीं "

राणाजीच्या लक्षांत सर्व आलें. आनंदोद्गार काढून तो म्हणाला " काय माझी सुटका झाली! आपणाला कोणी प्रतिबंध करणार नाहीं! खैर झाली. जयपाळजी आपण शिताफी केलीत. चला "

तिघें बाहेर पडलीं. राण्याचे लक्षांत सर्व गोष्टी आल्या. प्रेतांच्या राशी तुडवून तीं बाहेर आलीं आणि जयदेवीसह त्रिवर्ग घोड्यावर आरूढ होतांच इतर अनुयायी मंडळी पुढें झाली आणि सर्व मंडळीनीं दिल्लीची सीमा ओलांडली.

तीं निष्प्रतिबंध बाहेर कशीं पडलीं हें आपणांस पाहीलें पाहीजे. जयदेवीला राण्याशीं बोलत सोडून जयपाळ बाहेर आला आणि त्यानें कांहीं खुणेचे शब्द उच्चारिले. ते शब्द एकतांच प्रत्येक मेण्यांतून दोन दोन हत्यारबंद शिपाई बाहेर आले. त्यांची व्यवस्था पडदपोशीन स्त्रियांप्रमाणें—बाळात्कारीं ठेविली असल्यामुळें जयदेवीच्या त्या दासीच असें समजून पहारेकऱ्यांनीं त्या मेण्यांवर विशेष नजर दिली नाहीं. जी माणसें बाहेर उभीं होतीं त्यांनीं बाहेरचेबाहेर सर्व व्यवस्था केली. म्हणजे मुख्य दरवाज्यावरील शिपायांची त्यांनीं चंदी उडविली. आंतील मंडळीनें आंतल्यांचा समाचार घेतला. राण्याचे संरक्षणार्थ-बंदोब-

स्वार्थ जे लोक तेथें ठेवले होते ते निवडक होते आणि म्हणून तेथें जयपाळास बरीच झटापट करावी लागली. मूठभर शिपायांच्यानें जयपाळाच्या दुप्पट मंडळी-बरोबर कसा टिकाव धरावा ?

राण्याला दिल्लीशहराबाहेर ठेविलें होतें हें वाचकांस आठवत असेलच. तेथें राण्याचे बंदोबस्तास्तव जे रक्षक ठेविले होते ते किती असणार ! निर्भय जरी स्थळ होतें तरी नजरकैदेंत राणा होता आणि त्याजवर बंदोबस्त बेताचाच होता. आतां नेहमीं-हरघडी तिकडील वर्तमान ठेवणें हें अल्लाऊद्दीनाचें मुख्य काम होतें ही गोष्ट खरी आणि त्यानें तशी व्यवस्था राखिली होती. परंतु जो मनुष्य गांवांत जाण्याकरितां निघाला होता त्याजवर प्रथम जयपाळानें हल्ला करून त्यास मारलें होतें. शिवाय ठिकठिकाणची मंडळी जयपाळानें कैंचीत धरलेली होती आणि त्यांचा जागचेजागींच फडशा उडवून दिला अर्थात मग गावांकडे ही बातमी जावी कशी ?

जयपाळ मंडळीसह दिल्ली सोडून निघाला. तो एका मुक्कामावर जाऊन उतरला. अगदीं निर्भय जरी तो नव्हता तथापि प्रत्यक्ष संकटापासून तो एका मुक्कामावर लांब होता. सर्व मंडळीस थकवा आला होता, तेव्हां स्वस्थपणें कांहीं वेळ विश्रांति घ्यावी अशा हेतुनें त्यानें एका निवाऱ्याचे जागीं आपला तळ दिला.

इकडे अल्लाऊद्दीन हेरांची वाट पहातच होता. जेसलमीराहून मंडळी आली असल्याचें—जवळ येऊन ठेपली असल्याचें-त्याला कळलें होतें आणि देवी जयदेवीला

अप्सरातुल्य सौंदर्याची ओळख करून घेण्याची त्याची उत्कंठा त्याला अतोनात उत्तेजन देत होती. त्यानें दुसऱ्या हेराची बराच वेळ वाट पाहिली. मध्यंतरीं मनोराज्यांत तो गढून गेला होता. मनोमय विचारांत व्यत्यय न यावा एतदर्थ तिकडील खबर घेऊन येणाऱ्या हेराशिवाय कोणालाही आंत येऊं देऊं नये म्हणून द्वारपाळास सक्त ताकीद दिली होती. सर्व सुखाचें आगर प्राप्त झाल्याबद्दल त्यानें परमेश्वराचे आभार मानले आणि तिच्या व्यवस्थेंत जितकें आधिक्य आणवेल तितकें आणायेंच अशा योजनेनें त्यानें अनेक व्यवस्था करण्याचें योजिलें. तिचा इतमाम; डौल इत्यादि फारच भपक्यानें आणि तिच्या किंमतीला साजेल अशा तऱ्हेनें ठेवण्याचा त्याचा निश्चय होतांच त्या अमलांत आणण्याची व्यवस्था, तिच्याकडे जातांनां खानगीकडील लोकांना फर्माविण्याचेंही योजून ठेविलें. ती अस्मानची दिव्यचांदणी प्राप्त झाल्यावर नव्हे अस्मानी महालांत तिचा प्रवेश झाल्यावर-तिच्यासमागमें अप्रतिम सुखाचा लाभ होणार म्हणून आधींपासूनच तो मिटक्या मारीत होता. जास्त पाल्हाळ न लावतां सांगण्याचें म्हणजे इतकेंच कीं, जयदेवी दिल्लीस आली अर्थात तिची आपणांस प्राप्ती झाली आणि अप्रतिम सुखाचा लाभ मिळण्याचा दिवस उजाडला असें त्यास वाटलें. तिची बातमी आणणाऱ्या हेराची संभावना अगदीं योग्यरितीनें झाली पाहिजे म्हणून त्यास इनामादाखल देण्याच्या वस्तूची योजनाही अगोदरच त्यानें करून ठेविली होती. न जाणो ऐनवेळीं आपण अस्मा-

मंदाचे मरांत त्याच्या संदेशाची किंमत फारच कमी केली तर!!

वरचेवर प्रश्न करून करून द्वारसंरक्षकास देखील त्यानें त्रास दिला. स्वतः विरच्या किती थाळ्यांत होता; आंतून बाहेर खेपा किती करीत होता, याचा सुमारच नव्हता. क्षणोक्षणीं त्याची उत्कंठा त्याला उग्र बनवीत होती. क्षण झाला तरी त्याला कितीतरी वेळ गेला असें वाटून, बेइमानीपणाबद्दल यथेच्छ मुखाच्दवृष्टि कांहीं कमी झाली असें नाहीं. फक्त ऐकणारा मात्र तेथें कोणी नव्हता. द्वारसंरक्षकाचा त्यांत कांहींच संबंध नव्हता. शेवटीं अदमासापेक्षां जास्त वेळ झाला असें पाहून त्यानें एका स्वारास दौडविलें. त्या स्वाराची आगमनप्रतिक्षा करीत तो दारांत उभा होता. उभें रहाण्याचे श्रम त्यास कांहीं वाटतच नव्हते.

स्वार दौडतच परत आला, परंतु त्याच्या घाबरलेल्या मुद्रेवरून त्यानें काय बातमी आणली असेल याची कल्पना अल्लाउद्दीनास तावडतोब झाली. त्या स्वाराला घोड्यावरून उतरूं न देतां तो म्हणाला " तुम्ही लोक दगलबाज आहां असें मला समजविण्यासाठींच तूं आलास काय! तुला एवढें घाबरावयाचें काय कारण!

" हुजूर "पुढें त्या स्वारानें एक अक्षरही काढलें नाहीं.

" नादान, तुला पाठविला होता कोणत्या कारणास्तव आणि तूं जो अर्धमेल्यासारख्या होऊन परत आलास त्याचें काय कारण! तुम्ही नीच कोणी काढून

टाकण्याचा प्रयत्न केला होता काय? मग तुझी नेहमी चुरुचुर करणारी जीभ अशी चिकटून कां बसली? सैतानानें तुला पछाडलें?" अल्लाउद्दीनानें प्रश्न केला. त्याच्या मुद्रेचा पालट झाला होता.

"हुजूर हा बंदा सैतानाला भिणार नाहीं"

तो जों पुढें कांहीं बोलणार तोंच अल्लाऊद्दीन गर्जून म्हणाला "मला तुझी फुशारकी ऐकावयाची नाहीं. पाल्हाळ लावूं नकोस. मी पाठविलेल्या कामगिरीवर जाऊन तूं काय केलेंस; तेथले हराम लोक सगळे सैतानाच्या पाशांत सांपडले कां; माझ्या हुकूमाची अमान्यता करून आतां ते जिवंत राहतील"? तूं घाबरलेला दिसतोस त्यावरून खचित तुला सैतानानें गांठलें होतें."

"हुजूर, माझ्या नजरेस, तेथें जो कांहीं प्रकार पडला त्यावरून दगा झाला—

"दगा एवढे शब्द ऐकतांच तरवारीस हात घालून अल्लाऊद्दीन म्हणाला "दगा! आपल्या लोकांनी दगा दिला. हरामजादे सैतान! सगळ्यांची आज सैतानाकडे मी स्वहस्तें रवानगी करणार. काय झालें, काय जलदी बोल"

"पृथ्वीचें संरक्षण करणार प्रभो, तेथें प्रेतांचा नुसता ढीग पडला असून आपले एकूण एक लोक यमसदनी गेलेले माझ्या आढळण्यांत आले" त्या स्वाराची बोबडी वळून तो अर्धवट शब्दांनी म्हणाला महाराज, एकेकाचे शतशः तुकडे झाले आहेत आणि पुढें त्याची जीभ एकदम विसाव्यास्तव चिकटून बसली.

" आणि जयदेवी ! " अल्लाऊद्दीनानें अतिशय उत्सुकतेनें प्रश्न केला.

" हुजूर, वाडा अगदीं मोकळा आहे " त्या स्वारानें उत्तर दिलें, त्यावेळीं त्याचा चेहरा काळवंडला होता. कदाचित् भीतीनें त्याची तशी स्थिती झाली असेल. कारण अल्लाऊद्दीनाच्या रागाचे झपाट्यांत पहिला बळी आपण सांपडूं असें त्यास वाटलें असेल.

अपशब्दांचा भडिमार झाल्यावर अल्लाऊद्दीन पुढें म्हणाला " आणि तो निमकहराम रतनसिंग ! "

" हुजूर, वाड्यांत प्रेतांशिवाय कांहीं एक नाहीं, सर्व प्रेतें आपल्याच लोकांचीं आहेत " स्वार म्हणाला.

" अरे मूर्खा वाडादेखील सामानासह गुप्त झाला ! बेवकूब, तुला इतकें घाबरायला काय झालें ? तुझ्या म्हणण्याचा मतलब तर मग असाच कीं नाहीं, कीं तो काफीर राणा तेथून नाहींसा झाला ? " अल्लाऊद्दीन म्हणाला.

" होय सरकार " स्वारानें उत्तर दिलें.

" मग जयदेवी आली आहे ही बातमी खोटी ? अफसोस त्या नीचानें दगा दिला काय ? ठीक मेंढरासारखें कापून न काढल्यास अल्लाऊद्दीनाचें महत्व काय ? जा, जमादाराला एकदम माझ्याकडे पाठवून दे. " तो स्वार गेल्यावर अल्लाउद्दीन स्वतःशींच म्हणूं लागला " ही चूक अशी घातक झाली काय ? बेहत्तर ती मंडळी पृथ्वीच्या पाठीवर कोठेंही गेली असली तरी. त्यांची कंबर वर्षें पुरीं मरतीच. निमकहरामाच्या वचनावर भुलून मी स्वस्थ राहिलों. मी विश्वास धरून राहिलों

म्हणूनच त्यानें कावा साधला. आतां सगळ्या गोष्टींची जुळणी लक्षांत आली. माझें दर्शन तिनें घेणें हें अयोग्य ह्याचें कारण आतां लक्षांत आलें. असो. जयदेवी तर आली नाहींच. हें खास. तिचा तो नवरा म्हणा अगर दुसरा कोणी तरी आला हीच गोष्ट खरी आणि त्यानें आमच्या लोकांचे डोळे फोडून टाकले. वहावारे हुशारी! अशा हुशारीनें जयदेवीचा बचाव होईल काय! आतां रतनसिंगाची दोरी टिकणार आहे काय! झालें तें ठीकच झालें. आजपर्यंत गोडीगुलाबीनें त्यानें आम्हांला खेळविलें ही गोष्ट खरी."

इतक्यांत जमादार आला. त्यास निवडक मंडळी बरोबर घेऊन निघण्याची आज्ञा करून तो तडक राण्याला ज्या ठिकाणीं ठेवला होता त्या ठिकाणाकडे निघाला.

थोड्याच वेळांत त्याच्या लक्षांत तर्फीळ प्रकार आला आणि जमादार मंडळीसह येतांच, कांहीं मंडळीस तिन्हीं बाजूंस पाठवून आपण कांहीं लोकांसह जेसलमीराच्या मार्गास लागला. त्यानें तीन टोळ्या ज्या तिन्हीं बाजूंस रवाना केल्या होत्या त्यांस सक्त ताकीद होती कीं, फार दूरवर शोधत जाण्याचें कारण नाहीं. कांहीं सुगावा न लागल्यास जेसलमीरच्या रस्त्यास मिळून आह्मांकडे यावें. त्याची खात्री जरी नव्हती तरी ती मंडळी जेसलमीरकडेच वळली असल्याचें त्यास वाटत होतें. शोधकबुद्धीनें मागीतून जातांनां तर त्यास पक्की खात्रीच वाटली.

राण्याची मंडळी उघडपणें सरळ मार्गानें न जातां

कदाचित् आड वळणानें गेली असेल असा संशय येऊन त्यानें कांहीं स्वार आडवळणांनीं जो रस्ता जेसलमीराकडे जातो त्या रस्त्यानें पाठलाग करण्यास पाठविले आणि स्वत:मुख्य मार्गास लागला.

---

## भाग १३ वा.



स्वतंत्रता कोणास नको आहे? ज्यांनां ह्मणून प्राण आहे त्यांना स्वतंत्रतेची आवड आहे इतकेंच नव्हे पण वनस्पतींनांही स्वतंत्रता पाहिजे असते. परमेश्वरानें प्रत्येकास दिलेल्या या हक्काची नावड असणारा कधींही आणि कोठेंही सजीव प्राणि सांपडणार नाहीं. जन्मापासून परतंत्र असणाराला देखील स्वतंत्रतेची कल्पना असते आणि तिचे सुखाची तो अपेक्षा करीत असतो. स्वतंत्रतादेवीच्या कृपाछत्राखालीं सर्वकाळ रहाण्याचा प्रत्येकास हक्क आहे आणि तो प्राप्त झाला तरच त्यास सुख आहे. परतंत्रता ती कितीही सुखकर असो तरी तिची नावड असते. असो. स्वतंत्रतेची महति वर्णन करण्याचें हें स्थल नव्हे.

स्वतंत्रता प्राप्त झाल्यावर राण्याला जो आनंद झाला असेल तो अवर्णनीय आहे. मुक्कामावर गेल्यानंतर त्यानें स्वेच्छेनें शुद्धप्रवाहांत स्नान केलें. प्रेमळ आणि मोकळ्या मनानें आराध्य दैवतेचें स्मरण करून

तिचे आभार मानिले आणि तिचा अनुग्रह व्हावा ह्मणून सद्भक्तीनें याचना केली. नंतर त्यानें जयपाळासह जवळचा प्रदेश अवलोकन केला. त्याला प्रत्येक गोष्टींत नवी नवाई वाटली आणि प्रत्येक वस्तु पाहून त्याला आनंद झाला. बंदिवासांत बरेच दिवस घालविल्यानें त्यास सर्व गोष्टींचा कंटाळा वाटूं लागला होता आणि मन फारच अकुंचित झालें होतें. तें मोकळेपणा मिळतांच प्रसन्न झालें आणि त्याला हुशारी वाटली. जयपाळाचे त्यानें उघड उघड आभार मानिले आणि त्याचे ठिकाणीं ईर्षा उत्पन्न करणाऱ्या व पितृभक्तीनिःसीम जिच्या ठायीं वास करीत होती अशा आपल्या मुलीचे—जयदेवीचे-ही त्यानें जयपाळाजवळ कौतुकयुक्त गुण गाइले. अनेक दिवसांचा अभ्यास मध्यंतरीं खळल्यामुळें त्याला जें अतोनात वाईट वाटत होतें तें पार नाहींसें होऊन अभ्यासाचा विषय—अर्थात संवयी—हातीं आला. शस्त्रें पुनः स्वाधीन झालीं आणि राणा पुनः पूर्वस्थितीचा—अगदीं पहिल्यासारखा नाहीं, राज्यच्युत-झालेला तरीपण स्वतंत्र आणि स्वतःचे बाण्यासे ऐटींत—दिसूं लागला.

जयपाळानें आपण अद्यापि निर्भय नाहीं असें राण्यास सांगितलें. राण्यालाही अल्लाउद्दीनाचा धाक होताच. कारण जयदेवी दिल्लीस आल्याबरोबर तिची आपली नजरानजर झालीच पाहिजे असें जें अल्लाउद्दीनानें बजावून सांगितलें होतें त्याची त्यास आठवण होती. जयदेवी येत आहे हें वर्तमान बादशहाला कळलेंच असलें पाहिजे. आणि ती वाड्यां-

त सुखरूप येऊन पोंचल्याचें वर्तमान ऐकण्यास तो फारच उत्सुक झाला असेल. जेव्हां कांहींच वर्तमान कळलें नसेल तेव्हां तो अधीऱ्यामारखा थांबत थांबतच वाड्याकडे आला असेल आणि तेथील प्रकार अवलोकनांत येतांच कोपाविष्ट होऊन तो आपला पाठलाग करीत येईल हें राण्याचे लक्षांत आलेंच. आणि त्यानें जयपाळालाही तें सांगितलें. जयपाळाची कल्पना तरी तीच होती आणि कोणालाही तशी कल्पना झालीच असती कारण तसेंच झालें पाहिजे.

जयपाळानें आपल्या लोकांस घाई केली. त्यांनांही काळजी वाटत होतीच, तरी श्रमाला आराम पाहिजेच म्हणून थोडावेळ विश्रांती घेऊन निघण्याची त्यांची तयारी होती. जयपाळ आणि राणा सुखदुःखाच्या गोष्टी सांगत बसले, जयदेवी एका बाजूस बसली होतीच. मधून मधून ती बोलत होती तरी पण तिचें भाषण मित होतें. इतर मंडळी आराम घेत होती. ज्याच्या त्याच्या दृष्टीनें जे जे मार्ग ज्यास दिसले ते ते त्यांनीं अनुसरले. इतक्यांत ते ज्या मरणाला भीत होते तें—अर्थात अल्लाउद्दीन आणि त्याची मंडळी—दत्त म्हणून पुढें उभे राहिले.

अल्लाउद्दीनानें त्या मंडळीस लांबून पाहिलें होतें आणि तो त्या रोखावर येत होता. जयपाळाचे मंडळीनें एकच ओरड करून आपआपलीं शस्त्रें सांवरलीं. जयपाळ आणि रतनसिंग दोघेही सज्ज झाले आणि आलेल्या संकटाचा प्रतिकार करण्यास तयार झाले. जयदेवी आपल्या डेऱ्यांत जाऊन बसली. राणा

आणि **जयपाळ** दोघेही अंतर्यामी भीऊन गेले होते, कारण सामर्थ्याची उणीव. **जयपाळाचे** दृष्टीनें सामर्थ प्रथमपासूनच कमकुवत आणि अगदीं कमीं असें होतच आणि राण्याला तर **अल्लाउद्दीनाचा** धाक वाटण्याची संवयच लागली होती. परंतु माघार घेऊन परिणाम जो भयंकर होणार त्यापेक्षां संकटाला तोंड देऊन जें काय व्हावयाचें तें होवो ह्मणून ते दोघे तयार झाले. **जयपाळानें** आपल्या लोकांस तयार रहाण्यास हुकूम केला आणि **जयदेवीस** धीर देण्यास्तव तो तिजकडे आला. ती जरी अंतर्यामीं घाबरली होती तरी तिनें **जयपाळास** धीर दिला. उलट त्यालाच प्रोत्साहन येईल असें भाषण करून तिनें त्यास तयार केलें. **जयपाळ** तिचा निरोप घेऊन ठिकाणावर आला, इतक्यांत **अल्लाउद्दीन** मंडळीसह जवळ येऊन थडकला.

सर्वांचे पुढें **अल्लाउद्दीन** होता. त्यानें आपल्या लोकांस ओरडून पुढें होण्यास फर्माविलें. दोघांची आंगलट झाली. दोन्ही कडील मंडळी निकरानें हात करूं लागली. **अल्लाउद्दीन** त्वेषानें रतनसिंगावर धांवला. राण्याला स्वतःचा बचाव करतां आला असता तथापि **जयपाळा**नें त्याच्याकडे आपले कांहीं लोक पाठविले आणि आपण जमादारावर धांवला. तरी त्याचें लक्ष डेऱ्याकडे होतें. **अल्लाउद्दीन** हाडाचा बळकट असून योद्धा होता. राण्यास त्याच्याइतका अनुभव नव्हता. मार, हाण, ठोक, काफीर, अफसोस वगैरे शब्दांनीं तो प्रदेश दणाणून गेला. प्रत्येक सपाइयास एकजणांस मुक्त करण्याचा प्रत्येकानें जणूं नेमच केला होता. भडाभड

भडें गरूं लागली. उभयपक्षांकडील मंडळींत तेजस्वीता आणि शौर्य उत्तम दिसत होतें. अल्लाउद्दीनाला एकवार लागला तरी तिकडे दुर्लक्ष करून त्यानें राण्याला चित केला. त्यानें शीर धडापासून वेगळें केलें, आणि तेथून तुडवीत तुडवीत तो जयपाळावर धांवला. त्याची वीरश्री कांहीं अवर्णनीय होती.

जयपाळानें आपली कामगिरी सर्वोत्कृष्ट बजाविली. त्यानें स्वतः वास्तविक सामर्थ्यापेक्षां जास्तच बहादुरी केली. परंतु एकंदर सामर्थ्याचे जमेशीं मेळ बरोबर नव्हता तेथें काय इलाज ! जमादारास पार चितकरून तो वळतो तों अल्लाऊद्दीनानें त्यास पाचारण केलें. मोठ्या शिताफीनें त्यानें अल्लाऊद्दीनाचा हात चुकविला. त्यानें उलट तरवार चालविली. परंतु त्या दोघांचे झटापटीशिवाय इतर सामसूम झालेलें पाहून त्याचें धैर्य खचलें. पातशहाचे मंडळींनी जयपाळाकडील एकंदर मंडळीचा धुव्वा उडविला. जी मंडळी पाय काढून यःपलाय करण्याचे तयारींत होती त्यांना एकसा कैद केलें, आणि कांहीं स्वार-बादशहाचे-डेऱ्याचे संरक्षणार्थ जे स्वार ठेविले होते त्यांचे आंगावर चालून गेले.

डेऱ्याचे रोंखावर स्वार चाललेले पाहून जयपाळास फारच त्वेष चढला आणि अतित्वरेनें तो एकटाच त्याचे प्रतिकारार्थ धांवला. अल्लाऊद्दीन त्याचे पाठीवर होताच. जयपाळानें पाठ फिरविलेली पहातांच त्यानें त्याच्यावर एक सपाटून वार केला. तो जरी ओझरता लागला तरी जयपाळाला त्यापासून बरीच इजा झाली. जयपाळ मोठ्या आवेशानें धांवला आणि

मपाट्यासरशीं त्यानें दोघांस चित केलें. तोंडानें तो आपल्या लोकांस आव्हाहन करून आज्ञा करीत होता परंतु त्याच्या आज्ञा ऐकण्यास तेथें कोण होतें ? इ-त्याच संरक्षणार्थ उभे केलेल्या स्वारानीं कोठवर टिकाव धरावा ? त्यानीं शिकस्त केली. जयपाळ एकदम बादशहाचे मंडळींत घुसला आणि बादशहानें त्याची पाठ धरिली. तरी त्यानें सपाट्यानें आणि शिताफीनें हात चालविला. त्याला पुष्कळ जखमा झाल्या त-री तिकडे दुर्लक्ष करून तो पिसाळल्याप्रमाणें धांवत होता.

शेवटीं त्याचा नाइलाज झाला. बादशहानें त्याला ओढला आणि खालीं पाडला. त्याला एका पायानें रगडून आणि तरवारीचें एक टोंक त्याच्या छातीवर टेंकून बादशहा ह्मणाला " काफीर, बेवकूब रतनसिं-गाच्या संरक्षणार्थ ह्यानी कोणती पुढें आली होती ! सैतानची अवलाद ! ! " त्यानें आपल्या लोकांस हात आवरण्यास फर्माविलें.

जयपाळपुरता हतवीर्य झाला. त्याला जखमांच्या वेदना होऊं लागल्या. त्यानें डोळे मिटले, आणि हताश-युक्त स्वरानें तो ह्मणाला " जयदेवी, अवतार संपला बरं ! तुझी सुटका आतां तूंच करून घे. "

" काय, जयदेवी येथें आहे ? जयदेवी दिल्लीस आली होती ? अफसोस " अल्लाउद्दीनानें विचारिलें. ज्या डेऱ्याविषयीं त्याला यत्किंचित महति वाटली नव्ह-ती त्या डेऱ्याकडे पाहून तो ह्मणाला " माझा प्राण आणि जगताचा सूर्य त्या ठिकाणीं आहे काय ? "

**जयपाळाचे** आंगांतून रक्त वाहून तो फारच अशक्त झाला, त्यानें उठण्याची गडबड केली नाहीं, आणि धडपडही केली नाहीं, **अल्लाऊद्दीनाचे** हातून आपला मोक्ष होणार हें तो जाणून होता.

**अल्लाऊद्दीन** आपल्या लोकांस ह्मणाला " शूरहो, आजची कामगिरी तुह्मीं योग्य बजावलीत परंतु आतां एक अत्यंत नाजूक काम मी तुह्मांस सांगणार आहे. डेऱ्याची वाटेल ती व्यवस्था करून त्यांत माझा कलिजा आहे कां पहा. जर ती तेथें असेल तर अल्लाची मेहेर आहे. हा पोरटा जों पर्यंत जिवंत आहे तोंपर्यंत तिला माझ्यासमोर आणा ह्मणजे मला जो कांहीं आनंद होईल तो अवर्णनीय? "

**जयपाळानें** खोल अवाजानें ह्मटलें " प्रेमळ **जयदेवी**, तुझें संरक्षण आतां कसें होणार? हा नीच तुला छळील आणि तुला भ्रष्ट करील. हाय, हाय! **नीतीनें चालणाराला अंतीं भ्रष्टता काय? परमेश्वरा तुझीलीला अगाध आहे!** जयदेवी संभाळ. "

**अल्लाऊद्दीन** तरवारीचें टोंक त्यास किंचीत टोंचून ह्मणाला " तिचा रक्षणकर्ता नव्हे धनी येथें असतां तिच्या संरक्षणाची काळजी तुला कशाला हवी? तिचा हक्क राज्ञीपदावर आहे आणि सार्वभौम समर्थाचीच ती राणी होणार? लोकांस उद्देशून तो ह्मणाला " चला डेरा जर शक्य असेल तर फाडा आणि अटपा. तेथेंच ती आहे "

**जयपाळ** अर्धवट शब्दांनी ह्मणाला " नीचा, तुला सार्वभौमत्व केव्हां प्राप्त झालें? ती महंमदी धर्मांची

आस्था बाळगणारी स्त्री नव्हे, अगवा संपत्ती, दौलत हीं देखील शीला पेक्षां तिला उत्तम कधींही वाटणार नाहींत." त्याची जीभ आंत ओढूं लागली, घसा कोरडा पडला, आणि डोळ्यांपुढें अंधारी आली. तो ओढाताण करून ह्मणाला " जयदेवी तुझा जयपाळ चालला बरं! माझी इच्छा तुझ्यापाशीं राहील आणि तीच तुझें संरक्षण करील. हा तुझ्या उत्कंठेचा परिणाम असें मला वाटत होतें, पण नव्हे; दैवी जें होतें तेंच घडून आलें, आणि आम्हां सर्वांच्या वेळा ठरलेल्या होत्या. तुझ्याकडे कांहीं दोष नाहीं;" तो तळमळूं लागला.

" बेहेत्तर. तुझ्यादेखत जयदेवीचा स्वीकार जरी मला करतां येणार नाहीं तरी बेहेत्तर, पण तूला तुझ्या अंतकाळीं एवढें सांगून ठेवतों कीं, जयदेवी अल्लाऊद्दीनाची. तिचें पाणिग्रहण अल्लाऊद्दीन करणार. आतां तूं स्वस्थ मर." असें ह्मणून अल्लाऊद्दीनानें तरवारीचें टोंक त्याचे हृदयांत टोंचलें. " गेला प्राण गेला. ज-य देवी गेला " असें अर्धवट शब्दांनीं एक-एक अक्षर तुटक तुटक उच्चारून जयपाळानें प्राण सोडला.

अल्लाऊद्दीनानें तरवार उचलली. तो एका बाजूस झाला, आणि लाथेनें तें प्रेत ढकलून ह्मणाला " जयदेवीवर इच्छा ठेवणाऱ्याचें प्रेत कोल्हीं कुत्रीं खातील" परंतु इतक्यांत डेऱ्यांतून एक बाण येऊन अल्लाऊद्दी-

नाच मर्मस्थानीं लागला. तो धाडकन जमिनीवर आदळला. ह्याचाही विध्वंस त्याचे लोकांनी केला. ह्याचे बाजूनें एक सर्वांग अच्छादित अशी स्त्री जय-पाळ पडला होता त्या बाजूस आली.

अल्लाऊद्दीन पडतां पडतां ह्मणाला "अफसोस, हा मर्मच्छेदी तीर जयदेवीनेंच सोडला काय? हाय हाय! प्यारी जयदेवी तूंच हें कठोर काम केलेंस काय?" तिच्या अंगावर स्वार धांवलेले पाहून त्यांस उद्देशून तो ह्मणाला "खबरदार तिला कोणी इजा कराल तर. तिच्या केसांलाही धक्का लागतां उपयोगीं नाहीं. जयदेवी, माझ्या प्राणा, माझ्याजवळ ये. मला स्पर्श कर. अहाहा! तुझ्या स्पर्शानें मला कितीतरी सुख होईल? त्या भिकारड्यानें प्रेत मांडीवर घेऊन ती बसली. अरेरे, जयदेवी तुझ्या इच्छेचे विरुद्ध तूं हें काय करीत आहेस? तुझा धनी हा येथें पडला आहे. ही जखम पहा! चुकून जर हा तीर तुझे हातून सुटला असला तर मी तुला क्षमा करतों. माझे शरीरास स्पर्श कर ह्मणजे मी सुखानें मरेन. माझी दौलत, माझें राज्य आणि माझें वैभव मी तुला अर्पण करतों. तूंच राज्ञी-पदारूढ होऊन राज्य चालव. जयदेवी, सुंदरी, माझ्या प्राणा, दिल्लीच्या भूषणा, परस्तानच्या रत्ना, ये. माझ्या जवळ ये. आपल्या प्रियकराच्या जखमेकडे कृपादृष्टीनें पहा. तुझा स्पर्श होतांच माझी तळमळ बंद होईल. माझ्या वेदना पार नाहींशा होतील. माझें दुःख कमी होईल, आणि कदाचित तुझ्या प्रेमद-

होतें माझी जखमही बरी होईल " रक्ताचा स्राव अतिशय होऊन त्यास क्षीणता आली आणि वेदनांनी तो व्याकूळ होऊन गडबडा लोळूं लागला. तळमळूं लागला.

जयदेवीनें सर्वांग आच्छादुन घेतलें होतें आणि तोंडावर बुरखा घेतला होता. तिच्या मनाची स्थिती जाणण्यास कल्पनेशिवाय इतर साधन नव्हतें. बादशहाचे लोक टेन्यावर आले असे पाहतांच आणि जयपाळाचा अंत बादशहा करीत आहे असें दिसून येतांच तिनें त्वेषानें एक तीर बादशहाचे गळ्यावर सोडला आणि ती तडक बाहेर पडली. जयपाळाचें प्रेत तिनें मांडी-वर घेतलें. तिच्या मुखांतून दुःखोद्गार देखील बाहेर आले नाहीत. कदाचित नीचस्वभावी बादशहाचे कानीं आपला शब्द पडणें देखील अशुभ असें समजुन तिनें उद्वेग जनक शब्द आवरले असतील.

जयदेवी जागेवरून हालत नाहीं असें पाहून तळमळ करित बादशहा ओरडून ह्मणाला " अग निष्ठुर जयदेवी! तूं माझा अंत नकोग पाहूंस. अग जर माझ्यावर तुझें प्रेम नसेल तर निदान एक प्राण अडकून राहिलेला दीन मनुष्य असें समजून तरी माझ्या सहाय्याला ये. तुझ्या स्पर्शानें मला खचित आनंद होईल, आणि आराम वाटेल. " आपल्या लोकांकडे वळून तो ह्मणाला " अरे नादान, कोणीतरी तिला जबरीनें मजजवळ आणारे. तिच्या विनवण्याकडे किंवा करुणोद्गारांकडे बिलकूल लक्ष देऊं नका. ओढा

निदान अशा जबरीनें तरी मला तिचा स्पर्श घडूं दे " पुनः जयदेवीकडे वळून तो दीन वाणीनें ह्मणाला " प्यारी जयदेवी, मला तुमचा तुझा मुखेंदु तरी पाहूं दे. मनोहर अशा मुखकमलाचा दर्शनलाभ तरी घडूं दे. "

जयदेवीच्या आंगाचा भडका उडाला. ती तळमळूं लागली. तिची स्थिती चमत्कारिक झाली. घसा कोरडा पडला, आणि अगदीं तुटक अशा शब्दांनीं ती ह्मणाली " प्राणा जयपाला, पुढील जन्मीं तरी एकत्र संसारसुख— " पुढले शब्द बाहेर आलेच नाहींत. ती धाडकन जमिनीवर पडली आणि एका निमीषार्धांत तिचा आत्मा पंचतत्वांत मिसळून गेला.

अल्लाउद्दीनाचे डोळ्यांपुढें काळोख झाला होता. तो अतिक्षीण झाला होता. जयदेवीचा शब्द ऐकतांच तो मोठ्या अवसानानें उठून बसला, आणि जीभ जरी आंत ओढत होती तरी कष्टानें तो ह्मणाला " अरे आणा तिला ओढून आणा. त्या निष्टूर स्त्रीची बिलकूल दया बाळगूं नका. ती शोक करणारच " इतक्यांत श्रमानें त्यास घेरी आली आणि धाडकन तो खालीं पडला.

त्याच्या लोकांनीं त्याला सावध केला. त्याला अतोनात क्षीणता आली होती तरी तो फार खाल अशा अवाजानें ह्मणाला " अरे ती आली काय ! तिच्या

हृदयाप्रमाणें तिचें शरीर कठोर नाहीं हें मी जाणतों. तिनें स्पर्श करतांच मी चांगला सावध होईन " ऐकलेसें करून तो ह्मणाला " काय ती मेली ? गतप्राण झाली ! हाय ! हाय !! प्यारी जयदेवी, माझी इच्छा शेवटीं अपूर्ण राहिली ना ? मला आतां दुःसह वेदना होऊं लागल्या. अफसोस माझ्या जन्माचें मातेरें झालें. अरे, मला निदान तिच्या प्रेताजवळ तरी न्यारे. तिची माझ्यावर प्रीति होती. ईश्वराचे कृपाछत्राखालीं आह्मीं सुखानंदानें दिवस घालवूं. जयदेवी, मी हा पहा तुझ्या मागोमाग आलोंच. प्राण गेल्यावर शरीराची काय मातब्बरी !! " तो अतिशय तळमळूं लागला. त्यास असह्य वेदना होऊं लागल्या. तरी त्याची वासना पाठ पुरवीत होती. तो ह्मणाला " अरे तिला कोणी नीट पहारे ! अति दुःखानें ती बेशुध्द पडली असेल. ती सावध होईल. तिला जपा " त्याची जीभ जास्तच आंत ओढूं लागली तरी अवसान फार बळकट होतें. तो पुटपुटत होता. शब्द फारच खोल गेला होता. रक्तस्राव अतोनात झाल्याकारणानें तो फटक झाला होता. त्याचीं बहुतेक गात्रें आटपत आलीं होतीं. हातपाय थंड पडत होते. आणि नाड्याही थंड पडत चालल्या होत्या. शेवटच्या उसळीसरशीं त्यानें डोळे ताठरले, आणि " जयदेवी, मी तुला डोळाभर पाहिलें देखील नाहीं. प्राणा जयदेवी. जयदेवी " ह्मणून त्यानें प्राण सोडला. दिल्लीपती प्रेत होऊन पडला. त्याच्या वासनेचा, दुर्गुणाचा आणि

एकंदर मनोविकारांचा त्याच्या प्राणाबरोबर
झाला.

डेऱ्यांतून बाहेर पडतेवेळीं जयदेवीनें ह
आंगठी चावली होती असा समज आहे. आं
जालिम विषानेंच तिची बाजू राखली.

एकंदर एका बादशहाचे अनिवार विषयव
पायीं चितोडच्या घराण्यांतील मंडळीचे, जयपा
बळी पडले, आणि स्वतः बादशहाही वासनेस
प्राण अर्पण करावे लागले.

परमेश्वराची इच्छाच तशी त्या सूत्रधार
हे सर्व खेळ.

---




